वाङ्मयविकास-माला

# बाईलवेडा !

लेखक,

विठ्ठल वामन हडप

वाङ्मयविकास कार्यालय,

टयुटोरिअल प्रेस, मुंबई नं० ४

# उद्देश व नियम

मराठी भाषेंत स्वतंत्र, ओजस्वी, व चिरंजीव असें विविध वाङ्मय निर्माण करण्याच्या उद्देशानें वाङ्मय-विकास-माला सुरू करण्यांत आली असून महाराष्ट्रांतील नामांकित वाङ्मयभक्तांचें स्वतंत्र व संग्रहणीय असें विविध वाङ्मय ही माला शक्य तों स्वस्त व सर्वांगसुंदर स्वरूपांत वेळोवेळीं सिद्ध करील.

**(१) मालेची ४ आणे प्रवेश फी भरून कायमचे ग्राहक होणारांना ग्राहक झाल्या दिवसापासून पुढें प्रसिद्ध होणारीं सर्व पुस्तकें पाऊणपट किंमतींना मिळतील. (२) नवीन ग्राहकांना प्रवेश फी भरल्या दिवसापूर्वी प्रसिद्ध झालेल्या सर्व पुस्तकांची पूर्ण किंमत द्यावी लागेल. (३) कायमच्या ग्राहकांना मालेचीं सर्व पुस्तकें घ्यावीं लागतील. (४) व्ही. पी. परत केल्यामुळें किंवा अन्य कारणानें ग्राहकांतून नांव कमी झाल्यावर पुन्हां कोणाला ग्राहक व्हायचें असेल तर त्याला नवीन ग्राहकांचे सर्व नियम लागू होतील.**



---

मुद्रक व प्रकाशक,

**विश्वनाथ पुरुषोत्तम पेंढरकर,**

ट्युटोरिअल प्रेस, गिरगांव, मुंबई

# खुल्या दिलाचे दोन बोल

प्रस्तुत कादंबरी रचण्याची कल्पना मला सुचली, तेव्हांचें तिचें नियोजित नांव **जगाची रीत** असें होतें. पण कादंबरी लिहून पूर्ण झाली, तरी जगाच्या रीतीविषयीं मला जे चार वेडेवांकडे अनुभव बोलून दाखवावयाचे होते, त्यांचा पुरा श्रीगणेशाहि एवढ्या मोठ्या पुस्तकांत सांगितलेला माझा मलाच कोठें सांपडेना ! हें आत्मवंचनेचें पाप टाळण्यासाठीं प्रस्तुत कादंबरी ही कथारूपानें मला समाजाला ज्या जगाच्या अनेक रीतींचा अनुभव सांगावयाचा आहे, त्या रीतींपैकीं पहिली रीत होय, असें मानून मी तिच्यांतील प्रतिपाद्य विषयाला अन्वर्थक असें तिचें **बाईलवेडा** हें नांव ठेवलें. वस्तुतः **बाईलवेडा** हें कथानक सर्वतोपरि स्वतंत्र व पूर्ण आहे. पण एथवरचे प्रसंग जीवमात्रानें अनुभवल्यावर पुढें काय तें सांगून सुखदुःखांच्या विविध प्रसंगांनीं गजबजलेली जीवितयात्रा पार पाडतांना त्याला कोणकोणत्या परिस्थितींतून कसकसें परिभ्रमण करावें लागतें, याचें दिग्दर्शन करावयाचें तर तें आयुष्यांतील विविध प्रसंगांचीं रूपकें घेऊन पायरीपायरीनेंच केलें पाहिजे; तें कार्य आवश्यक तेवढ्या जगाच्या रीती सवडीनुसार क्रमाक्रमानें ह्या एकाच कथासूत्रांत गोंवून त्या निमित्तानें पार पाडण्याचा माझा मानस आहे. यापुढें वेळोवेळीं प्रसिद्ध होणाऱ्या जगाच्या रीतींतील कथानकें एकापासून एक अगदीं स्वतंत्र व स्वयंपूर्ण अशींच असतील; मात्र त्यांची योजना प्रस्तुत **बाईलवेडा** कादंबरींतील नायकनायिकांच्या वाढत्या आयुष्यांतील वाढत्या अनुभवाच्या पायावर केली जाईल.

भूत-भविष्य-वर्तमान ह्या त्रिकालांच्या त्रिपदीवर उभा ठाकून प्रत्येक जीव जर जीवजगतांतील आपल्या जीवितयात्रेचें समबुद्धीनें निरीक्षण करील, तर कार्यकारणभावाचें रहस्य त्याच्या अंतःकरणाला पटून कार्याकार्याच्या ग्राह्याग्राह्यतेचा निर्णय करण्याचें कार्य निदान त्याच्या जीवितापुरतें तरी त्याला सुलभ होईल, व प्रत्यक्ष अनुभवाच्या कसोटीवर कार्य आणि अकार्य ठरविणें बरेंच सुलभ जाईल. आपल्या जीवितयात्रेंतील कार्य कोणतें व अकार्य कोणतें, याची बिनचूक पारख करतां येणें म्हणजेच ज्ञातेपणाच्या पायरीला पोंचून ' माणूस '

ह्या संज्ञेला पात्र होणें होय, व ह्या माणुसकीचें मापन करण्याला शिकवणारा गुरु जगांतील स्वानुभवाच्या सावधानचित्त परिशीलनाशिवाय दुसरा नाहीं.

हा वर निर्देशिलेला आत्मशोधनाचा मार्ग चोखाळणें स्वतःला सुलभ जावें, म्हणून त्या मार्गांत प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष अशा स्वानुभवाच्या स्मृतिचिन्हांचे टप्पे स्मरणशक्तीच्या साह्यानें निर्माण करण्याच्या स्वार्थबुद्धीनें प्रेरित होऊन प्रस्तुत **जगाची रीत** कथारूपानें कथन करण्याचें कार्य मीं आवडीनें हातीं घेतलें आहे; अर्थात् ह्या कथासूत्रद्वारा प्रतिपादिलेलीं मतें सर्वांना सारखींच पटतील असा नियम नाहीं, व तीं सर्वांना सारखींच पटलीं पाहिजेत असा माझा आग्रहहि नाहीं. बोलून चालून ह्या कादंबरीलेखनाच्या निमित्तानें मला प्रथम स्वयंशिक्षण व स्वयंशासन हा स्वार्थ साधावयाचा आहे; तो साधून जेवढें लोकरंजनाचें श्रेय अनायासें पदरीं पडेल, तेवढ्यांतच संतुष्ट रहाण्याची माझी तयारी आहे. इत्यलम्.

वाङ्मयविकास कार्यालय,
गिरगांव, मुंबई. ता. १-१-१९२५.

**विठ्ठल वामन हडप.**




## पहिली झुळक

### निळकंठ (१)

आम्ही घरचे गरीब व आमचें कुटुंब मुलांबाळांचें, यामुळें एवढ्या मोठ्या कुटुंबाचा योगक्षेम चालवितां चालवितांच बाबांना जीव नकोसा होऊन जाई; मग मुलाबाळांची आपल्या पश्चात् सोय होईल, इतकी धनदौलत त्यांनीं कुठची सांठवावी? मरणकाळीं त्यांनीं आमच्या डोक्यावर कर्जाचे डोंगर रचून ठेवले नाहींत, हेच त्यांनीं आमच्यावर मोठे उपकार केले. नाहींतर वडिलोपार्जित ऋणाच्या चिखलांत कुजत पडलेले आडनांवाचे श्रीमंत आम्ही आमच्या शेजारीं पहातच होतों. आमचें घराणें पिढ्यान्‌पिढ्या खानदानीचें. आमचे आजोबा-पणजोबा फार श्रीमंत होते म्हणतात; ती त्यांची श्रीमंती त्यांच्या नाना प्रकारच्या रंगाढंगांनीं जरी वाटेची आडवाटेला चालती झाली, तरी माझ्या वडिलांनीं मरेतोंपर्यंत ती खानदानी परंपरा मोडूं न देतां आमचें घर अतिथी-अभ्यागताला निरंतर उघडें राखिलें. माझी आईहि खानदानीच्या घराण्यांतली माहेरवाशीण होती. माझे मामा मुंबईचे एक नांवाजलेले कार-

खानदार होते; ते विश्वविद्यालयाचे पदवीधरहि होते. लक्ष्मी व सरस्वती या दोघीहि त्यांच्या घरीं दुडीनें पाणी भरीत होत्या, असें म्हटलें असतां वावगें होणार नाहीं. अशा गर्भश्रीमंताची बहीण एकाद्या गर्भश्रीमंताच्याच पदरीं पडायची, पण खानदानीचीं घराणीं आपल्या कुळाची इभ्रत कायम राखण्यासाठीं नेहमीं खानदानीच्या घराण्याशींच शरीरसंबंध करीत असतात, मग नवरा मुलगा भिकारी असून त्याच्या घरच्या कोनाकोंपऱ्यांतून लक्ष्मी तीन त्रिकाळ उपाशीं रहात असली तरी चालते, ह्या विचारांनीं माझ्या आजोबांनीं आपली मुलगी आमच्या घराण्यांत दिली, व माहेरीं सोनें वेंचणारी ती कनकलक्ष्मी आमच्या घरीं येऊन गोंवऱ्या वेंचूं लागली !

आपला गरीबीचा संसार करतां करतां आम्हां दोघां मुलांनां जन्म दिल्यावर एके दिवशीं त्या साध्वीला आपल्या भालप्रदेशावरचा सौभाग्यतिलक पुसून आपल्या काळ्या कुरळ्या लांबलचक सुंदर केसांची चार, मृत्यूला—त्य मांगाच्याही मांगाला—चारावी लागली. आई सौभाग्यपणीं रूपानें सुंदर होत म्हणतात. पण तिच्या सुंदरतेवरून वैधव्याचा नांगर फिरल्यावर त्या सुंदरतेची माती झाली. त्या सुंदरतेचा भग्नावशेष म्हणून तिच्या गालीं खुलणारा गोरेपणा व डोळ्यांत चमकणारें तेज यांची मला या क्षणींही आठवण पटते. आपल्या मागें आपल्या अर्धांगींनां हिंदु समाजाच्या दुष्ट रूढींनीं अशा विद्रूप बनवून सोडल्याचें पाहून दिवंगत पतींनां रडें येत असावें, व त्या रड्याचे दंवबिंदु पृथ्वीवर वर्षत असावे, अशी आपली माझी त्यावेळीं वेडी समजूत होती; पण पोरपणची समजूत ती, तिला थोरपणांतील खरेपणाचा कस लावतांच कामा नये.

वैधव्य कपाळीं आलें म्हणून रडत बसून डोळे सुजवीन, असें म्हणायलाही आईला उसंत कशी ती मिळाली नाहीं. ती गरिबाची अर्धांगी होती, व गरिबांच्या अर्धांगींना असल्या भयंकर संकटांच्या वेळीं श्रीमंतांच्या कनकलक्ष्मीप्रमाणें रडत बसतांच कामा नये. परमेश्वरहि योजना करतो ती अशीच. तो श्रीमंत बायकांना अशा वेळीं रडून रडून भिजवायला उंची शालू, पैठण्या देतो, पण गरीबांच्या बायकांना त्यांऐवजीं विवेकाची कर्तबगारी देतो श्रीमंतांना दुबळेपणा व गरीबांना धट्टेकट्टेपणा द्यायचा, हा देवाच्या घरचा सामान्य न्यायच आहे. बाबांच्या पश्चात् आमच्या संसाराचा मांडव होऊं नये

व आपलीं मुलें जगांतल्या अनाथ इतर मुलांप्रमाणें उघड्यावर पडूं नयेत; त्यांना चांगलें शिक्षण देऊन मानमान्यतेला आणावें, व 'शाबास! हे अमक्या तमक्याचे मुलगे!' अशी ज्याच्या त्याच्या तोंडीं आमची वाहवा व्हावी, हेंच आईचें इहलोकचें मोक्षसाधन होतें. तें साध्य करून आपण डोळे मिटावे, म्हणून तिनें माझ्या वडील बंधूंना साताऱ्यास एका नातलगाकडे विद्याभ्यासासाठीं पाठविलें. राहतां राहिलों मी, ती माझ्या हातीं तिनें माधुकरीची चौपदरी सजवून दिली. ही भिक्षेची झोळी माझ्या हातीं देतांना तिच्या नेत्रांतून जे अश्रु गळाले, व तोंडावाटे जे उसासे निघाले, त्या अश्रूंत व त्या उसाशांत, युगायुगांची करुणा, स्वाभिमान व कुलाभिमान विरघळून बाहेर पडत होता. त्या साध्वीला दुसऱ्याच्या घरीं आपल्या मुलाचा उष्टा हात झालेला खपत नसे, तिलाच आपल्या लहानग्या मुलाच्या तोंडचे 'ॐ भवति भिक्षां देहि' शब्द ऐकण्याची पाळी यावी ना! अगदीं पहिल्यानें माधुकरीची झोळी हातीं घेऊन फिरण्याची मला लाज वाटूं लागली. मला तेव्हां कुणीं भिकारी म्हटलेलें खपत नसे; तें म्हणून घ्यायचें कपाळीं आलें, म्हणून मला रडूंहि आलें. तेव्हां आईनें आपल्या पदरानें माझे अश्रु पुसून माझी समजूत घातली, "जातील, बाळ, आपले हेहि दिवस जातील. ज्या परमेश्वरानें आपल्याला दुःखाचे दिवस दाखविले, तोच आपल्याला सुखाचेहि दिवस दाखवील. नेहमीं रात्रीमागून दिवस उगवतो, व अंधाराच्या उदरींच उजेडाचा जन्म होतो."

निरुपाय म्हणून मी माधुकरीवर माझा विद्याभ्यास चालविला. लोकांच्या दारोदार हिंडून घांसघांस भात, एकेक भाकरीचा तुकडा, असें अन्न जमवावें, तें कोरडेंच्या कोरडें घरीं आणल्यावर कसेंबसें खावें, व शाळेचा रस्ता सुधारावा, हा माझा तेव्हांचा नित्यक्रम होता. आपला मुलगा लोकांच्या दारोदार पोटासाठीं भीक मागत हिंडत आहे, हें पाहून माझ्या बाबांना स्वर्गांत त्या वेळीं काय वाटत असेल बरें! ह्या याचकवृत्तीची मलाहि पराकाष्ठेची चीड होती. त्या दशेंतील एकहि दिवस मला असा गेलेला आठवत नाहीं कीं, ज्या दिवशीं माधुकरी मागत रस्त्यानें हिंडतां हिंडतां लाज वाटून माझ्या डोळ्यांवाटे आंसवें गळलीं नाहींत, व शरमिंदा होऊन मीं तीं गिळलीं नाहींत! घरोघरचे यजमान आपल्या मुलांच्या ताटवाट्या आपल्या पुढ्यांत घेऊन त्यांना खेळवीत आनंदानें अन्नाचे घांस सेवन करतांना पाहिलें म्हणजे

माझे बाबा जिवंत असते तर मीहि हाच आनंद अनुभवला असता, असें मला वाटे.

केवळ एका घांसाची भिक्षा मिळायची; पण त्या एका घांसासाठीं मला घरोघर किती तरी आज्ञाधारक बनावें लागे ! कुणाचीं मुलें खेळव, कुणाच्या गोठ्यांतल्या गाई बांध, कुणाच्या गोठ्यांतलें वेळीं शेणहि भर, तेव्हां कुठें एक घांस भीक मिळणार ! पण त्या एका घांसाशिवाय माझें पोट उपाशीं मरत असल्याकारणानें तो पदरांत पाडण्यासाठीं मला कुणाचींहि व कसलींहि हलकीं सलकीं कामें करावीं लागत. खुषीनें कीं सक्तीनें, हा प्रश्न अर्थातच गरिबांच्या मुलांनीं ध्यानीं घ्यायचा नसतो. खुषी, सक्ती, इच्छा, अनिच्छा, हे मनोविकार परमेश्वरानें श्रीमंतांसाठीं निर्माण केले आहेत. ते श्रीमंतांच्या आंगीं गुणसे शोभतात; पण गरिबांच्या आंगीं त्यांचें दुर्गुणांत रूपांतर होतें. दुर्दैवी आम्ही गरीब ! न जाणो, आमच्या हातीं कदाचित् सोन्याचीहि माती होईल !

गरिबांच्या मुलांनीं बुद्धिमान् निपजूं नये; त्यांनीं शाळेंत श्रीमंतांच्या मुलांवर नंबर पटकावूं नये. श्रीमंतांच्या श्रीमंतशाहींत गरीब विद्यार्थ्यांचा हा गुन्हा राजद्रोहाइतका भयंकर समजला जातो, अशीहि जगाची रीत मला त्या विद्यार्थीदशेंत शिकतां आली. माझा शाळेंत पहिला नंबर असतो व त्यामुळें श्रीमंतांच्या मुलांचा अपमान होतो, ह्या माझ्या अपराधामुळें मला कांहीं घरीं माधुकरी बंद करण्यांत आली होती. त्या वेळीं मी मनांतल्या मनांत देवाला विचारीं, “ देवा, तूं मला पहिल्या प्रतीची बुद्धिमत्ता दिलीस, त्यामुळें मी अन्नाला महाग होत आहें, त्यापेक्षां तूं मला शुद्ध ‘ ढ ’ कां नाहीं निर्माण केलेंस ? ”

ह्या अपमानाच्या वेळीं परमेश्वरापाशीं माझी अनन्य भावनेनें अशी प्रार्थना होती कीं, परमेश्वरा, असली गरीबी वैऱ्यालाहि देऊं नकोस. ज्यांच्या अस्तित्वामुळें ब्रह्मांडाचा संसार दुःखमयच होईल, अशा नावडत्या जीवांनाहि तूं वेळीं मरण दे, पण गरिबी देऊं नकोस. ह्या गरीबीपायीं मानी जीवांना हलक्या जीवांसमोर लाचार व्हावें लागतें, पदोपदीं अपमान सहन करावा लागतो, धनवंतांच्या पायांतले पायपोससुद्धां सद्गुरूच्या पादुका म्हणून मस्तकीं धारण करावे लागतात ! जणूं काय साऱ्या शहाणपणाचा मक्ता देवानें धन-

वंतांना दिला असून अक्कलशून्यता तेवढी गरीबांच्या वांट्याला घातली आहे, ह्याच तत्त्वावर जगाचे सारे व्यवहार चालले आहेत !

मी माधुकरीचे शिळे तुकडे ताटांत वाढून घेऊन जेऊं लागलों म्हणजे माझ्यापुढें नेहमीं असा एक प्रश्न उभा राही; तो हा कीं, जगांतले सारेच जीव सारखेच सुखी किंवा सारखेच दुःखी कां नसावे ? परमेश्वर समन्यायी असून यच्च-यावज्जीव जर त्याचींच लेंकरें आहेत, तर एक गरीब व एक श्रीमंत असा त्यांच्यांत भेदाभेद कां असावा ? आम्ही गरिबांनींच काय त्याचें असें घोडें मारलें आहे ?

आईला एकदां मी हा प्रश्न विचारला, तेव्हां ती उत्तरली, " बाळ, तुझ्या-सारख्या कर्तबगार मुलावर जसा माझ्यासारख्या आईचा विश्वास असतो, तसाच देवाचाहि विश्वास असतो. तूं मनगटाच्या जोरावर श्रीमंतीचशी काय; पण स्वतांसाठीं नवी सृष्टीहि निर्माण करूं शकशील. तुला आयतें वैभव देवानें देणें म्हणजे तुझा अपमान करणेंच नव्हे काय ? ज्या दुबळ्या जीवांना वडिलोपार्जित वैभव व संपत्ति यांशिवाय तरणोपाय नाहीं, अशांनाच देव श्रीमंत लक्ष्मीवंतांच्या पोटीं जन्माला घालीत असतो. आम्ही दुबळ्या बायका नाहीं का घरांत बसून तुम्हां पुरुषांच्या जीवावर सुखें भोगतों; हा आमचा बाईलपणा व श्रीमंतांची श्रीमंती हीं सारख्याच दर्जाचीं आहेत. "

आईच्या उपदेशानें माझ्या आंगीं नवीन स्फूर्तीचा संचार होई. त्यामुळें मनुष्य हा आपल्या दैवाचा नियंता आहे, हा सिद्धांत माझ्या अंतःकरणांत सोळा आणे बाणला. त्या घटकेपासून मी माझ्या मनाची समजूत करून घेऊं लागलों कीं, गरिबी व लाचारपणा हीं कांहीं माझ्या पांचवीला पुजलेलीं नाहींत. माझे बाबा लाचार नव्हते, माझी आई लाचार नाहीं, मग मी तरी लाचार कुणासारखा होऊं ? माझाहि भाग्योदय होईल, इतकेंच काय, पण मी गरीब आहें म्हणूनच माझें भाग्य उदयाला यायचा विशेष संभव आहे. थोर गणल्या जाणाऱ्या कितीतरी विभूतींचीं चरित्रें माझ्या अवलोकनांत आलीं होतीं, त्यांचा अभ्युदय गरीबींतून झाला होता, असें कळतांच तर माझ्या गरिबीचा मला विषाद न वाटतां उलट अभिमान वाटूं लागला. समाजाचा, जगाचा, किंवा देशाचा उद्धार करण्याचें सामर्थ्य गरीबींतूनच थोर पदवीला चढलेल्या महात्म्यांच्या हातूनच तडीला जातें. परमेश्वराच्या पूजेचें केंद्रस्थान बनलेल्या

सुवासिक फुलांचा उगम मातींतूनच होत असतो. सृष्टिसुंदरी नक्षत्रमणिमाला-नवरत्नांचा हार घालून रात्रौ मिरवीत असते, त्या नक्षत्रांचा जन्म काळोखाच्या उदरींच होत असतो !

घरच्या गरिबीमुळें एखाद्या सणावारीं गोडधोड करतां आलें नाहीं, कीं आईला मेल्याप्रमाणें दुःख होई, हें मला तेव्हांच कळे. त्या वेळीं मी तिला धीर देत असें कीं, " आई, तूं जिवाला वाईट कां वाटून घेतेस ? मी मोठा होऊन चांगला लौकिक व पैसा मिळवूं लागलों, कीं माझ्यासारख्या शेंकडों दीन दुबळ्यांना सुग्रास अन्न घालीन, संसाराच्या गरजा भागविण्यांत त्यांना मदत करीन व त्यांच्या तोंडून तुला धन्यवाद देववीन. "

ह्यावर आई मला आशीर्वाद देत असे, " देव माझ्या बाळाला उदंड आयुष्य देवो; माझंहि आयुष्य तुला जावो ! "

* * * *

दिवसांमागून दिवस, महिन्यांमागून महिने व वर्षांमागून वर्षें अशी काळाची धांवपळ सुरू असतां, त्याच्या प्रवाहाबरोबर वहात वहात मीं आयुष्याचा अठरा वर्षांचा प्रवास पुरा केला, तेव्हां प्रवेशपरीक्षेंत पसार होऊन महाविद्यालयांतील दोन वर्षांचें शिक्षण, माझ्या पदरीं पडलें होतें. कशीबशी बी. ए. पयत तरी मजल न्यावी, असा त्या वेळचा माझा मनोदय असतांहि शारीरिक अस्वस्थता व दारिद्र्य या दुहेरी कैचींत मी अडकलों गेलों असल्याकारणानें व मदत दुसऱ्या कोणाचीच नाहीं, उलट आईचें पोट माझ्यावर अवलंबून, अशी स्थिति असल्यानें त्याच वेळीं मला शिक्षणाला रामराम ठोकावा लागला. दुसऱ्या दृष्टीनें विचार करतांहि सध्यांचें महाविद्यालयीन शिक्षण, हिंदी तरुणांचा जीवनव्यापार सुखानें चालविण्याला पुरेसें होईल अशी मला आशा नव्हती. संपत्ति व बुद्धिमत्ता यांचा ऱ्हास करणारा सुशिक्षित जुगार ज्याला म्हणतात, तेंच सध्यांचें शिक्षण होय अशी माझी ठाम कल्पना दिवसेंदिवस बनत चालली होती. ह्या माझ्या कल्पनेला अनंतराव पंडित या माझ्या मित्राच्या अनुमतीची जोड मिळाली होती. अनंताचा देशी उद्योगधंद्यावर विशेष भर होता. देशांतील कच्च्या मालाचा पक्का माल देशांतल्या देशांत तयार व्हावा, हरजिन्नस तयार करण्याचे कारखाने आपल्या देशांत देशी भांडवलांवर उभारले जावे, इतकेंच काय, पण परदेशची सुई-टांचणीसुद्धां आपल्या देशांत येऊं नये,

अर्थात् ही उणीव भरून काढण्याला समर्थ होण्याइतकी औद्योगिक शिक्षणाची वाढ आपल्या हिंदी राष्ट्रांत व्हावी, या कामीं आपण आपलें तन-मन-धन खर्च करणार असा त्याचा संकल्प होता. आमच्या दोघांबरोबर शोभणारा माझा तिसरा मित्र माधवराव पुरोहित हा होता. माधवाचें मत होतें कीं, शेतींतच हिंदी राष्ट्राचा अभ्युदय सांठविलेला आहे. देशांतील शेतकऱ्यांची स्थिति सुधारल्याशिवाय व शेतीच्या धंद्यांत सुधारणा झाल्याशिवाय, हिंदी राष्ट्राला बरे दिवस लाभायचे नाहींत, अशी त्याच्या मतें त्याची प्रामाणिक समजूत होती, व त्या समजुतीनुसार आपला आयुष्यक्रम आंखून त्यानें ॲग्रिकल्चरल् कॉलेजमध्यें प्रवेश केला होता. शेतीच्या धंद्यांतलें खरें मर्म केवळ येथल्या कृषिमहाविद्यालयांत अभ्यास केल्यानें यथातथ्य स्वरूपांत कळत नाहीं; यासाठीं अमेरिकेंत जाऊन आपण तें प्रत्यक्ष ज्ञान संपादन करणार, अशी माधवाच्या मनाची उडी होती; पण त्याचेंहि घोडें पैशामुळेंच अडलें. पुण्याचे एक गृहस्थ कर्ज देऊन त्याला अमेरिकेला पाठवायला एका काळीं तयार झाले होते, पण मोठ्या चमत्कारिक रितीनें माधवाला त्या मदतीला आंचवावें लागलें. त्या गृहस्थांचा एक मुलगा कलकत्त्याच्या मेडिकल कॉलेजांत शिकत होता, व त्याची बायको सासरींच होती. ती पोरगी थोडीशी—थोडीशी कां ? —बरीचशी चवचाल होती. तिचा चवचालपणा माधवाला रुचत नसे. एके दिवशीं ती माधवाला म्हणाली, “ माझ्या आईबापांनीं श्रीमंत नवरा मला पाहून दिला व ह्या वयांत आम्हां नवराबायकोंची ताटातूट केली, त्यापेक्षां तुमच्यासारख्या एकाद्या आश्रिताशीं लग्न लावून दिलें असतें, तरी माझा संसार सोन्याचा झाला असता. ” ह्या गोष्टीची माधवाला चीड आली, व त्यानें त्या मुलीच्या सासऱ्याला ही गोष्ट सांगितली. अर्थातच या वेळीं आश्रिताला शोभणाऱ्या तोंडपुज्या वृत्तीची त्यानें मुर्वत बाळगली नाहीं. हा त्याचा बाणेदारपणा येनकेनप्रकारेण त्याला नडून तो त्या गृहस्थाच्या आश्रयाला महाग झाला. ह्या जगांत सच्चेपणाचें हें असें मोल मिळतें !

अमेरिका आज नाहीं तर नाहीं; पण इथला शिक्षणक्रम आटोपून आपण इथेंच शेतीचा धंदा नांवारुपाला आणूं, असा माधवाचा मानस होता. अनंत व माधव यांच्याप्रमाणें माझीं मतेंहि उद्योगधंदे व शेती या बाजूचींच होतीं; पण त्या कामीं प्रत्यक्ष देह झिजविण्याची माझी तितकी उत्कट इच्छा नव्हती.

दुसरें, त्यांच्याइतका शरिरानें मी धट्टाकट्टाहि नव्हतों. त्यापेक्षां देशांतील निरक्षर वर्गाला साक्षर करून त्याच्या आंगीं माणुसकी आणणें, नागरिक ह्या दृष्टीनें त्यांचे हक्क काय याची जाणीव त्यांच्या मनांत उत्पन्न करणें, योग्य त्या समाजसुधारणा घडवून आणणें, निरनिराळ्या जातींत व लोकांत परस्पर सहकारितेची प्राणप्रतिष्ठा करणें, साहित्यसेवा करणें, अशा गोष्टींकडे माझ्या मनाचा विशेष कल होता. एकूण काय, आमचे तिघांचेहि हेतु एकच; त्यांची सांगता करण्याचे मार्ग मात्र निरनिराळे !

आम्हां तिघांप्रमाणेंच देशाचें दुर्दैव रसातळाला नेण्याच्या कामीं आपल्या देहाचें सार्थक करावयाचें, अशा संकल्पाचें आमचें एक भगिनिद्वय होतें. पैकीं माझी एक सख्खी चुलत बहीण नलिनी, व दुसरी लीला. लीला ही कांहीं आमच्यापैकीं एखाद्याची रक्ताची बहीण नव्हती; पण तिला आम्ही परकी मानीत नसूं. नलिनी ग्रँट मेडिकल कॉलेजांत चौथ्या वर्षांत होती; ती कुंवार होती, पण लीला मात्र विचारी बालविधवा होती. तिला मुंबईच्या एका विधवानिवासाचा आश्रय करणें प्राप्त झालें होतें. ती विधवानिवासांत आली तेव्हांच तिच्या कडेवर एक तान्हें बाळ होतें. खरेंच सांगायचें, तर लीलेला कांहीं तो मुलगा शोभत नसे. चौदा वर्षांच्या पोरीला मातृपद प्राप्त झालें तर तें तिला शोभावें कसें ?

नलिनीच्या मनांतून माधवाशीं लग्न करावयाचें होतें; पण माधवाची इच्छा तर अशी होती कीं, आपण आजन्म ब्रह्मचारी रहाणार ! माझीहि इच्छा अशी होती कीं, माधवाचें अर्धांगीपद नलिनीला प्राप्त व्हावें. समानशीलाच्या वधूवरांची लग्नगांठ मारली गेल्यावर त्या संलग्न जीवांच्या हातून देशाचें दुर्दैव बरेंच फिटलें असतें. अशा परोपरीच्या आढ्यावेढ्यांनीं मी माधवाला सांग सांग सांगितलें कीं, तूं नलिनीला पदरांत घे. पण रामाचें नांव ! नलिनी तर रोज माझी पाठ पुरवीत असे कीं, माधवरावांना लग्नाला तयार करा. पण मी कसा तयार करूं ? मी स्वतां नवरा मुलगा थोडाच आहें तो हातीं माळ घेऊन उभा राहूं ?

लीलेचें मत पुनर्विवाहाच्या बाबतींत अद्यापि कांहींच निश्चित असें ठरलेलें नव्हतें. 'पुनर्विवाह करीन' असा निश्चय तिला विधवा-निवासाची पायरी चढतांनाच करावा लागला होता खरा; पण तो निश्चय तिनें खरा केला होता कीं खोटा, परमेश्वर जाणे !

# निळकंठ (१)

माझे मामा मुंबईला औषधें व आम्लद्रव्यें-ॲसिडें यांचे कारखानदार होते. त्यांच्याबरोबर त्यांची एक आते-मेहुणी मनोरमा या नांवाची होती. ती अनंताला आवडत असे. तो तिला शिकवायलाहि जात असे. मामांचा मात्र या बाबतींत काय मनोदय होता, तें त्यांचें त्यांनाच ठाऊक. एवढें मात्र खरें कीं, मनोरमा वयाच्या तेराव्या वर्षापासून मामा-मामींच्या पंखाखालीं वाढली होती, व त्यांना मूलबाळ नसल्याकारणानें मनोरमेच्या आईबापांनीं ती मामा-मामींना दत्तक दिल्यासारखीच होती. अर्थात् ती कुणाला द्यावी किंवा कुणाला न द्यावी हा सर्वस्वी मामा-मामींच्याच मतावर अवलंबून होता.

* * * *

आमच्या मित्रमंडळीचा खडाजंगीचा मतभेद जर कुठें होत असेल, तर तो लग्नाच्या बाबतींत. माधव तर प्रति माल्थस् होता. हिंदुस्थानांत खादाड मानवी किड्यांची रेलचेल झाली असून त्यांना पुरेसें अन्नवस्त्राहि आज मिळत नाहीं, अशा स्थितींत आम्ही गरीब तरुण लग्न करून ' खायला काळ व भुईला भार ' अशी नेभळी लोकसंख्या निर्माण करणें, हा केवळ कृतघ्नपणा आहे. यामुळें आम्ही एका भिकाऱ्याच्या जागीं चार भिकारी निर्माण करून ठेवतों. आम्ही गरीब, आम्ही भिकारी, म्हणून आजच आमच्या बायकांपोरांना आम्हांला पोसतां येत नाहीं, मग अशा भिकाऱ्यांना-आम्हांला नवे भिकारी जन्माला घालण्याचा काय अधिकार पोंचतो ? ही आपत्ति वेळींच दूर झाली नाहीं. तर देशांत अन्नवस्त्र व झाडपालाहि दिवसेंदिवस महाग होऊन माणसें माणसांना खाऊं लागतील. यासाठीं जन्माला आलेल्या प्रत्येक हिंदी स्त्री-पुरुषाला जर एखादें महत्कृत्य करावयाचें असेल, तर त्यानें अविवाहितच राहावें, असें माधव म्हणे.

ही माधवाची विचारपरंपरा ऐकून आम्हांला विषाद वाटे, त्यापेक्षां नलिनीला जास्त विषाद वाटे. एखादे वेळीं तिचे डोळे अश्रूंनीं भरूनहि येत. नलिनीची माधवाकडे पहाण्याची दृष्टि आमच्या दृष्टीपेक्षां निराळी होती. आपली पतिदेवता माधवाच्या देहांत मूर्तिमंत प्रतिबिंबित झालेली तिला दिसत होती; पण ती त्या मूर्तीला कडकडून भेटण्यासाठीं पुढें जाई, तोंच माधवाच्या विक्षिप्त विचारांचें कांटेरी कुंपण तिच्या आंगाला बोंचून तिला अडवीत असे !

अनंताचीं मतेंहि साधारणतः माधवासारखींच होतीं; परंतु लग्न करावें कीं

न करावें, ह्याविषयीं त्याचें मत धरसोडीचें होतें. मनोरमा त्याला आवडे, याचा अर्थ तरी काय ? तिच्यासारखी अर्धांगी मिळाली तर आपला संसार सुखाचा होईल, अशी त्याला अंधुक आशा होती, इतकेंच. पण माधवाच्या विचारांचा पगडा वारंवार त्याच्या विचारांवर बसत असल्यानें लग्न करावें किंवा न करावें, या बाबतींत त्याचें मन बारगळल्यासारखें झालें होतें.

मी स्वतां माधवाचा अनुयायी होतों खरा; पण खरेंच सांगायचें तर मनः-संयमनाच्या बाबतींत माझ्यासारखा कुचकामाचा मीच होतों. ह्या जगांतील संसारामधील खारट–तुरट कळूं लागल्यापासून आपण संसारी व्हावें, असें मला वाटे. अविवाहित राहून मला नीतिमत्तेनें आयुष्य कंठतां येईल, अशी माझी मलाच खात्री नव्हती. माधव मात्र या बाबतींत पक्का फत्तर होता. तो ज्या-त्या वेळीं मला लग्न न करण्याचा आग्रह करी.

एके दिवशीं मी त्याला स्पष्ट सांगितलें कीं, "पहा बरें माधव, तुझ्या उप-देशाप्रमाणें मी लग्न केलें नाहीं, व माझें वांकडें पाऊल पडलें तर त्याच्याबद्दल तूं जबाबदार आहेस."

माधव यावर मला म्हणाला, "कसली रे असली भागूबाईसारखी भीति घालतोस ? ज्याला स्वतःच्या मनावर व इंद्रियांवर ताबा ठेवतां येत नाहीं, ते राज़श्री लोकांचे पुढारी होऊन लोकांच्या मनावर ताबा ठेवून त्यांना आडवाटेचे वाटेला काय लावणार तें त्याचें तोंडच सांगतें आहे !"

"आणि ज्यानें त्यानें असा अविवाहित रहाण्याचा पण केला तर उत्पत्ति-स्थिति–लयाची विश्वाची रहाटी तरी कशी चालेल ?" मीं विचारलें.

"त्याची काळजी वहाणारे तुझ्यासारखे विश्वाचे कैवारी आहेतच." माधव उत्तरला.

असले त्याचे माथेफिरूपणाचे बोल ऐकून मी व अनंत दोघेहि त्याला माल्थस्‌चा समंध म्हणत असूं. माल्थस्‌ बिचारा मेला व त्याच्यानंतर किती-तरी वर्षांनीं आज त्यानें हा हिंदुस्थानांत नवा अवतार घेतला !

आजन्म अविवाहित राहणें बहुजनसमाजाला शक्य नसलें, तरी ज्यांना आपल्या हिंदुस्थानचें थोडेंफार कल्याण करावेंसें वाटतें, व ज्यांच्या बुद्धिम-त्तेला ह्या गोष्टी अशक्य नाहींत, त्यांनीं तरी स्वतःला संसाराच्या गाड्याला जुंपून न घेतां एकाकी राहावें, व आपल्या कोट्यवधि देशबांधवांना आपल्या

बुद्धिवैभवाचा पुरेपूर उपयोग होऊं द्यावा, असें माधवाप्रमाणें मलाहि वाटे. विवाहग्रंथीनें बद्ध झाल्यावर बायकापोरांचा निर्वाह करतां करतां स्वतःला संसाराच्या धडाडलेल्या अग्निकुंडांत परोपकारी व देशोपकारी विचारांची आहुति द्यावी लागेल, असें मला भयहि वाटे; पण या गोष्टी जितक्या सोपेपणानें मला लोकांना सांगतां येतात, तितक्याच स्वतां आचरणांत आणतांना माझ्यासारख्या भावनाप्रधान व चंचल वृत्तीच्या तरुणाला जड जातात, हें माझें पाप मी माझ्या मनांत पुरतेपणीं ओळखून होतों.

अनंत व माधव यांच्या उद्देशाला मूर्त स्वरूप यावयाला थोडासा कालावधि होता; पण आज माझा अभ्यासक्रम कुंठित झाल्यानें मात्र माझ्या उद्देशाला प्रत्यक्ष स्वरूप देण्याची जबाबदारी माझ्यावर येऊन पडली. विद्याभ्यासासाठीं मुंबईत असल्यावेळीं मी महाराष्ट्रांतील राजकीय व सामाजिक संस्थांची कार्यपरंपरा विहंगम दृष्टीनें अवलोकन केली होती, व कांहीं कांहीं संस्थांतून तर प्रत्यक्ष कार्यहि केलें होतें. त्या वेळचा माझा अनुभव असा होता कीं, देशसेवा काय किंवा समाजसेवा काय, सध्यां जो या दोन सेवावृत्तींचा बोलबाला केला जातो, हें बहुतांशीं थोतांड आहे. या लोकांतून महात्मा गांधींसारखे सत्यवादी, कर्व्यांसारखे समाजसुधारक, व लोकमान्य टिळकांसारखे ज्वलज्जहाल कर्मयोगी वजा केले, तर जो कचरा उरेल, त्याची किंमत खऱ्या नाण्याच्या बाजारांत फुटकी कवडीहि यावयाची नाहीं. फार दूर कशाला ? लोकमान्य टिळकांच्या, गांधींच्या किंवा कर्व्यांच्या मागें अनुयायांची एवढी मोठी लांबच लांब प्रभावळ आहेना ? पण त्या प्रभावळीकडे पाहून मला वारंवार शंका वाटे कीं, हे किंवा यांच्या तोडीचे स्वयंभू अवतारी पुरुष नियतीला अनुसरून ह्या नश्वर देहाचा त्याग करून गेल्यावर त्यांच्या अमृतोपदेशाचे अंगारे धुपारे त्यांच्या प्रभावळींत शाळिग्राम व नर्मदे गणपति म्हणून मिरविणाऱ्या दगडांच्या भजनानें गुणाला कसे येणार ? ह्या बोलघेवड्यांनीं व्यासपीठावर उभें राहून मारे बडबड करावी, सभा भरवाव्या, सम्मेलनें भरवावीं, सालोसाल तेच तेच ठराव जोरदार भाषेंत पास करून घ्यावे, व घरीं आल्याबरोबर ते विसरावे, हीच यांची इतिकर्तव्यता !

दुसरी गोष्ट, कोणतीहि सामाजिक किंवा राजकीय सुधारणेची लोकजागृति करणें असेल तर ती शहरांतल्या शहरांत बसून कशी होईल ? त्यासाठीं

खेडोखेडीं संस्था स्थापन झाल्या पाहिजेत, व पुण्यामुंबईसारख्या व्यासपीठांवर उभे राहून बडबड करणाऱ्या बोलबत्ताशांनीं खेडोखेडीं जाऊन आपल्या ज्ञानाचा फायदा लोकांना करून दिला पाहिजे. हें कार्य करण्याला अंतःकरणापासूनची कळकळ लागते, ती नाहीं म्हणून तर कोणत्याहि संस्थेचें कार्य व्हावें तसें यशस्वी होत नाहीं.

असली सवंग लोकप्रियता आपण मिळवायची नाहीं, असा माझा निर्धार होता. कोणतीहि सुधारणा करायची असेल, तर तिचा उपक्रम शहरापासून खेड्याकडे असा न होतां, खेड्यापासून शहराकडे झाला पाहिजे, असें माझें ठाम मत होतें. ह्या उद्दिष्टानुसार मी प्रथम माझ्या जन्मभूमींत जाऊन त्या एका खेड्याला नांवारूपाला आणण्याचा निश्चय केला.

* * * *

माझें पोरवयच पडलें, तेव्हां मी माझ्या खेड्यांत जाऊन काय दिवे लावणार असें ज्याला त्याला वाटलें, व प्रथमच मला पुष्कळांनीं निराशहि केलें. 'मी मी म्हणणाऱ्या लोकांची डाळ शिजत नाहीं, तिथें हें अठरा वर्षांचें कोवळें पोर जाऊन काय ध्वजा फडकवतें पाहूं!' असा जो उठला तो आपल्या मिशीवर ताव देत होता. त्यांना मी एवढेंच उत्तर देईं कीं, खेड्यांत जाऊन मी काय करणार हें जर तुमच्यासारख्या उनाड वृत्तीच्या अविचारवंतांना नुसता वरवर विचार करून कळूं लागलें, तर तिथें माझ्या प्रत्यक्ष कार्याची आवश्यकता ती काय उरली ? असल्या गोष्टी सामान्य लोकांच्या ध्यानीं प्रथमच येत नाहींत, हीच त्यांच्यामधली गोम होय. या लोकांनीं मला वेडा ठरविलें यांत नवल तें काय ? पण ब्रह्माण्डाची उत्पत्ति होण्यापूर्वी सर्वसामर्थ्यवान् परमेश्वर त्यांच्यापाशीं आला असता व तो त्यांना ब्रह्माण्डरचनेची आपली योजना सांगता, तर त्या परमेश्वरालाहि यांनीं असाच वेड्याच्या मालिकेंत गोंवला असता.

असल्या कसल्याच विरोधाची पर्वा न बाळगतां मी माझ्या खेड्यांत जाऊन राहिलों, व प्रथम निर्वाहाचें कांहीं साधन पाहिजे म्हणून आमची वडिलोपार्जित जमीन ज्या सावकारापाशीं गहाण होती, त्याच्यापासून ती मक्त्यानें घेऊन प्रथम पहिला नांगर धरला. दोन पिढ्यांपूर्वी आमच्या गांवापैकीं चौदा आणे हिस्सा व शिवाय सभोंवारचे पांच गांवहि आमच्या मालकीचे होते, असा

दाखला आमच्या कागदोपत्रीं आहे. पण आज त्या सहा गांवचा मालक जो मी तो स्वतांच्या पोटापुरतें धान्य पिकविण्यासाठीं लोकांकडे जमीन याचीत आहें, ही कल्पना मनांत येतांच मला काय वाटलें असेल याची लोकांनींच अटकळ बांधावी ! तीन पिढ्यांपूर्वींचे आम्ही त्या गांवचे धनी, व आज मी त्या गांवच्या धन्याचें कूळ ! परमेश्वरा, तेव्हांचें माझें धनीपण तूं कां हिरावून घेतलेंस व आजची कूळपणाची धन्याची ताबेदारी माझ्या वांट्याला कां आणलीस ?

पहिल्या पहिल्यानें मला शेतांत नांगरहि धरतां येईना; पण आमचा सुशिक्षित शेतकरी माधव माझ्याबरोबर कांहीं दिवस असल्याकारणानें मला कांहींच शिकण्याची अडचण पडली नाहीं. त्यानें मला जरूर तेवढ्या साऱ्या गोष्टी शिकविल्या, व जमिनीचा मगदूर पाहून जमिनीला कोणतें खत योग्य होईल, तें ठरवून तेंहि मला मिळवून दिलें. आपले अनंतराव बी. एस् सी. होऊन विलायती खतांच्या तोडीचीं खतें घरच्या घरीं तयार करूं लागेपर्यंत आम्हांला विलायती खतेंच घेणें प्राप्त होतें.

शेतीसारख्या कामाला मनुष्यबळ लागत असतें, व तें मला घरच्या घरींच मिळण्यासारखें होतें. माझे वडील बंधु यावेळीं सातारच्या एका बड्या जमीनदारापाशीं त्याच्या शेतीची व्यवस्था करण्यासाठीं नोकरीवर होते. त्यांचें व माझें बाळपणापासून पटत नसल्याकारणानें त्यांची मला तशाच महत्त्वाच्या प्रसंगाशिवाय आठवणहि होत नसे, व त्यांनीं तर माझें व आईचेंहि नांव सोडलें होतें !

पण आतां तरी ते माझ्या शब्दाला मान देतील व घरच्या घरीं येऊन राहूं लागून मला मदत करतील, अशी आशा धरून त्यांना मीं बोलावलें. याच सुमाराला माझ्या पहिल्या-वहिल्या शेतवाडींतलें पीक गांवांतल्या इतर पिकांच्या चौपट चांगलें आलेलें पाहून गांवांत माझी थट्टा करणारे लोकहि माझ्याकडे सहानुभूतीच्या दृष्टीनें पाहूं लागले. ही शेती या स्वरूपाला मी माझ्या आंगमेहनतीनें आणलेली आहे, व लोकांची शेतीहि अशीच सुधारावी, यासाठीं त्यांना या प्रकारचें शिक्षण देण्याची आमची योजना आहे, असें कळतांच आमच्या सावकारानें त्या गांवांतील सारी जमीन फारच माफक साऱ्यानें मला वहिवाटीला देण्याचें वचन दिलें.

आजूबाजूंच्या लोकांची कल्पना होती कीं, * * * गांव भांडणतंटे व

कज्जेकफावती यांच्यापायीं रसातळाला गेला; पण मी आमच्या गांवची अब्रू राखण्याला पुढें सरसावल्यावर ते लोकापवाद बंद झाले. बिचारे अशिक्षित शेतकरी लोक! त्यांना मी बरोबरीच्या नात्यानें वागवूं लागतांच इंद्राच्या सिंहासनावर नेऊन बसविल्याप्रमाणें वाटे. त्यांच्या अंगचा अशिक्षितपणा घालविण्यासाठीं त्यांना साक्षर करणें हें माझें काम होतें, व गांवच्या कांहीं पुढाऱ्यांची या कामीं मला मदतहि होती. त्यांच्या मदतीनें मी गांवच्या गांवीं शेतकऱ्यांच्या मुलांसाठीं एक मराठी शाळा काढली. ह्या माझ्या शाळेचा कार्यक्रम इतर शाळांच्या कार्यक्रमाशीं जुळता नव्हता. ज्याला त्याला व्यवहारापुरतें लिहितां वाचतां येऊं लागावें असा थोडा व सोपा शिक्षणक्रम मी ठेवला होता, व तो दिवसेंदिवस यशस्वी होत होता. यामुळें गांवची सरकारी शाळा मोडकळीला आली, व इकडे माझ्या शाळेंत इतकीं मुलें जमलीं, कीं त्यांची व्यवस्था ठेवतां ठेवतां माझी मलाच पुरेवाट झाली!

सोईवार शाळा काढल्यामुळें शेतकऱ्यांच्या मुलांच्या शिकण्याची सोय झाली खरी; पण त्यांचें दैन्य कांहीं मंत्रासारखें चुटकीसरसें दूर करतां येत नव्हतें; व लोक तर कर्जानें इतके गांजलेले पाहिले कीं, ज्याचें त्याचें शेतांत पिकणारें धान्य गतवर्षीच्या कर्जाचें व्याज वारतां वारतां सालमजकुरीं बेगमीच्या वांट्याला येतच नसे. जवळ चार पैसे बाळगणाऱ्या सावकारांचें मात्र उखळ यावेळीं पांढरें होत असे. शेतकरी अडला, त्याला हंगामीं शेतीसाठीं बैल घ्यायचा झाला कीं, बिचारा सावकाराकडे धांवला. त्याला गरज व सावकाराला आढ्यता म्हणून त्यानें उभ्या पिकावर सवाईनें पैसे वसूल करून घेण्याच्या करारावर सावकाराचे पैसे कर्जाऊ काढावे, व तीन महिन्यांनीं शेतांत पीक तयार झाल्यावर सावकारानें शंभर रुपयांबद्दल सव्वाशें रुपये उभ्या पिकावर कापून घ्यावे! इतकें जबर व्याज द्यावें लागल्यावर शेतकरी लोक बिचारे अन्नवस्त्रावांचून कां तडफडणार नाहींत!

ही सामान्य शेतकरी लोकांची दैना दूर व्हावी म्हणून मी लोकांना पतपेढीची कल्पना समजावून सांगितली, व ती त्यांना पसंत पडून गांवच्या गांवीं आम्हीं एक पतपेढी उघडली. गांवच्या साऱ्या शेतकऱ्यांनीं शेरशेर पायलीपायली धान्य जमवून आपापल्या वांटणीच्या हिश्याची रक्कम फेडली, व पतपेढी मोठ्या भरभराटीनें चालूं लागली. ही योजना शेतकऱ्यांच्या

उदरीं आली खरी; पण त्यामुळें शंभर रुपयांचे सव्वाशें रुपये करणाऱ्या काळस्वरूपी सावकारांच्या व्यापाराला मात्र खो बसला, व ते माझ्या नांवानें खडे फोडूं लागले. ह्या सावकार मंडळींत दिनकरराव हे एक होते. काय ग्रहगुण असेल तो असो; पण दिनकररावांच्या घराण्याशीं आमच्या घराण्याचें पिढीजात वैर होतें. बायकाबायकांत तितका उभा दावा नसेल कदाचित्; पण पुरुषांपुरुषांत तर घडोघडी यादवी माजे, व ती मजा लोकांना पहायला मिळे. याच दिनकररावांचे धाकटे बंधु गुणवंतराव माझ्या मामांचे भागीदार होते. गुणवंतराव जपानच्या विश्वविद्यालयांतून शिकून आलेले पदवीधर होते. त्यांच्या धंद्यांत त्यांचा हातखंडा होता. त्यांच्या इतर खाजगी बाबतींत मला बोलण्याचा काय अधिकार!

पहिल्या पहिल्यानें मी गांवीं आलों तेव्हां दिनकररावांनीं मला जसें कांहीं वरच्यावर झेलून धरलें. त्यांना ब्राह्मणांचा व त्यांतल्या त्यांत आम्हां कऱ्हाड्या ब्राह्मणांचा तर फारच अभिमान होता. त्यामुळें आमच्या जातींतील एखादा मुलगा शिकून सवरून तयार झाला, कीं त्यांना आनंद वाटे, व त्या आनंदाचें पर्यवसान माझ्या बाबीपुरतें तरी मला आपला जांवई करण्यांत करून घ्यावें, अशी त्यांची इच्छा होती. या बाबतींत आईनेंहि बराच पुढाकार घेतला होता. त्यांच्या कुटुंबाशीं त्यांचें पटत नसे, म्हणून सरस्वतीबाई नेहमीं मुंबईला गुणवंत-रावांकडे रहात असत. अर्थात् यमुना त्यांची मुलगी म्हणून तीहि त्यांच्या-बरोबरच मुंबईला राही. मी मुंबईला असतांना यमुना माझ्यापाशीं इंग्रजी शिके, व ती मला आवडण्यासारखी होतीहि. सरस्वतीबाई आपल्या नवऱ्याला सोडून दिरापाशीं रहातात, या गोष्टी लोकांच्या डोळ्यांना चमत्कारिक दिसत, पण जगाच्या ह्या नसत्या उठाठेवी मी कशाला करूं!

त्या वर्षी दिनकररावांचे पैसे सवाईच्या व्याजानें शेतकऱ्यांनीं फारच कमी घेतले; यामुळें दिनकरराव चौताळून एके दिवशीं माझ्या घरीं येऊन मला म्हणाले, "निळकंठ, आम्हां गांवच्या गांवकऱ्यांना घरें डोकीवर घेऊन देशोधडीला लावून देण्याचा तुझा विचार आहे कीं काय?"

आईनें मध्यें पडून विचारलें, "काय झालें हो दिनूअण्णा?"

दिनकरराव जास्तच संतापून म्हणाले, "हे तुझे चिरंजीव मोठे इंग्रजी शिकून आले गांवची सुधारणा करायला! यानें गांवचा ब्राह्मण व महार एका

दर्जाचा करून सोडला आहे. मोठी लोकांची कळकळ आली म्हणून पतपेढी काढली. याच्या फुसलावणीनें कुळें आम्हां धन्यांना मोजीत नाहींत. या वर्षी माझा सवाईचा हिशेब पुऱ्या पांच खंडींचाहि नाहीं. तोंच ही ब्याद गांवीं यायच्या पूर्वी मी सालाला बारा खंडींची सवाई घेत असें."

मीं हंसत हंसत विचारलें, "तुमचें एकाचें नुकसान झालें खरें; पण त्याबरोबरच गांवच्या शेंकडों गरीब शेतकऱ्यांच्या पोराबाळांच्या तोंडांत अन्नाचा घांस पडलाना ? बरें, तुमची कांहीं अशी स्थिती नाहीं कीं, तेवढ्या सवाईच्या भातावरच तुमचा संसार अडून राहिला आहे! शिवाय तुम्हांलाहि मुलगा नाहीं, तुमची संपत्ति कुणीतरी वारस एकट्यानें खाऊन जाणार, त्यापेक्षां तिच्यावर गोरगरिबांचें कल्याण झालें तर तें तुम्ही कां करीत नाहीं ?"

आईचें यापूर्वी दिनकररावांशीं काय बोलणें झालें होतें नकळे; ती मला म्हणाली, "त्यांची संपत्ति पुढें तरी तुम्हां लेंकरांच्याच वांट्याला येणार ना ? तुला पैशाची ओकारी आली असली तरी यमुना तुझ्याशीं लग्न लावून तुझ्या नांवानें बाटल्यावर ती बरी तुझ्यासारखी घरादारावर तुळशीपत्र ठेवील ?"

यावर दिनकरराव कांहींच न बोलतां रागावल्यासारखे होऊन चालते झाले. आईनें बोलून दाखविलेली घरजांवयाची कल्पना त्यांना रुचली असावी. मी यमुनेशीं लग्न करीन, या भावी योजनेसाठीं त्यांनीं आज माझी भीड राखली, इतकेंच.

आईचा विचार म्हणजे सून कधीं एकदां घरीं येते, ती आपल्याला 'सासूबाई' म्हणून कधीं हांक मारते, आणि आमचा संसार थाटल्यावर 'गोजिरवाणा गुलामडा लबाड' नातू खेळवायला केव्हां सांपडतो ! ही तिची इच्छा वडील बंधूंच्या आयुष्यांत पूर्ण झाली होती, व मीहि लौकर लेंकुरवाळा व्हावें, यासाठीं 'लग्न कर' 'लग्न कर' असें एकसारखें टुमणें तिनें माझ्यामागें लावलें होतें. हें लग्नाचें 'होय–नाहीं' आम्हां मायलेंकरांत रोज चाले. यमुनेसारखी एखादी नवरीमुलगी सांगून आली, व नवऱ्या मुलाच्या अकलेकडे पाहून— कारण रुपाकडे पाहून म्हटलें तर चेहेरा मोठा सुंदर आहे, अशांतला प्रकार नाहीं, व संपत्तीकडे पाहून म्हणेन तर ती दों दारांनीं ओतते आहे अशांतलाहि प्रकार नाहीं ! जरा अधिकउणा हुंडा देऊं केला कीं, माझ्या निळूला अमक्याची मुलगी सांगून आली, व मुलीचा बाप दोन्ही मांडवांचा खर्च

करून नवरी मुलीच्या आंगावर हजारांचे दागिने घालायला तयार आहे; पण हाच कर्मदरिद्री होय म्हणत नाहीं ना! अशी प्रौढी चार चौघांत मिरवतांना तिला धन्यता वाटे.

मी आरंभिलेल्या कार्यांत मला कसकसें यश येत आहे, गांवच्या रयतेचा मला कसा पाठिंबा मिळत आहे, व गांवची स्थिति दिवसेंदिवस सुधारत असून, खऱ्या कर्तबगारांना आपली कर्तबगारी दाखवायला खेडोपाडींहि किती उत्तम जागा आहे, वगैरे गोष्टी मी पत्रद्वारा वडील बंधूंच्या अंतःकरणांत ठसविल्यावर, हें आहे तरी काय गौडबंगाल, तें पहाण्यासाठीं ते साताऱ्याहून घरीं येण्याला निघाले. याच सुमाराला मामांचेंहि मला अकस्मात् कधीं नव्हत्याचें पत्र आलें कीं, आपण, वीणामामी व मनोरमा यांना घेऊन हवापालट करण्यासाठीं चार दिवस इकडे येणार! अशा प्रकारें एका रक्ताचा सारा गोतावळा एके ठिकाणीं जमण्याचा हा अपूर्व योग पाहून मला पराकाष्ठेचा आनंद झाला.

दुसऱ्या दिवशीं दिनकरराव आमच्या घरीं येऊन आईला सांगूं लागले कीं, "गुणवंतरावांची तार आली आहे, ते सरस्वतीबाई व यमुना यांना घेऊन उद्यांच्या बोटीनें इकडे येणार."

किती अपूर्व योगायोग हा!

* * * *

ठरल्या दिवशीं दादा, वैनी व दादाचा लहानगा मधुकर हीं एका बैल गाडीनें, व मामा, वीणामामी व मनोरमा हीं बोटीनें बंदरावरून आमच्या घरीं येऊन उतरलीं. गांवच्या लोकांच्या मनांत माझ्याविषयीं इतका आदर होता कीं, निळकंठरावांची पाहुणेमंडळी येणार असें कळतांच त्यांना सामोरे जाऊन ट्रंक-बिछाना डोकीवर घ्यायला दोन सोडून दहा गडी मीं न सांगतां गाडीसमोर जाऊन उभे राहिले. वाटेंतच वैनीचा घरांत हात लागेनासा झाल्यामुळें ती निराळ्या गाडींतून मागाहून येत होती. वाटेंत मधुकर दादाकडे आला होता, त्याला दूध पिण्याची हुक्की येतांच तो 'आई, आई' करून रडूं लागला, त्याबरोबर शेजारीं घर करून राहिलेल्या एका कुणब्याच्या बायकोनें धांवत येऊन मधुकराला घेतलें व आपल्या मुलाला बाजूला ठेवून प्रथम त्याला पाजलें. कुणा मुलाच्या कुणा आईनें आपल्या मुलाला कंवटाळावें, हा प्रभाव गांवकऱ्यांची

निळकंठावर जी माया आहे, तिचा आहे, हें दादाच्या ध्यानीं तेव्हांच आलें.

माझा मी घरचा एकटा, पण मी माझ्या आंगच्या ममताळूपणानें सारे गांवकरी पाठच्या बंधूप्रमाणें जोडून ठेवले होते, त्यांनीं मला कशाचीच उणीव भासूं दिली नाहीं. इतकेंच काय; पण जेव्हां जेव्हां म्हणून संधि सांपडे, तेव्हां तेव्हां क्षणोक्षणीं दादाच्या व मामांच्या तोंडावर माझी स्तुति करण्यांत जो तो चूर झालेला! इतका माझ्या गांवच्या कामकऱ्यांचा माझ्यावर अलोट प्रेमा असलेला पाहून दादा मला एका बाजूला बोलावून म्हणाला, " निळू, आतांपर्यंत तुझ्या प्रत्येक कामाला मी नांवें ठेवीत आलों व आजवर तुझी अवहेलना केली, त्याबद्दल मला क्षमा कर. "

दादाच्या तोंडचे हे प्रसन्न वृत्तीचे उद्गार ऐकून माझ्या मनाला किती आल्हाद वाटला, याची व्याख्या करण्यापेक्षां न करण्यानेंच त्याची खरी व्याख्या होणार आहे. मी त्याला विचारलें, " पण दादा, आतां तूं इथेंच घरीं राहाणार ना ? "

इतक्यांत मामा आमच्यापाशीं आले व मला विचारूं लागले, " बंधूबंधूंचीं कसलीं खलबतें चाललीं आहेत ? "

दादा उत्तरला, " मामा, निळकंठाच्या आंगीं जो हा लोकसेवेचा नैसर्गिक गुण आहे, त्याला अनुभवाची जोड मिळावी, व शिक्षणांतील मान्यतेचा शिक्का मानला जावा म्हणून त्यानें पदवीधर होणें अवश्य आहे, नाहीं का ? "

या प्रश्नाचें उत्तर देतांना मामांची बरीच कुचंबणा झाली. कारण, मी महाविद्यालयांत शिकत असतांना केवळ पैशाच्या अडचणीमुळें मला तो मार्ग सोडावा लागला, त्या वेळीं मामांनीं मला मदत करण्याचें मनांत आणलें असतें तर ती त्यांना सहज करतां आली असती, ही त्यांची स्वतःची चूक त्यांना या क्षणीं आठवली असावी. ती चूक सुधारण्याच्या इच्छेनें मामा म्हणाले, " याच्या आंगीं इतकी पात्रता असेल हें कुणाला माहीत ? आमची अशी कल्पना होती कीं, इतकीं मुलें परीक्षा देऊन पदवीधर होतात, त्यांतलाच हाहि एक होणार. "

" मग आतां यानें काय करावें असें तुमचें मत आहे ?" दादानें विचारलें.

मामा उत्तरले, " माझ्या मतें यानें प्रथम आमच्या घरच्या कारखान्यांत राहून काम शिकावें, तेवढ्यांत साधला तर इंटर सायन्सचा कोर्स घेऊन

बी. एस्‌सी. व्हावें, व मग एकवार जपान किंवा अमेरिका या देशांत जाऊन धंदेशिक्षण घेऊन यावें. ”

दादाला ही योजना पसंत पडली. त्यानें मला माझें मत विचारलें; पण माझें मत मी काय सांगूं! कर्म माझें! माझ्या चित्ताचा सारा लय माझ्या खेड्याच्या सुधारणेकडे लागला होता. त्यांतूनहि समाजसुधारणा व साहित्यसेवा हे विषय माझे जीव कीं प्राण! यामुळें कांहीं झालें तरी माझें खेडें सोडून जायला माझें मन तयार होईना. मीं दादाला व मामांना विचारलें, “मी पुन्हां मुंबईला येऊन शिक्षणाच्या उद्योगाला लागलों, व इकडे माझ्या खेड्याची अनास्था झाली तर? मग ह्या खेड्याचें नंदनवन कोण बनवील? इथल्या लोकांची पतपेढी कोण चालवील?–अशा आणखी कितीतरी सुधारणा करण्याचें माझ्या मनांत आहे, त्या तोंपर्यंत लांबणीवर पडतील ना?”

दादा यावर उत्तरला, “हा तुझा जगाचा संसार तुझ्याइतकाच कळकळीनें मी चालवीन, मग तर झालें?”

“हो!” मामा म्हणाले, “तोंपर्यंत तुझें शिक्षण पुरें होऊंदे व मग तूंहि आमच्या कारखान्याची एक शाखा इथें काढ. माधव व अनंत यांनींहि हीच बाजू घेतली आहे, व त्यांचा तुलाहि तसाच आग्रह होता, खरें ना?”

“होय. पण मामा, नुसता आग्रह असून त्या वेळीं उपयोग काय होता? मी त्या वेळीं दुबळा होतों. दुर्बळांचे बोल नेहमीं पचपचीत असतात, व त्यांच्या आशा फोल ठरतात.” मी म्हणालों.

“पण त्याच आशा आतां गुणाला आल्या तर?” या मामांच्या प्रश्नाला मनापासून असो किंवा नसो; पण मला संमति द्यावी लागलीच. मीं विचार केला कीं, वडील माणसांचा शब्द मोडणें चांगलें नाहीं. मी उत्तरलों, “तुम्हां वडील माणसांच्या आज्ञेबाहेर मी नाहीं.”

इतक्यांत आई, मामी, मनोरमा, वहिनी असें लटांबरच्या लटांबर आंगणांत लोटलें. आईनें माझ्या तोंडचे ओझरते शब्द ऐकले असावे. तिनें मामांना विचारलें, “नाना, तो वडील माणसांच्या आज्ञेबाहेर नाहीं म्हणतो, तर विचार पाहूं त्याला, तो लग्नाला कां उभा राहात नाहीं तो?”

आईचा हा सवाल ऐकून सर्वांनाच हसूं आलें. मामींनाहि आम्हां मामा-भाच्यांचीं हंसरीं तोंडें पाहून कौतुक वाटलें. आमच्या हंसतमुखांत

साखर घालण्यासाठींच कीं काय, मनोरमाहि हंसली. मात्र आपलें हंसें बाहेर फुटूं नये, म्हणून तिनें तोंडावर पदर धरला; पण आपलें तारुण्यानें मुसमुसलेलें सौंदर्य बाहेर दिसूं नये म्हणून पदरानें सर्वांग झांकून घेणाऱ्या सौंदर्यवती जशा जास्तच सौंदर्यसंपन्न दिसतात, तशीच यावेळीं पदराआड हंसत असलेली मनोरमा आंतबाहेर हंसत आहेशी दिसत होती. तिच्याकडे बोट दाखवून मामी आईला म्हणाल्या, " पहा बरें वन्सं, सूनबाई किती धीट आहे ती ! सासूच्या, मोठ्या जावेच्या व दिराच्याहि देखत खुशाल हंसते आहे ! "

स्वप्नांतहि संभवनीय न वाटणारे हे शब्द मामींच्या तोंडून निघालेले ऐकतांच दादा, मी व आई चकित झालों. मनोरमा मामींसारख्या कनकलक्ष्मीची बहीण. ती त्यांची मुलगीच असें घटकाभर म्हटलें असतांहि चालेल. तिचें सासूपण अनुभवण्याचें भाग्य माझ्यासारख्या एखाद्या जन्मदरिद्र्याच्या आईच्या वांट्याला येणें कसें शक्य असेल ? पण प्रत्यक्ष मामीच व त्याहि मामांच्या देखत बोलल्या, तेव्हां त्यांत कांहीं राम आहे, असें मानण्याला जागा होती. मामींच्या शब्दांत अशी काय जादू भरली होती नकळे; ते कानीं पडतांच मनोरमेकडे पहाण्याची माझी दृष्टि बदलली. असल्या लग्नाच्या गोष्टी वरच्यावर बोललेल्या मला रुचत नाहींत, हा माझा स्वभाव आईला माहीत होता, त्यामुळें आतां मला राग आला कीं काय, असें तिला भय वाटलें. तिनें विषयांतर केलें, " लग्न मेलें होईल परतें नशिबीं असेल तेव्हां ! असेन मी भाग्याची, तर मोठ्या सुनेप्रमाणेंच धाकट्या सुनेलाहि हाताखालीं नांदवण्याचें श्रेय मिळेल. " हे शब्द बोलतां बोलतां आईनें एकवार मनोरमेला नखशिखान्त न्याहाळलें. ती जणूं काय भविष्य काळीं तिच्या हाताखालीं नांदणारी तिची सूनच होती. ती सत्तेची सून होईपर्यंत तिला तिचें नांव घेतां येत नव्हतें, इतकेंच कायतें !

मामा-मामींनीं मिळून आईच्या तोंडावर माझी खूप स्तुति केली. दादानेंहि त्या स्तुतिपाठांत कांहीं थोडाथोडका भाग घेतला नाहीं. आपल्या पोटच्या गोळ्यावर हा स्तुतीचा वर्षाव होत आहे, असें ऐकतांना त्या माउलीला त्या वेळीं किती आनंद झाला असेल बरें !

माझ्या भावी शिक्षणाची योजना मामांनीं व दादानें आईला समजावून सांगतांच तिला ती पटली; पण निरनिराळ्या अभ्यासक्रमांची कल्पना तिला

कशी होणार ? ती म्हणाली, " खरेंच नाना, माझी तर अशी उत्कट इच्छा आहे कीं, निळूनें पदवीधर होऊन एखादा मामलेदार-मुन्सब व्हावें. पण त्याच्या डोक्यांत हें वेड शिरलें आहे ! तें आतां तुझ्या सांगण्यानें तरी दूर होवो म्हणजे झालें. "

मला मनोरमा देण्याचा आपला मनोदय मामांनीं पुन्हां एकदां सर्वांना कळवला, व सर्वानुमतें मी मुंबईला जावें, तिथें आणखी कांहीं दिवस विद्याभ्यास करावा, मनोरमेशीं लग्न करावें, व संसार थाटावा असें ठरलें. मामींना आई पाहिजे होती, व वहिनीविषयींहि आईचें मन तितकें शुद्ध नव्हतें. वहिनी एकलकोंड्या स्वभावाची होती, तिच्या संसारांत आईला आपला बोज संभाळून रहातांच आलें नसतें. यामुळें तीहि माझ्याबरोबर मुंबईला यायला तयार झाली.

मामी म्हणाल्या, " निळूला समाजसेवा, देशसेवा यांची आवड आहे, व मनूहि त्याच गोष्टींत रमते, नाहींग मनू ? "

मनोरमेनें हंसत हंसत खालच्या मानेनें उत्तर दिलें, " करा माझी गरिबाची थट्टा ! "

मामी म्हणतात त्याप्रमाणेंच जर मनोरमेला देशसेवा व समाजसेवा यांविषयीं प्रेमा वाटत असेल, तर ती माझी अर्धांगी झाल्यावर तिच्या अमोल साह्यानें आपण सोन्याचा हिंदुस्थान बनवून सोडूं, असें मला वाटलें. समानशीलाची सहधर्मिणी लाभण्याला पूर्वसंचिताची जोड लागते. तें माझें पूर्वसंचित जबर आहे, या भरांत भावी संसाराच्या ज्या कल्पना मनांत उसळूं लागल्या, त्या इतक्या गोड होत्या कीं, त्यांना उपमा त्यांचीच. पण हाय ! हाय ! आपल्या मानससरोवरांत प्रत्यहीं बऱ्यावाईट कल्पनांचे कितीतरी बुडबुडे येतात ! त्यांतले वाईट कल्पनांचे बुडबुडे फुटले तर मनाला तितका विषाद वाटत नाहीं; पण वाइटाबरोबर चांगलेहि फुटतात, तेव्हां मन किती वरें उदास होतें ? ते फुटल्यावर त्यांची आपण गणती केली तर तीहि फुकट होते !

मामांनीं मला विचारलें, " मग निळकंठ, तुझा विचार काय ? "

मामांनीं हा प्रश्न विचारतांच मी कुचंबणेंत पडल्यासारखा झालों. एक मन सांगे, आवडतें तेंच कपाळीं येतें. दुसरें मन विचारी, ना पदवी, ना पैसा, असा तूं दरिद्री लग्न करून कायरे करणार ? असमर्थ परिस्थितींत संसाराची बेडी पायांत अडकवून घेऊन उपासमारींत खितपत पडणाऱ्या लोकसंख्येचीच

भर करणार ना ?—अशी द्विधा वृत्ति झाली तरी मोह सुटेना. आज ना उद्यां माझ्या कुटुंबाचा, बायकोचा व देवदयेनें दोन मुलें झालीं तर त्यांचा परिपोष करून संसार सुखाचा करतां येईल, असा आत्मविश्वास मला होता; पण आपण संसाराचे खेळ खेळूं लागलों तर न जाणो, जुगार आहे तो ! आपल्या विरुद्ध आवडीनावडींची अर्धांगी मिळाली तर तिच्या सहवासांत दिवस काढतांना नरकवासापेक्षांहि संसार कंटाळवाणा व्हायचा. आपलीं बायकामुलें आपल्या अंगीकृत कार्यांतील मार्गामधील कुंपणें न होतां मार्गदर्शक झालीं पाहिजेत, तरच संसार सुखाचा. इतक्या साऱ्या आशा मनोरमेच्या सान्निध्यानें मला यशस्वी करतां येतील, असें मला वाटे; पण त्याच वेळीं पुन्हां वाटे, मामा-मामींनीं मनोरमा मला देऊं केली, तें त्यांनीं माझ्या आंगीं कोणतें अलौकिकत्व पाहिलें ! या कामीं त्यांनीं मनोरमेच्या आईबापांची संमति तरी घेतली आहे का ! मीं मामांना विचारलें, " मामा, मनोरमा कांहीं तुमची मुलगी नव्हे; ती हरिहरपंतांची मुलगी आहे. त्यांची तुम्हीं संमति घेतली आहे का ? "

" होय. " मामा उत्तरले.

" मी हा असा सडाफटिंग आहें, मला आधार कुणाचा नाहीं, माझ्या घरीं दोंदारांनीं संपत्ति ओतते आहे, अशांतलाहि प्रकार नाहीं; या साऱ्या गोष्टी तुम्ही त्यांच्या कानावर घातल्या आहेत का ? सांगा, मामी, ही जबाबदारी तुमच्यावर आहे. "

"होय," मामी म्हणाल्या, " तें सारें त्यांना सांगितलें. त्यांना साऱ्या गोष्टी मान्य आहेत. आतां आपण आपल्या काय त्या अटी सांगा. त्यांना हें स्थळ मान्य नसल्यावर मुलगी दाखविण्यापर्यंत पाळी उगीच आली वाटतें ! "

मी पुन्हां म्हणालों, " पहा बरें; नाहीं तर मागून हा लग्नाचा सौदा मोडेल, व मग झाल्या गेल्या गोष्टी मला विसरून विसरतां येणार नाहींत. बरें; हरिहरपंतांना आणखी मुलेंबाळें आहेत का ? "

" होय, एक मुलगा आहे. " मामी उत्तरल्या, " पण त्यांच्या गोतावळ्याशीं तुला काय करायचें आहे ? ही मुलगी पहा व पसंत कीं नापसंत तें सांग. तसेंच देण्याघेण्याचेंहि काय तें बोलून सार. "

मीं पुन्हां मामामामींना बजावलें, " पहा बरें; आपल्या हिंदु विवाहपद्धतीं-तील मुलांमुलींना पहाण्याचा व लग्नाच्या सौद्यांची मोडतोड करण्याचा जो

निंद्य प्रघात आहे, तो मला आवडत नाहीं, हें तुम्हांला माहीत आहेच. साऱ्या जन्मांत माझी वधू या दृष्टीनें मी लग्नापूर्वी ज्या एका वधूकडे पाहीन, तीच माझी अर्धांगी झाली पाहिजे. मग ती कशीहि असो, ती मला उचित अशी निपजावी म्हणून परमेश्वराची प्रार्थना करण्यापलीकडे मला कांहींच करायचें नाहीं. पण एकवार जमलेला हा ऋणानुबंध पुन्हां कोणत्याहि कारणानें मोडला तर माझें सारें आयुष्य दुःखांत जाईल. असला तात्विक वेडापीर मी आहें, याचा विचार करा, व मग पुढच्या गोष्टी विचारा. ''

'' केला विचार, केला विचार, हजारदां केला विचार! ती मंडळी जुन्या विचारांची आहे, व तूं सुधारक आहेस, हेंहि मीं त्यांना सांगितलें '' मामी म्हणाल्या.

'' मग बाकीच्या गोष्टी तुम्ही वडील माणसांनीं काय त्या ठरवाव्या '' असें मीं म्हणतांच सर्व वडील माणसांनीं कानावर हात ठेवले. मामी म्हणाल्या, '' हो! आज आम्ही बाकीच्या गोष्टी ठरवाव्या, अन् त्या तुझ्या मनाला आल्या नाहींत तर ' तुम्हीच घ्या ती बायको ' असें तूं उद्यां आम्हांला सांगावेंस. तुझ्यासारख्या तात्विक वेड्या पिराचा भरंवसा काय! ''

मामींनीं आपल्या बोलण्यानें सर्वांना हंसवलें. मी निरुपायानें उत्तरलों, '' माझ्याच मतावर अवलंबून असेल तर मी सांगतों, मला मुलीच्या बापाकडून एक पैहि घ्यायची नाहीं, कीं लग्नाचा गाजावाजाहि करायचा नाहीं. ''

मामींनीं विचारलें, '' पैहि घ्यायची नाहीं म्हणून कसें चालेल? आपण जितकीं गोड्या मनाचीं माणसें आहोंत, तितकीं तीं नाहींत. मनू, तुझ्या बापाला नांवें ठेवतें म्हणून राग येऊं देऊं नकोस बरें! निळकंठ, हरिहरपंतांची ही एकुलती एक मुलगी असली तरी त्यांना एक मुलगाहि आहे. तूं कांहीं मागितलें नाहींस तर ते कांहीं न देतां सारी संपत्ति मुलासाठीं जपून ठेवतील. बाकी, कांहीं नाहीं म्हटलें तरी हजारपांचशें ते देतील म्हणा; पण तूं काय तें माग. ''

'' मग तें तुम्हींच करा. तुमच्या शब्दाबाहेर मी नाहीं '' मी उत्तरलों.

''बरें, तूं बायकोच्या आंगावर दागिने काय घालणार? '' मामींनीं विचारलें.

आईला हा प्रश्न झोंबल्यासारखा झाला. ती म्हणाली, '' वैनी, माझा मुलगा गरीब म्हणून त्याला हिणवतां काय? ''

मामी तिला गप करीत म्हणाल्या, "वन्सें, जरा मजा तर पहाल!"

मी उत्तरलों, "मी स्वतां माझ्या तनमनधनासह तीन त्रिकाळ तिचें जीवन सुखाचें करण्यासाठीं झटत राहीन. यापेक्षां सोन्यामोत्यांचे दागिने मी कुठचे आणूं! मी श्रीमंत लागून गेलों आहें थोडाच!"

"मग बायका फुकटच्या मिळतात वाटतें! हुंडा घ्यायचा म्हटला, कीं दागिने घातले पाहिजेत, बरें महाराज!" मामी म्हणाल्या.

यावर मामा म्हणाले, "म्हणूनच मी म्हणतों कीं, आपण हुंड्याची अट घालूं नये. ते सद्धर्मानें देतील तें घ्यावें."

शेवटीं मामांचा ठराव सर्वानुमतें पसार झाला. मला व आईला मुंबईला पाठविण्यांत दादानेंहि विरोध केला नाहीं. वहिनींना तर एकट्यानें संसार करण्याची हौस असल्यानें आमची ब्याद घरांतून जाते, हें पाहून उलटा आनंदच वाटला.

मामा म्हणाले, "आज वाङ्‌निश्चय झाला. आतां पुढच्या गोष्टी तुमच्या तुम्ही बायकामाणसें पाहून घ्या."

"त्या आतां आम्ही पहातों." असें म्हणून मामींनीं मनोरमेचा हात आईच्या हातीं देऊन सांगितलें, "वन्सं, ही आपली सूनबाई बरें! आतां आमच्या घरीं तुम्ही येणार त्या परक्या कुणी म्हणून येणार नाहीं, तर विहिण-बाईन् मनूच्या सासूबाई म्हणून येणार! आत्या कशाला इकडे येते आहे! तिनें मनूला मलाच वाचेनें दत्तक देऊन टाकलें आहे. आतां वरपक्ष म्हणून स्वतांची बरदास्त राखून घेतां घेतां मी आपली गरीब गरजू विहीण म्हणून मला पावलोपावलीं वांकवूं मात्र नका. घ्या ही आपली सूनबाई पदरांत. मनू, आपल्या सासूबाईंना नमस्कार कर."

मनोरमेनें लाजेनें मनांतल्या मनांत चूर होऊन आईला नमस्कार केला. तिला 'जन्मसावित्री हो' असा आशीर्वाद देतांना आईचे डोळे आनंदाश्रूंनीं डबडबून आले. मीहि आईला वंदन केलें. तसेंच मामामामींचें माझ्याशीं पूर्वीप्रमाणेंच वडीलपणाचें सोन्याचें नातें, व आज त्यावर सासूसासरेपणाच्या नव्या नात्याचा जडाव दिलेला. मग त्यांच्या पायांवर मस्तक ठेवून त्यांचा आशीर्वाद घेण्यांत मला धन्यता वाटली यांत नवल तें काय!

आई घाईघाईनें घरांत गेली. मी मनांत विचार करूं लागलों, इतक्या घाईनें

ही घरांत कशाला जाते! तोंच तिनें चांदीची वाटी भरून साखर आणली, व ती वाटी मामींच्या हातीं देऊन सांगितलें, "वैनी, सर्वांचीं तोंडें गोड करा."

मामींनीं आम्हां सर्वांचीं तोंडें गोड केलीं.

*　　*　　*　　*

गुणवंतराव रोज आमच्या घरीं येत, व मामांबरोबर धंद्याच्या गप्पा मारीत बसत. एकंदर वागण्याच्या रीतीभातीवरून निदान बायकांच्या बाबींत तरी ते तितके सज्जन नसावे असें त्यांच्या चार दिवसांच्या वागणुकीवरून मला वाटलें. एक वेळां ते आमच्या घरीं जेवायलाहि आले होते. त्यावेळीं, कां न कळे, मनोरमेनें त्यांना वाढायचें साफ नाकारलें. मामांपाशींहि भागीदार या नात्यापुरतीच त्यांची पत असावी, असें वरवर पहाणारांच्या तेव्हांच ध्यानीं येई.

आमचें मुंबईला जायचें ठरलें, त्याच्या दोन दिवस अगोदर सरस्वतीबाईंनीं मुद्दाम मला जेवायला बोलाविलें. घरांत इतकीं माणसें असतांना एकट्यानेंच जेवायला जाणें मला आवडलें नाहीं; पण वडील मंडळीच्या आग्रहास्तव मला जाणें भाग पडलें.

आमच्या पानांसभोंवार रांगोळ्या वगैरे घातलेल्या पाहून मला चमत्कार वाटला. पण खरें आश्चर्य तें पुढेंच होतें. आज सरस्वतीबाई मुद्दाम प्रत्येक पदार्थ यमुनेकडून वाढवीत होत्या. यमुना आज जरीकांठी पातळ नेसली होती, व तिनें आंगांत जरीकांठी पोलका घातला होता. दागदागिनेहि खूप आंगावर घातले होते; पण लाजेमुळें तिला कांहीं नीटसें वाढतां येत नव्हतें.

आमचें अर्धवट जेवण होतें तोंच सरस्वतीबाईंनीं मला विचारलें, "निळकंठराव, तुम्हांला मनोरमा जास्त आवडते, का यमुना जास्त आवडते?"

या प्रश्नावर मला कांहींच उत्तर देतां आलें नाहीं. मी घोंटाळल्यासारखा झालेला पाहून यमुनेची धाकटी बहीण विमला मला म्हणाली, "बायका अशा लाजतात; तुम्हीं पुरुष कां हो लाजतां?"

यमू दरवाजांत उभी होती, ती लाजेनें खालीं मान घालून आंत गेली, व विमलेला दटावून म्हणाली, "विमले, गप्प बैस. फाजील नाहीं तर!"

जेवतां जेवतां गुणवंतराव, सरस्वतीबाई, व दिनकरराव यांनीं औपरोधिक रितीनें मनोरमेची व तिच्याबरोबर मामामामींचीहि बरीच निंदा केली, व त्याबरोबरच यमुना मला द्यायचा आपला मनोदय माझ्या कानांवर घातला.

पण वडील मंडळींच्या संमतीशिवाय आपण कांहींच करणार नाहीं, असें मीं त्यांना स्पष्ट सांगितलें.

घरीं येतांना मी मनांत मात्र म्हणालों, " यमू, माझ्यासमोर तूं इतकी लज्जानम्र कशाला बनतेस ? हाच लाजरेपणा मनोरमेच्या नखशिखान्त मुसमुसलेला एकवार मी पाहिला. आतां माझ्यासमोर लाजण्याचा, रुसण्याचा किंवा कशाचाहि तिचा एकटीचा हक्क आहे. इतर मुलींनीं माझ्यासमोर लाजावें, व त्यांचें लज्जानम्र मुख तशा स्थितींत मीं अवलोकन करावें, हें मी पाप समजतों. "

* * * *

दुसऱ्या दिवशीं वहिनींची मंगळागौर होती. तिच्याबरोबर मामींनींहि मंगळागौर पुजली. त्या दिवशीं मनोरमा नवा पोषाख करून आम्हांला वाढूं लागली. वहिनी मधुकराला पाजीत बसल्या होत्या, त्यामुळें आम्हां पुरुषांना वाढण्याचें काम मामी व मनोरमा यांच्यावर पडलें होतें. मामी आम्हांला श्रीखंड वाढून गेल्या, व मनोरमेला पुऱ्या वाढायला ने म्हणून त्यांनीं सांगितलें. पहिल्यानें ती वाढायला बाहेर येईनाच; पण शेवटीं मोठ्या मिनतवारीनें एकदांची बाहेर आली, ती तिनें घाबरून आम्हांला एकेकच पुरी वाढली. मामा म्हणाले, " मनू, आम्हीं मुखशुद्धीला बसलों नाहीं, जेवायला बसलों आहों ! "

मामी थट्टेनें म्हणाल्या, " गरिब नवऱ्याचा संसार कसा करावा हें आजपासून शिकते आहे ! "

आपली फजीती झाली, म्हणून मनोरमा जी एकदां आंत गेली, ती पुन्हां बाहेर म्हणून कशी ती आली नाहीं. काल यमुनाहि अशीच लाजत होती; पण ती कुणाची कोण परकी, तिच्या लाजेंत मीं आनंद मानला असता तर, निर्लज्जपणाचा दोष माझ्या पदरीं आला असता. पण आज मनोरमा लाजली, तेव्हां आनंदित होण्याचा माझा अधिकार होता. तरुणपणीं संसार हा स्वर्गवाससा वाटतो, त्याची ही नुसती ओझरती झुळूक मला लागली. आपल्या नवपरिणीता वधूला पावलोपावलीं लाजविण्यांत जो आनंद होतो, त्याची बरोबरी त्या वधूवरांच्या लाजेला परस्परांच्या अंतःकरणांत दडवून ठेवून, तिचा डोळा चुकवून वधूच्या गर्भवासाला येणाऱ्या गोजिरवाण्या बाळाचें प्रथम दर्शनच काय

तें करूं शकेल. कारण वधूवरांची पहिली वहिली लज्जानम्र वृत्ति व सृष्टीच्या नियमांप्रमाणें तिचा झालेला विकास यांचें मूर्तिमंत उदाहरण मी आहें, असें तें बाळ आपल्या हंसऱ्या तोंडावाटे मुक्या बोलांनीं बोलूं लागल्यावर आपण लज्जाशील कीं निर्लज्जाशील याचा विचार करतां करतां त्याच्या मातापितरांना जी लज्जा उत्पन्न होते, त्या आनंदाला दुसऱ्या कशाची सर येणार ?

कांहीं झालें तरी आजचा मामींच्या हातचा पहिला घांस व मनोरमेच्या हातची पहिली पुरी मंगळागौरीच्या मुहूर्तावर जी माझ्या पोटीं गेली, ती रसवंती माझी जन्माची तहानभूक निवारण करण्याला पुरेशी होती, असेंच मला वाटलें.

मी गांव सोडून जाणार हें ऐकून गांवच्या बऱ्याच लोकांना वाईट वाटलें. मला न नेण्याविषयीं त्यांनीं मामांची परोपरीनें विनवणी केली; पण मामा करतात तें माझ्या कल्याणासाठीं करतात, अशी सर्वांची खात्री झाल्यावर त्यांनीं मोठ्या नाखुषीनें रुकार दिला. तसेंच मनोरमा माझी वाग्दत्त वधू आहे असें समजतांच तिच्यावरहि अनायासें सर्वांचा लोभ जडला होता. मात्र वहिनींना हें सहन होईना; कारण त्यांचा मान मोठा असून त्यांना कोणीहि विचारीना. त्या कोणाला आवडतच नसत. फार काय; मनोरमेच्या त्या उद्यांच्या मोठ्या जाऊबाई ना; पण तीहि त्यांच्या वाऱ्याला उभी रहात नसे.

दादानें घरची व गांवांतील माझ्या साऱ्या उद्योगाची जबाबदारी आपल्या शिरावर घेतल्यावर मी मोकळा झालों. दिनकररावांबरोबर दादाचा जास्त स्नेह जमतोसा पहातांच त्यांच्या, व तसाच जे कुणी अरेरावी सावकार असतील त्यांच्या तोंडानें पाणी न पिण्याविषयीं मीं त्याला पुन्हां पुन्हां सांगितलें.

संध्याकाळ होतांच आम्ही बैल गाड्या जुंपून निघालों. गुणवंतराव, सरस्वतीबाई, यमुना व तिची धाकटी बहीण विमलाहि आमच्याबरोबर निघाली. त्यांना आजच मनोरमेचा व माझा वाङ्मयनिश्चय झाल्याची बातमी कळल्यामुळें कीं काय, गुणवंतराव व सरस्वतीबाई माझ्याशीं व माझ्या आईशींहि नीटशीं बोलेनात. ह्या अबोल्याचा हाच अर्थ हें मींच एकट्यानें ओळखलें. यमुनेच्या वृत्तींत मात्र काडीइतकाहि फरक पडला नव्हता. याचें कारण, ती खरोखरच थोर मनाची मुलगी होती.

* * * *

वाट चालतांना जसजसें मी एकएक पाऊल पुढें टाकूं लागलों, तसतसें माझें मन नाना प्रकारच्या विचारांच्या झोल्यावर हेलकावे खाऊं लागलें. आमचें गांव खेडेंच खरें; शहरासारखे सुंदर बागबगीचे, उंच उंच हवेल्या, गाडीघोड्यांची गर्दी, विविध करमणुकींचीं साधनें, वगैरे कांहीं त्या ठिकाणीं मनोरमता नाहीं, त्यामुळें मनोरमेसारख्या खेळाडू मुलीला तिथें करमेना. पण ही माझी जन्मभूमि होती, या दृष्टीनें मी तिला इंद्रपदापेक्षांहि जास्त मान देत होतों. जननी व जन्मभूमि ह्या दोन परमदैवतांची मनोभावानें सेवा करण्यांतच आपला स्वर्ग–मोक्ष–वैकुंठ आहे, अशी माझी ठाम समजूत होती. त्या माझ्या प्रिय जन्मभूमीला सोडून मी जात आहें, आतां तिचें दर्शन पुन्हां केव्हां होईल तें होवो; तोंपर्यंत मी तिला पारखा झालों, ह्या कल्पनेनें माझें हृदय सद्गदित झालें. वरवर पाहूं गेलें असतां माझी जन्मभूमि हा एक दगडमातीचा खडकाळ प्रांत होता. त्यापेक्षां शहरांतील शोभा कितीतरी मनोरम असते, असें कुणालाहि वाटेल. पण आपली जननी कितीहि काळी, कुरूप, गरीब, म्हातारी असली तरी तिच्याविषयीं आपल्याला जो प्रेमाचा उमाळा येतो, तो एखादी सुंदर, गोरीपान, सोन्यांमोत्यांच्या दागिन्यांनीं व रेशमी जरतारी वस्त्रांनीं सजलेली यौवनसंपन्न वारयोषिता पाहून येणार नाहीं. अशा कोट्यवधि जीवांचें मातृपद भूषविणाऱ्या कोट्यवधि जननी ज्या एका महाजननीचा पान्हा पिऊन मातृपदाला पोंचलेल्या असतात, त्या आपल्या जन्मभूमीचा अभिमान कोणाला असणार नाहीं? माते जन्मभूमि! तुझी मांडी सोडून जातांना तुझ्या संतानांच्या मनाला काय वाटत असेल बरें? तुझ्या कपाळीं आलेल्या आपत्ति दूर करण्याच्या पुण्यमय वेडांत रंगून कितीतरी मातृनिष्ठ जिवांच्या वांट्याला कठोर राजदंड येतो. किती एकांना ह्या पर्वणीची सांगता करण्यासाठीं काळाला आपल्या जीवनसर्वस्वाचें वाण द्यावें लागतें. जन्मभूमि! आज तुझीं कितीतरी लेंकरें सातां समुद्रांपलीकडील काळ्या पाण्याच्या भयाण परक्या अरण्यांत उभीं राहून जागत्या डोळ्यांतील अश्रूंचीं अर्घ्यें उगवत्या सूर्याच्या नांवानें सोडून त्याची प्रार्थना करीत असतील कीं, हे भगवन्! माझ्या जन्म-भूमीचा उद्धार कर, आम्हां तिच्या संतानांना तिच्या मांडीवर सत्तेनें बसून हंसण्या-खेळण्या-बागडण्याची सोन्याची संधि दे. जागोजागच्या कैदखान्यांत कुजत पडलेल्या, रस्तोरस्तीं खडी फोडणाऱ्या, रेडेबैलांप्रमाणें

तेलाचे घाणे ओढणाऱ्या किंवा मोलाच्या मोलकरणींप्रमाणें पीठ दळणाऱ्या कारागृहवासी बांधवांच्या नेत्रांतून अश्रूंची गंगा वाहून तीहि जन्मभूमीचा उद्धार कसा होईल अशा विचारांचीं जागोजाग रुजलेलीं रोपें शिंपीत असेल. जन्मभूमीच्या साजिऱ्या मूर्तीवरून पंचप्राणांची ओंवाळणी काढून आकाशांतील तारामंडळांत उज्ज्वल तारकांच्या रूपानें रत्नखचित वेदीवर आसन घालून कितीएक दिवंगत पुण्यात्मे तपश्चर्या करीत असतील कीं, हे परमात्मन् ! आमच्या जन्मभूमीच्या हृदयावर तुझ्या कृपेची स्फूर्तिमय संततधारा सदैव वहात राहूं दे. ती देवलोकची संजीवनी सेवन करून तरी जन्मभूमीचे पांग फेडण्याची सद्बुद्धि तिच्या संतानांना सुचावी. ज्या जन्मभूमीच्या उद्धारासाठीं शिवप्रभूंसारख्या वीरशाली विभूतीनें व त्यांच्या शूर मावळ्यांनीं आपल्या हाडांचीं काडें केलीं व रक्ताची पांवळी गाळली, जिची अब्रू बचावण्यासाठीं पानिपतच्या रणक्षेत्रावर हिंदुमुसलमानांचीं घनघोर युद्धें झालीं, जिनें आपल्या उद्धारासाठीं यातना भोगणाऱ्या पुण्यात्म्यांचे अश्रु मोत्यांप्रमाणें वेंचून त्यांची माला आपल्या कंठीं धारण केली, व याच कार्यांत ज्यांनीं आपले देह आजवर मातीच्या गोळ्यांसारखे फेंकून दिले, अशा लाडक्या लेंकरांच्या हाडांची कावड करून ती शेषाच्या मस्तकावर जिनें झुलत ठेवली आहे, जी आम्हांला पोसते, आणि आमच्या जेत्यांनाहि पोसते, जी सुष्टांनाहि कुरवाळते व दुष्टांनाहि कुरवाळते, ती ही माझी जन्मभूमि !

माते जन्मभूमि ! परिस्थितीशीं झगडत झगडत मी तुझ्या पृष्ठभागावर कुठेंहि हिंडत राहिलों तरी मला तुझा विसर पडणार नाहीं. तुझी सेवा हेंच मनन, तुझी सेवा हेंच आचरण, तुझी सेवा हाच निदिध्यास—ही तुझ्या उद्धाराची संकल्पत्रयी मीं माझ्या हृदयावर कायम ठशानें कोरून ठेवली आहे. हे जन्मभूमि ! तुझ्या चरणीं माझा प्रणाम असो.

प्रवासांत असतां अशा विचारांच्या भरांत माझी जन्मभूमि केव्हां दिसेनाशी झाली, याचेंहि मला भान नव्हतें.



# दुसरी झुळुक

## मनोरमा (१)

जळ्ळे मेले गुणवंतराव ! फुटले त्यांचे डोळे ते ! केव्हांन् केव्हां आमच्या घरीं आले, कीं त्या विषारी दृष्टीनें ते माझ्याकडे पहातात. असल्या राक्षसाला नानांनीं आपल्या धंद्यांत भागीदार तरी कशाला घेतलें नकळे. तशाच सरस्वतीबाई ! शिकलेल्या नाहींत धड मराठी चार इयत्ता; पण ताठा कोण ! माझ्या ताईला लोक विदुषी म्हणतात, श्रीमंत म्हणतात; त्या आमच्या वैभवावर सरस्वतीबाईंचे डोळे नेहमीं फुटतात. तिकडे जाऊबाईशीं सवतीसारखा उभा दावा. आम्ही घरीं गेलों म्हणून आमच्या मागोमाग आपणहि धांवल्या दिराला घेऊन. नवरा घरीं सांडून दिराबरोबर तरणेताठेपणीं जन्म काढणाऱ्या बायांना जग हंसतें; पण यांना त्याची कुठें लाज आहे !

तिकडे—पण, जगाला ह्या मोघम ' तिकडे ' चा अर्थ कळावा म्हणून एकवार सांगून सोडत्यें, पुन्हां पुन्हां सांगायची नाहीं,—निळकंठरावांना—मला देऊं केली, यांत त्यांच्या पालेला काय होंडा पडला ? त्यांना आपली यमुना तिकडे द्यायची होती, तर ती यापूर्वींच देऊं करायची होती. बाकी, ही वाटाघाट पूर्वींपासून चालली होती, असें तिकडून सांगण्यांत आलें. इतकेंच काय, पण आम्हांला चोरून सरस्वतीबाईनीं तिकडे जेवायला बोलावून असाच थोडासा चावटपणा केलाहि. यमुना मोठी दिव्य अप्सराच लागून गेली होती कीं नाहीं, ती माझ्यापेक्षां तिकडच्या मनांत जास्त भरेल !

तिकडे सरस्वतीबाईंच्या हातचें जेवून आल्यावर संध्याकाळीं कशामुळें तरी दोन उलट्या झाल्या, तेव्हां मला व ताईलाहि संशय आला कीं, ह्या अवदसेनें आपल्या सटवाईला जागून तिकडे विष बिष घातलें कीं काय ? कऱ्हाडे जांवयाला विष घालतात असा आमच्यावर समाजाचा आरोप आहे. यांत जरी कांहीं राम नाहीं, तरी नवऱ्याला नवरा न म्हणणाऱ्या सरस्वतीबाईसारख्या उरफाट्या काळजाच्या बायका पाहिल्या, कीं ह्या राक्षसिणी काय करतीलन् काय न करतील, असें वाटतें. पण देव पावला आणि आमची ती विषाची कठोर कल्पना अखेर खोटी ठरली.

नाना–ताईनीं मला तिकडे देऊं केली, यांत सरस्वतीबाईंना कां दुष्टावा वाटावा ? आपल्या यमुनेला त्यांनीं पाहिजे तर दुसरा एखादा नवरा मुलगा पाहायचा होता ! पण तें नाहीं. जें आम्हांला पाहिजे तेंच त्यांना पाहिजे. असला जळ्ला तो त्यांचा स्वार्थी स्वभाव !

*     *     *     *

स्त्रियांनीं विवाहित होऊंन संसाराचा भार शिरावर घ्यावा किंवा न घ्यावा, याविषयीं आम्हां मैत्रिणीमैत्रिणींत वारंवार बराच खल होत असे. बहुतेकींना–कां, साऱ्यांनाच वाटे कीं, आपण लग्न करावें, संसार करावा, आपल्याला मुलेंबाळें व्हावीं. ह्या संसारांतहि पतीची सत्ता आपल्यावर चालावी किंवा नाहीं, या प्रश्नाचा उलगडा मात्र आम्हांला समाधानकारक रितीनें कधींच करतां आला नाहीं. कितिएकींना वाटे, आपला पति विद्वान् असावा, त्याला बहुजनसमाजांत मानमान्यता असावी, त्याचें नांव सर्वतोमुखीं गाजावें व आपण त्याची अर्धांगी म्हणून शोभावें. कांहींजणी म्हणत कीं, आपला पति नेहमीं आपल्या मुठींत असावा, आपल्या हौसा मौजा पुरविण्यांत त्यानें तीन त्रिकाळ चूर असावें, व आपण त्याची हृदयेश्वरी शोभावें. कांहींना श्रीमान् व रूपवान् पति आवडे. मला मात्र वाटे तें याहून कांहीं निराळेंच. माझ्या मनाला तेव्हांच्या विचारांची साडीचोळी नेसवून आज समाजासमोर उभें केलें तर तें सांगेल कीं, मला विद्वान् पण देशकार्य व समाजकार्य यांची सांगड घालतां घालतां सर्वांना आवडता झालेला असा श्रीमान् पति पाहिजे. नाना जसे ताईच्या अर्ध्या वचनांत वागतात, तसा तो माझ्या अर्ध्या वचनांत वागला पाहिजे. अशा पुरुषांना कांहीं जुन्या समजुतीचे लोक बाईलवेडे म्हणतात; पण तो आरोप तिकडच्यावर केलेला मला आवडला असता. कारण, नवरा बाईलवेडा ठरला तरी बायकोचा मोठेपणाच दिसून येतो.

पहिल्याप्रथम नाना-ताईनीं मला तिकडे देऊं केली, तेव्हां मला वाईट वाटलें. ते विद्वान् होते, लौकिकवान् होते, बुद्धिमान् होते, व माहीत नसतांहि शुभ चिंतायचें तर, ते जरी केवळ बाईलवेडे झाले नसते, तरी बायकोच्या तंत्रानें वागले असते खास. तैल बुद्धीचीं माणसें विशेषतः चंचल वृत्तीचीं असतात, व तेहि तसे होते, असें मी नलिनीच्या,—पण ती आतां माझी नणंद होणार म्हणून आतां तिला नलिनीवन्सं म्हटलं पाहिजे—लीलेच्या व अनंतरावांच्या

तोंडून मीं ऐकलें होतें. अशा चंचल वृत्तीच्या माणसाला मुठींत ठेवणें मला सहज साधलें असतें. ताई तर मला नेहमीं म्हणे कीं, तूं आपल्या नवऱ्याला ताटाखालचें मांजर बनवून ठेवशील. तेव्हां मीहि मनांत म्हणें, देवा, तसेंच कर. पण ते श्रीमान् नव्हते, हें मला आवडलें नाहीं. ताईबरोबर रोज उंचीउंची वस्त्रें नेसावीं, उंची कापडाचे पोलके आंगांत घालावे, उंची केशवर्धक तेलें वापरावीं, नेहमीं घोड्याच्या गाडींतून किंवा मोटारींतून हळदीकुंकुवाला जावें, असे अनेक श्रीमंती आचार माझ्या मनाचे धनी होऊन बसले होते. ही श्रीमंती गरिबीच्या सासरीं माझ्या वांट्याला येणार नाहीं, एवढ्याचसाठीं मला गरीब सासर नको होतें. श्रीमंती रहाणी म्हणजे मोक्षपद मिळविण्याची तपश्चर्या नव्हे; संसारांतील खरें सौख्य श्रीमंतीवर अवलंबून नसून वधूवरांच्या एकमेकांवरील निर्व्याज प्रेमावर अवलंबून असतें, हें सूत्र मला माहीत नव्हतें, असें नाहीं; पण मनाला काय वाटे तें कांहीं सांगवत नाहीं. श्रीमंतीचे विचार मनाच्या हलकेपणाचे द्योतक आहेत असें वाटूनहि ते यशस्वी व्हावे, असें मला वाटे.

पण मी हें बोलणार कुणापाशीं! या वेळीं ताईनानांचा मला असाहि संशय आला कीं, मी त्यांच्या पोटची मुलगी नाहीं, म्हणून मला कुणातरी गरीबाच्या गळ्यांत बांधून तीं माझी पिडाटाळ करण्याच्या विचारांत आहेत. पण कांहीं वेळानें माझी मलाच असल्या क्षुद्र विचारांची लाज वाटूं लागली. ताई-नानांनीं मला मुद्दाम आपल्यापाशीं बाळगून लहानाची मोठी केली, ती माझी पिडाटाळ करण्यासाठीं थोडीच केली असेल! त्या देवमाणसांवर मी हा भलताच वेडगळ आरोप करीत होत्यें झालें. जग म्हणतें, जन्मदात्या आईनें मुलाच्या पाठीवरून नुसत्या प्रेमाचा हात फिरविल्यानें बाळ जें बाळसें धरील, तें दुसऱ्या कुणीं त्याला पांच पक्वान्नांचें सुग्रास भोजन घातलें तरी धरणार नाहीं. ही म्हण निदान माझ्यापुरती तरी खोटी होती. माझ्यासारख्याच कोणा अल्लड लेंकरांनीं आपल्या पोशिंद्यांवर एखादे वेळीं पोरपणानें असला आरोप केला असेल, तोच पुढें ज्याच्या त्याच्या तोंडीं झाला, त्याची ही म्हण बनली!

शेवटीं होय नाहीं म्हणतां म्हणतां मला त्यांना द्यायचें ठरलें. तेव्हां हीच आपली जन्मगांठ असें समजून त्यांच्याविषयीं मनांत जितका जास्त आपलेपणा उत्पन्न होईल, तितका उत्पन्न करावा, असा मीं निश्चय केला. वाङ्-

टांतून चांगलें निपजाविण्याची ही वर्डस्वर्थची कला मला त्यावेळीं चांगली उपयोगीं पडली. वर्डस्वर्थ एके ठिकाणीं म्हणतो, " Nothing pleases so much as the thing that can be called mine.— आपलें स्वतांचें असें ज्याला म्हणतां येईल, त्या आपल्या मालकीच्या वस्तू-शिवाय दुसरी कोणतीहि वस्तू आपल्याला तितका आनंद देऊं शकत नाहीं. "

लहानपणीं आमच्या खेड्यांत पाऊस पडून आंगणांत पाणी सांचलें कीं, त्या पाण्यांत आम्ही कागदाच्या होड्या करून सोडीत असूं. त्या होड्यांत माणसांऐवजीं एकएक खडा बसवावा, व " जा कर संसार ' म्हणून एक एक होडी पाण्यांत सोडून द्यावी. ही होडी सारखी वेगानें वहात गेली, तर आपला संसार सुखाचा होणार म्हणून खुदकन् हंसूं येई. बरें, मध्येंच बुडाली तर बाईलमाणूसच पडल्यें मी; मला रडें हें यायचेंच. त्या कागदाच्या होड्यां-सारख्याच कल्पनांच्या होड्या बांधून त्यांत मी एकएक विचाराला बसवीं, व मनाच्या अथांग सागरांत त्यांना ' जा कर संसार ' असें म्हणून सोडून देई. त्यांतल्या कांहीं तरत, कांहीं बुडत. बाकी बऱ्याचशा तरत, यावरून मी वेडी अनुमान काढीं कीं, आपल्याला संसारांत क्वचित् प्रसंगीं दुःख भोगावें लागलें, तरी आपला संसार एकंदरीनें सुखाचा होणार. सुखाचीं नवरत्नें दुःखाच्या दगडमातीच्या ढिगाऱ्याखालीं दडपलेलीं असतात, तीं कुणा जिवाला सुखासुखीं कशीं मिळावीं !

माझें लग्न तिकडच्याबरोबरच ठरलें, यांत सर्वांत आनंदाची गोष्ट माझ्या वांट्याला आली ती हीच कीं, माझ्या माहेरींच माझें सासर थाटलें गेलें. ताईला सोडून सासरींच नव्हे; पण सासरच्या परब्रह्मीं तरी कसें चैन पडेल याचें मला भय होतें. माझ्या खऱ्या माहेरींहि ताईला सोडून मला जावेंसें वाटत नसे. मला तूं जन्मभर कुंवार ठेव; पण तुझ्यापासून दूर लोटूं नकोस, असें मीं ताईला कितीतरी वेळां बजावलें होतें. ते बोल माझ्या आज गुणाला आले. नानाताईबरोबर मी आठच दिवस माझ्या भावी सासरीं गेल्यें ना; पण त्या आठवड्यांत नको हें सासरसें मला होऊन गेलें. चालतांना पायाला ते दगड कचाकचा बोंचत, ना नाटक, ना सिनेमा, ना गाडीघोडा, ना वाचनालय, इश्श ! असल्या खेड्यांत संसार तरी कसा करावा ! कोंकणांतलीं खेडवळ माणसें तरी किती गैदी असतात ! मी शिकलेली मुलगी त्यांच्याशीं मिळून मिसळून वागूं

तरी कशी! पण ती तिकडची जन्मभूमि होती व माझा सारा जन्म भविष्य-कालीं तिथेंच जायचा होता; त्या आपल्या घराचा कंटाळा येऊन कसें चालणार! तरी पण मला आशा होती कीं, लग्न झाल्यावर मी तिकडच्या मनाला भुरळ घालून शहरांतच रहायला लावीन. उद्यां आमचा संसार थाटला, देवदयेनें दोन मुलेंबाळें झालीं, तर त्यांच्या शिक्षणासाठीं तरी आम्हांला शहरांतच राहावें लागणार ना! मग तिकडेहि नाक मुठींत धरून शहरांतच राहावें लागेल.

एकदां तिकडे मीं विचारलें,"आपल्याला खेड्यापेक्षां शहर आवडत नाहीं का?"

यावर मला उत्तर मिळालें, " मला शहर आवडतें, पण शहरापेक्षां खेड्याचें शहर करणें, खेड्यांतल्या लोकांना सुशिक्षित करणें, त्यांना पोटासाठीं उद्योग-धंदे व करमणुकीचीं साधनें निर्माण करून देणें जास्त आवडतें. "

" इतकी यातायात करण्यापेक्षां लोककार्य काय करायचें तें शहरांतच राहून नाहीं का करतां येणार ? " मीं विचारलें.

यावर उत्तर मिळालें, " उद्यां आमचें लग्न झाल्यावर तुला एकाद्या मुलाला दत्तक घेऊन त्याचा पोटच्या मुलाप्रमाणें प्रतिपाळ करणें आवडेल का ? "

" इश्श! कां म्हणून तें? आमचा वंसा कांहीं वांझवांझोट्याचा नाहीं. लक्षांत असूं द्या, माझ्या आईला मी तिच्या चौदाव्या वर्षी झालें होत्यें! मलाहि मुलांची हौस आहे. मलाहि खरेंच सांगत्यें, केव्हां एकदां आई होईनसें झालें आहे. " मी म्हणाल्यें.

इतक्यांत तिथें ताई दत्त म्हणून ठेवल्यासारखी आली व विचारूं लागली, " काय होईनसें झालें आहे ? "

ताईला पहातांच तिकडे लाजल्यासारखें झालें. मीहि मनांतल्या मनांत लाजल्यें; पण चेहऱ्यावर मात्र तसा आविर्भाव दाखविला नाहीं. ताई नुकतीच दोन महिन्यांची पहिलीवहिली गर्भार होती. तिला मीं जोरानें उत्तर दिलें, "ताई, अशी थट्टा केलीस तर तुझ्या मुलाला मी माझी मुलगी द्यायची नाहीं."

मी दुऱ्या हाडाची व तिकडची शरीरयष्टि सडपातळ, यामुळें मला पहिली मुलगी होणार असें भविष्य ताईनें वर्तविलें होतें, व ताईचा हात पाहून एका ज्योतिष्यानें तिला पहिला मुलगा होणार असें सांगितलें होतें. आमचा ज्योतिषावर तितका विश्वास नसला तरी फायद्याची एखादी गोष्ट ज्योतिषानें सांगितली तर ती खरी मानून शुभचिंतन करण्यापुरत्या आम्हीं केव्हां केव्हां जुन्या मताच्या बनत असूं.

ताई थट्टेच्या स्वरानें म्हणाली, " लग्नाला ठिकाण नाहीं, तोंच लेंकुरवाळे-पणाच्या गोष्टी तुला ग कशा आठवतात ?–अन् निळू, तुला तरी आम्हां वडील माणसांच्या देखत अशी एकमेकांची थट्टामस्करी करायला कांहीं लाज वाटत नाहीं ? "

" ती माझी उद्यांची सत्तेची बायको आहे ? " तिकडून उत्तर मिळालें.

मीं ताईला विचारलें, "ताई, सत्तेच्या नवराबायकोनीं एकमेकांची थट्टा करायची नाहीं तर काय लोकांची करायची ? "

"पण तीं सत्तेचीं होऊंदेत तरी ! " हे सासूबाईंचे दरवाजाआडचे शब्द अकस्मात् कानीं पडतांक्षणीं मात्र आम्हीं लाजेनें मेल्यापेक्षांहि मेल्यासारखीं झालों.

तिकडच्यापेक्षांहि सासूबाईंचें मला जास्त भय वाटत होतें. नवऱ्याला भारून ठेवायला यौवन, शालीनता, मृदु भाषा व सौंदर्य इतकी सामुग्री वेळीं पुरी पडते; पण सासूबाईंना माझें यौवन व रूप घेऊन काय चाटायचें होतें ? पण देव पावला व माझें माहेरच माझें सासर बनलें. मोठ्या जाऊबाईंचें सासूबाईंशीं मुळींच पटत नसल्यानें त्या घरीं जाऊन राहातील, व मलाहि त्यांच्याबरोबर मोठ्या जावेचा जाच सहन करण्याची पाळी येईल, असें भय मला नव्हतें. इतकें असतांहि त्या माझ्या माहेरीं राहून मला जाच करत्या, तर माझी ताई होतीच. कांहीं झालें तरी सासूबाई व तिकडेहि माझ्या माहेरीं येऊन राहाणें झालें होतें. अर्थात् त्यांना थोडेंफार नमतेपण स्वीकारून राहणें प्राप्त होतें. तितक्या नमत्या सासूबाई बनल्या म्हणजे त्यांच्यांत व ताईंत भेद तो काय राहिला ? बायकोच्या माहेरीं राहणाऱ्या घरजांवयांना तर बायकोच्या तंत्रानें कसें वागावें, हें मुळींच शिकावें लागत नाहीं. याचा अर्थ असा नव्हे कीं, नाना-ताईंनीं तिकडे घरजांवई करण्याचा संकल्प केला होता; पण माझ्यावर जशी त्यांची माया, तशीच माझ्यासाठीं माझ्या सौभाग्यदेवतेवर माया कशी नसेल ! त्यांची माया मला व तिकडेहि जन्मभर लाभावी, ह्या आमच्या आनंदाचा आनंदीआनंद करून सोडण्यासाठीं एक गोजिरवाणा लीलाधर ताईच्या गर्भवासाला येतांच, तो उदंड आयुषी जन्माला यावा व त्याला डाव्या उजव्या मांडीवर घेऊन हंसवावा, खेळवावा, रडवावा, अशी माझी इच्छा होती. लीलाधर नांव सांगत्यें याचें कारण, ताईच्या पहिल्या मुलाचें नांव लीलाधर ठेवायचें माझ्या मनांत होतें.

*　　*　　*　　*

ज्या वेळीं घरीं कोणी नाहीं, अशा वेळीं गुणवंतराव मुद्दाम आमच्या घरीं यायचे व नसतें बोलणें काढून माझ्याशीं बोलत बसायचे. हें पाहून माझ्या तळपायांची आग मस्तकाला जाऊन झोंबे. पण ते नानांचे भागीदार पडले म्हणून! नाहींतर सांगितलें असतें कायतें!

पण आज गय केली, उद्यां गय केली, असें म्हणतां म्हणतां एके दिवशीं मला राहवेनाच. असेच एकटे दोनप्रहरच्या वेळीं गुणवंतराव आले व विचारूं लागले, " नानासाहेब कुठें आहेत? "

किती वेडगळपणाचा प्रश्न होता हा! नाना सद्दा काळ बारा मास कारखान्यांत काम करीत असतात, हें रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्या एखाद्या शेंबड्या पोरानेंहि सांगितलें असतें. तशांत गुणवंतराव नानांचे भागीदार! त्यांना का ही गोष्ट माहीत नाहीं? मला गुणवंतरावांचा संताप आला. मी उत्तरल्यें, " गुणवंतराव, . तुमचे कावे मला समजतात; पण मी तुमची पुतणी यमू आहें असें समजा, आणि वाटेला लागा कसे! नाहीं तर मी नानांना सांगेन. आजपर्यंत तुमचे चाळे सहन केले; पण आतां मात्र मी त्या गांवची नाहीं. "

गुणवंतरावांना हे शब्द झोंबले. मीं मनांत म्हटलें, झोंबेनात कां झोंबले तर! हलक़ट कुठचे! हे असे वेळीं अवेळीं आमच्या घरीं येतात, त्या वेळीं मी घरांत एकटी असलेली कुणीं पाहिली तर जग मला नांवें नाहीं का ठेवणार? मोठे परदेशीं जाऊन आले म्हणून सुधारक झाले! दुसऱ्याच्या तरण्या ताठ्या मुलींशीं एकव्यानें बोलत बसण्यांत, हिंडण्याफिरण्यांतच काय तो यांच्या सुधारणेचा प्रकाश पडतो. पण मी म्हणतें, मेल्यांनो, सुधारणेच्या नांवाखालीं लोकांच्या बायकांना असे छळतां कां!

बराच वेळ झाला तरी गुणवंतराव दरवाजाशीं उभे! एक नाहीं कीं दोन नाहीं. मीं जरा तिरस्कारानें म्हणाल्यें, " गुणवंतराव, दरवाजांतले उठा; दरवाजा सोडा. "

दरवाजांतून एक पाऊल पुढेंच येऊन गुणवंतराव मला विचारूं लागले, " मनोरमे, तुला मी आज एकच प्रश्न विचारणार आहें. "

" विचारा काय तो; पण अगोदर दूर उभे राहा पाहूं! " इतक्या रागानें मी ओरडल्यें; पण तो मेला राक्षस कांहीं पाऊलभरहि मागें सरला नाहीं.

" मनोरमे, निळकंठाशीं तुझा वाङ्‌निश्चय झाला; पण तुझ्या जन्माचा तूं कांहीं विचार केला आहेस का ? " गुणवंतरावांनीं विचारलें.

" माझ्या जन्माची उठाठेव तुम्हांला कशाला हवी पण ? " मीं विचारलें.

"माझी लग्नगांठ तुझ्या पदराशीं मारलेली आहे कीं काय, असा मला संशय येतो. तो संशय खरा व्हावा, अशी माझी इच्छा आहे. मनोरमे, मी तुझ्या नानांचा भागीदार आहें, यावरून माझ्या श्रीमंतीची तुला चांगलीच कल्पना करतां येईल. शारदेविषयीं म्हणशील, तर ती मरणगतीवर घातलेली आहे, ती तुला सवत म्हणायला जिवंतहि राहणार नाहीं. या लग्नाला तुझ्या आईबापांचें मतहि मी मिळवीन. "

" तुम्ही लग्नाच्या बायकोला मरणगतीवर टाकून इथें तोंड दाखवायला कशाला आलां ? जा ! त्या माउलीची काळजी घ्या जा. माझें हित मी पाहून घेईन " मी उत्तरल्यें.

" हित कसलें पाहून घेशील ? मनोरमे, निळकंठासारख्या भिकाऱ्याला माळ घालण्यांत तुझें कसलें हित होणार ? " गुणवंतराव म्हणाले.

तिकडे भिकारी म्हटलेलें मला कसें सहन होणार ? मीं विचारलें, " ते भिकारी असोत कीं श्रीमंत असोत, तुम्हांला पोसायचे पडले नाहींत ना ? तुम्हीं आपले बऱ्या बोलानें वाटेला लागा कसे, नाहींतर नानांना हांक मारत्यें. "

आम्ही ज्या बंगल्यांत राहात होतों, त्याच्या खालच्याच मजल्यावर कारखाना असल्याकारणानें मी खरोखरच हांक मारली तर आपली फजिती होईल, असें गुणवंतरावांना भय वाटल्यामुळें ते दचकून मागें सरले.

मी पुन्हां जोरानें म्हणाल्यें, " असेच जिना उतरा. जा, तोंड घेऊन चालते व्हा. "

" मनोरमे, ध्यानीं ठेव, या अपमानाचें प्रायश्चित्त तुला भोगावें लागेल. " असे चडफडत गुणवंतराव धाड् धाड् करीत जिना उतरले.

" कावळ्याच्या शापानें कांहीं गाय मरत नसते, " असें म्हणून मी दरवाजा लावून घेत्यें, तोंच सासूबाई आल्या. त्यांना पाहिल्याबरोबर माझ्या छातींत धस्स झालें. दोन प्रहरीं मी एकटी असतां हा मेला सैतान आलेला त्यांनीं आज तिसऱ्यान्दां पाहिला होता. मी माझ्या मनानें पवित्र असल्यें

तरी त्यांना किंवा दुसऱ्या कुणालाहि या गोष्टीचा सहाजिकपणेंच वाईट अर्थ घेतां येण्यासारखा होता.

सासूबाई कांहीं न बोलतां रागावल्यासारख्या होऊन आंत निघून गेल्या. मी दरवाजा लावत्यें, तोंच अनंतराव आले. अनंतरावहि माझ्याकडे जरा वांकड्या नजरेनें पहातात, असा मला किती दिवसांपासून संशय होता. एक दोन वेळां तर माझ्या तोंडावर माझी तारीफ करून त्यांनीं माझ्या संशयाला दुजोराहि दिला होता. तशांत या वेळीं माझ्या रागाला डोळे नव्हते. त्यांनाहि गुणवंतरावांसारखे पुरे वाटेला लावावे म्हणून मी दरवाजाबाहेर गेल्यें, व त्यांना हांक मारली. दरवाजाबाहेर गेल्यें याचें कारण घरांत सासूबाई होत्या, त्या आमचें संभाषण ऐकत्या असत्या.

मीं अनंतरावांना विचारलें, " अनंतराव, तुम्ही तिकडचे जीवश्च कंठश्च स्नेही म्हणवतां ना ? "

" होय. "

" मग त्यांचा डोळा चुकवून असे वारंवार माझ्याकडे कां येतां ? मी तुमच्या जिवलग मित्राची वाग्दत्त वधू आहें, हें तुम्हांला माहित आहे ना ? "

" होय. "

" मग अशा परस्त्रीशीं ती एकटी असतांना बोलण्याची इच्छा धरणें, हें पाप नव्हे का ? तशांत तें पाप दुसऱ्या तिसऱ्या कुणापाशीं नाहीं; आपल्या बहिणीप्रमाणें असलेल्या मित्रवधूपाशीं ! "

" तूं म्हणतेस तें खरें. पण मनोरमे, मी तुझें दर्शन आज कितीतरी दिवसांपासून घेत आहें ! त्या वेळीं निळकंठाशीं तुझा विवाह होणार, ही गोष्ट कुणाच्या ध्यानीं मनींहि नव्हती. उलट मी तुला शिकवायला येत असें, तेव्हां माझ्या नांवानें तुझी ताईच तुला चिडवीत असे, तें तुला आठवतें का ? "

" होय, पण एकदां वाङ्‌निश्चय होईपर्यंत वधू साऱ्या मुलांचीच बायको व वर साऱ्या मुलींचा नवरा असतो. ही वधूवरांची परीक्षा करण्याची आमच्या समाजाची रीत आहे; पण आतां मी तशी लगिनसौद्यांत विक्रीसाठीं मांडलेली वधू नाहीं. अनंतराव, जोंपर्यंत आपला वाङ्‌निश्चय झालेला नसतो, तोंपर्यंत कुणाहि मुलीविषयीं मुलाच्या मनांत किंवा मुलाविषयीं मुलीच्या मनांत 'ही माझी बायको किंवा हा माझा नवरा' अशी संशयी कल्पना आली

तर तें पाप ठरत नाहीं. नीतिमत्तेच्या उच्चतम कसोटीवर तें पाप ठरतें; पण ती गोष्ट आपण सोडली तरी आतां मी माझी नाहीं, व मी तुमची व्हायची आशाहि नाहीं. आतां मी परदारा झाल्यें–नाहीं तरी व्हायची आहें. आतां तुमच्याशीं मी व माझ्याशीं तुम्ही बहीणभावंडांप्रमाणें वागलें पाहिजे."

" तसाच मी वागतों. मनोरमे, तूं परदारा आहेस, तशांत माझ्या मित्राची—माझ्या प्राणाच्याहि प्राणाची भावी अर्धांगी आहेस, हें मनांत वागवून केवळ तुला पूर्वाराधिता देवता मानून मी तुझ्या दर्शनाला कधीं कधीं येत असतों."

" पण पाप्याला गंगा भेटत नाहीं, हें तुम्हांला माहीत आहे ना ?"

" होय. पण मी पापी नाहीं."

" तुम्ही नाहीं; तुमचें मन पापी आहे."

" नाहीं. मनोरमे, माझें मनहि पापी नाहीं."

" नाहीं कसें ? मला पहातांच किंवा माझा विचार ध्यानीं येतांच तुमच्या मनाला थरकांप सुटतो कीं नाहीं ?"

" होय."

" मी सारखे चार दोन दिवस भेटल्यें नाहीं तर वेड्यासारखी तुमची अवस्था होते कीं नाहीं ?"

" होते."

" अशी आणखी कुणा मुलीविषयीं होते का ?"

" नाहीं."

" मग माझ्याविषयींच तुमच्या मनाला हे विकार कां बरें बाधावे ? अनंतराव, तुमच्या मनांतली मला पाहाण्याची उत्कंठा हा तुमच्या अंतःकरणांत पेटत असलेल्या वैषयिक अपेक्षेच्या शेकोटीचा प्रकाश असून उदासीनता हा त्या शेकोटींतून निघालेला धूर आहे. या धुरानें तुमच्या डोळ्यांना, आतां— या क्षणीं पाणी आणलें पहा ! हें पाणी हाच तुमच्या पापाचा पर्जन्य माझ्यासमोर पडत आहे. ह्या विषमय पर्जन्य-वृष्टीनें तुम्ही रोज तुमच्या मनोविकारांचीं रोपें शिंपूं लागलां तर तुमचें अंतःकरण विषारी कांटेरी झाडांझुडपांचें एक भयाण अरण्य बनेल. ह्या विषारी अरण्यांतलीं विषारी फुलेंच तुम्ही तुमच्या जन्मभूमीच्या चरणीं वाहाणार काय ? त्या फुलांतून वाहून मोठीं

झालेलीं विषारी फळेंच आपल्या तेहतीस कोटि हिंदी बांधवांना चारणार काय ? तुम्ही ज्यांना आपल्या जिवाभावाच्या मोलाचे मित्र म्हणवतां, त्या मित्रांना आपल्या अंतःकरणांतील पापी विचारांच्या कांव्याकुव्यांत बांधून त्यांच्या पुण्यमय अंतःकरणांची वाताहात करणार काय ? अनंतराव, तुम्ही मर्दासारखे मर्द जनतेचे मार्गदर्शक होऊं पहातां, मग स्वतां असे वाटेचे आड वाटेला कां बरें घुसतां ? तुम्हांला हिंदुस्थानच्या जननींचा अभिमान आहे, मीहि उद्यांच्या हिंदुस्थानची जननी आहें; ती मी तुमची बहीण शोभत नाहीं काय ? पहा ! पहा ! अनंतराव, माझ्याकडे नीट निरखून पहा, म्हणजे माझ्याकडे पहाण्याची तुमची वैषयिक दृष्टि मालवली जाऊन नवी दिव्य दृष्टि तुम्हांला प्राप्त होईल. त्या दृष्टीच्या प्रकाशांत तुम्हीं माझ्याकडे पाहिलेंत, तर तुम्हांला माझ्या देहांत तुमची पाठोपाठची बहीण दिसून येईल ! पहा ! आतां सांगा, तुमच्या बहिणीला तुमच्या एका जिवलग मित्राचें अर्धांगीपद प्राप्त होऊं लागलें, तर तुम्हांला दुःखाचे उमाळे फुटतील, कीं आनंदाच्या उकळ्या फुटतील ? आपली बहीण सुस्थळीं पडूं नये असें कुणा भावाला कधीं तरी वाटेल का ? सांगा. ”

“ नाहीं. मनोरमे, तसला कृतघ्न भाऊ मी नाहीं. ”

“ नाहींच. तुम्ही तसे कृतघ्न नाहीं, हें मला या पूर्वीच माहीत होतें. आतां मनाची जरा शांतपणानें समजूत घाला व त्याला सांगा कीं, मनोरमेला आजपासून बहीण म्हण. ”

पुरुषांसारखे पुरुष अनंतराव, ते ढळढळां रडूं लागलेले पाहून मला वाईट वाटलें. कुठची यांना मी इतकी तडातड बोलल्येंसें मला होऊन गेलें. पण विचार केला कीं, यावेळीं त्यांना त्यांच्या पापाचें प्रायश्चित्त देऊन पावन करून घ्यावेंच.

माझ्या पायां पडून घोगऱ्या स्वरानें अनंतराव म्हणाले, “मनोरमे-नव्हे मनूअक्का, आज मीं तुला गुरु केली. तुझ्या गुरुमंत्राप्रमाणें मी यापुढें सतत वागेन !”

मी म्हणाल्यें, “ माझ्या पायां कशाला पडतां, परमेश्वराच्या पायां पडा. पण बरं का हो अनंतराव, याच वेळीं तुम्हांला आमंत्रण देऊन ठेवत्यें, येत्या दिवाळीला भाऊबिजेच्या दिवशीं मुद्दाम माझ्या घरीं जेवायला या. मी तुमची बहीण तुम्हांला ओंवाळणी करीन, चांगलें गोडधोड खाऊं घालीन, हा बहिणीचा निरोप विसरूं नका. तुम्हांला बहीण नाहीं, ती मीच तुमची बहीण ! ”

" बरें आहे ! " असें म्हणून हातरुमालानें गालांवरचीं आंसवें पुशीत अर्ध-वट हंसत हंसत अनंतराव वाटेला लागले. उगाच चावटपणानें मला वारंवार भेटायला येत असत. फाजील कुठचे !

मी दरवाजाला कडी लावून आंत येत्यें, तोंच सासूबाई माझ्यासमोर येऊन रागारागानें मला म्हणाल्या, " जनांची नाहीं तर नाहीं; पण मनाची तरी कांहीं लाज बाळगावी. किती शिकलां सवरलां तरी बायका तुम्ही ! वेळीं अवेळीं परक्या पुरुषाशीं गप्पा मारीत बसायला तुम्हांला कांहीं खंत वाटली पाहिजे. मघांशीं ते गुणवंतराव येऊन गेले, त्यांच्या मागोमाग अनंत येऊन गेला; हे सारे धिंगाणे, हीं कांहीं बऱ्याचीं लक्षणें नव्हत ! मी निळूला साफ सांगेन कीं, मला असला चवचालपणा मुळींच खपायचा नाहीं. "

मीं मनांत म्हटलें. मीं केलें काय, व त्याचा परिणाम हा झाला काय ! याला म्हणतात कर्म !

पण सासूबाईंचा जरी हा असा संशयी स्वभाव असला, तरी मला त्याचा तितका विधिनिषेध मानावासा वाटेनाच. कारण, त्यांचें काय, त्या पिकलें पान होत्या; त्यांचे दिवस आतां फार थोडे राहिले होते. शिवाय मीहि एकेकाच्या स्वभावाचा अंदाज पहात होत्यें. सासूबाईंचा अंदाज पाहिला कीं, त्यांना टापटीप नटवेपणाशी वाटते, व पुरुषांशीं बायकांनीं बोलणें फाजीलपणाचें वाटतें. ही म्हातारीची हट्टी लहर आहे, म्हणून सोडून द्यावी, असा विचार करून मी तिकडच्या स्वभावचा अंदाज घेऊं लागल्यें.

नानांनीं तिकडे मुद्दाम आपल्या हाताखालीं आणलें याचें कारण, घरच्या धंद्यांत वाकबगार असा एक इसम तयार होऊन राहील. पण होतां होतां नानांची ही इच्छा फोल ठरली. नानांच्या आग्रहासाठीं म्हणून कॉलेजांत नांव मात्र घालण्यांत आलें; पण अभ्यासाच्या नांवानें आंवळ्याएवढें पूज्य ! आज काय टिळक आले, त्यांच्या मिरवणुकींत भाग घे; उद्यां काय अमक्या सभेंत व्याख्यान द्यायला जा; परवां मजुरांच्या संपांत तिऱ्हाइती करायला जा; तेरवां कॉलेजांत सक्तीनें बायबल शिकवतात म्हणून साऱ्या विद्यार्थ्यांची निषेधात्मक सभा भरव, असे हजारों उद्योग तिकडच्या मागें होते. ह्या उद्योगांमुळें तिकडे कॉलेजच्या प्रिन्सिपालसाहेबांचा नेत्रशूळ होऊन बसणें झालें होतें !

एक एक म्हणतां म्हणतां मुंबईतल्या साऱ्या सार्वजनिक संस्थांत थोडाफार भाग घेऊं लागल्याबरोबर तिकडच्या मनाला बहुश्रुतपणा प्राप्त होऊं लागला. सात्विक निस्पृहता किंवा ज्याला इंग्रजींत sincerity म्हणतात, ती तिकडच्या नखशिखान्त मुसमुसत होती. त्या सोनेमोल गुणाचा अभाव बहुतेक संस्थांत दिसून येतो, असा तिकडचा अनुभव होता. पण निस्पृह व निःपक्षपाती अशा खऱ्या दिलाच्या माणसाला मान द्यायचा नाहीं; कारण त्यामुळें ढोंगी प्रतिष्ठितांच्या मान्यतेच्या आसनाला धक्का बसेल,' अशी जगाची रीत आहे, त्याला ते तरी काय करणार ?

अशा स्थितींत आपण काय करतों, हें लोकांसमोर मांडण्याच्या विवंचनेंत असतांच घरची हकिकत कळली कीं, भावजी दिनकररावांच्या संगतीला लागून खेड्यापाड्यांच्या सुधारणेची बसवलेली घडी विस्कळून टाकीत आहेत. लोकांच्याहि तक्रारी येऊं लागल्या कीं, पतपेढींतले पैसे गांवच्या श्रीमंत पांढरपेशांनाच मिळतात व गोरगरीब बिचारे उघड्यावर पडतात. शेतकऱ्यांच्या मुलांना थोडक्या काळांत व्यावहारिक शिक्षण देण्याची जी शाळा उघडण्यांत आली होती, ती तर भावजींनीं पहिल्याच दिवशीं बंद केली. अशा अनेक उपायांनीं आम्हांला त्या गांवांत सत्तेच्या घरीं जायला त्यांनीं तोंड नाहींसें केलें. नाहीं म्हणायला भावजींनीं तिकडे एक मात्र सवड ठेवली होती; ती ही कीं, दिनकररावांच्या यमुनेशीं लग्न केल्यास दिनकरराव तिकडे घरजांवई करायला तयार होते. मग त्या ठिकाणीं तिकडे सत्तेनें जाऊन राहतां आलें असतें.

भावजींचें हें विश्वासघाताचें आचरण पाहून तिकडच्या कोमल मनाला धक्का बसल्यासारखा झाला. पण तिकडच्या तोंडून एवढेच शब्द निघाले, "गांवची घडी बसवण्यांत मला किती श्रम पडले, याची जर दादाला कल्पना असती, तर त्यानें त्याची अशी दुर्दशा कधींहि केली नसती."

मीं विचारलें, "आपण यमुनेशीं लग्न करायला तयार झाल्यावर आपल्याला ही विस्कळलेली घडी पुन्हां बसवतां येईल."

तिकडच्या मनाला काय वाटलें नकळे; पण हंसूं आलें. मला विचारणें झालें, "त्या गोष्टीला तुझी संमति आहे का ?"

मी उत्तरल्यें, "बायका आम्ही, तुम्हां पुरुषांच्या पायांतले पायपोस !

तुमच्या आवडीनिवडी त्याच आमच्या आवडीनिवडी ! आपण तसें करायचें मनांत आणल्यावर आपला हात कोण धरील ? ”

“ मी तितका उरफाट्या काळजाचा नाहीं. ” एवढेंच उत्तर यावर मिळालें.

इतक्यांत नानांनीं येऊन विचारलें, “ काय झालें ? ”

“ मामा, खेड्यापाड्यांच्या सुधारणेच्या माझ्या ज्या कल्पना होत्या, त्यांना दादानें व दिनकररावांनीं अशी चूड लावून दिली. आतां मला त्या माझ्या जन्मभूमींत जायला सध्यां तरी तोंड नाहीं. आतां मी काय करूं ? ” नानांना विचारणें झालें.

नानांचें यावर एकच उत्तर, “अभ्यास करून पहिल्यानें बी. एस्‌सी. हो. ”

“ तें तर आहेच; पण त्याबरोबरच या ठिकाणीं कांहीं सार्वजनिक सेवेचा उपक्रम करावा, अशी माझी इच्छा आहे. ”

“एक ना धड, भराभर चिंध्या; अशी आपल्या जन्माची अवस्था होऊं देऊं नकोस.” हे शब्द नानांनीं जरा रागानेंच उच्चारले. त्यांना तिकडे एकदां पदवी-धर करून सोडायचें होतें. मलाहि पदवीधर पति मिळता तर बरें होतें. पण– !

शेवटीं ते बोललेले शब्द खरे करायच्या उद्योगाला लागले. साहित्यसेवा ही परमेश्वरी देणगी तिकडे जन्मापासून मिळाली होती. विचार प्रगल्भ होते, व भाषेवरहि चांगलेंच प्रभुत्व होतें. लोक म्हणत कीं, सत्तेच्या बायकोसारखी भाषासुंदरी यांना वाटेल तेव्हां वाटेल तशी सत्रा ठिकाणीं ओणवी करतां येते ! असल्या होतकरू लेखकाचा आपल्या मवाळ पत्राच्या भरभराटीला चांगला उपयोग करून घेतां येईल, या आशेनें ‘चंद्रकिरण’ पत्राच्या संपादकांनीं आप-ल्याकडे येण्याची तिकडे गळ घातली.पगारहि चांगला देऊं केला. पण ‘पैशासाठीं मतें विकून लोकपक्षाचा विश्वासघात करणारा विश्वासघातकी मी नव्हे ’ एवढें एकच उत्तर त्यांना मिळालें. मतें सुधारक होतीं खरीं; पण पुनर्विवाहाच्या काय-द्याचा वाढ दिवस किंवा आगरकरांची, पंडित ईश्वरचंद्र विद्यासागरांची पुण्यतिथि पाळण्याच्या दिवशीं लोकमान्य टिळकांना व त्यांच्या राष्ट्रीय पक्षाला शिव्या दिल्याशिवाय शेट करसनदास मुळजी, आगरकर किंवा पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर अशांच्या पिंडाला कावळा शिवूं द्यायचा नाहीं, असल्या सुधारकी चाळ्यांची तिकडे चीड होती. आधींच स्वभाव पडला तापट, तशांत नेमस्त व सुधारक यांचे असे चाळे पाहिले; कीं शेंडी-जानवें तोडून संन्यास घ्यायचा तेवढा बाकी उरे.

मीं एकदां विचारलें, " नेमस्तांची व सुधारकांची आपल्याला एवढी चीड कां येते ? "

यावर उत्तर मिळालें, " मला चीड येते याचें कारण, सुधारकांनीं सुधारणा करावी, व नेमस्तांनीं आपल्या मनगटांतील नेमस्त जोराप्रमाणें नेमस्त देश-सेवा करावी. पण राष्ट्रीय पक्षाची राष्ट्रीय चळवळ झपाट्यानें यशस्वी होत असतां तिच्याशीं आपली बरोबरी करण्यासाठीं नेमस्त किंवा सुधारक यांनीं त्या पुढारलेल्या लोकजागृतीचा पदर धरून तिला मागें कां खेंचावी ! राष्ट्रीय काय, नेमस्त काय, सुधारक काय किंवा आणखी कोणताहि पक्ष काय, सर्वजण राष्ट्राच्या सर्वांगीण सुधारणेसाठींच झटत असतात. या सर्वांच्या प्रयत्नांची दिशा एक असून एकमतानें राष्ट्रकार्य होईल तितकें चांगलें. एकोपा हीच हिंदी राष्ट्राच्या आकांक्षा तृप्त होण्याची मूर्त आशा आहे. पण तसें जमत नसेल तर आमच्या वाटेनें आम्ही जातों, तुमच्या वाटेनें तुम्ही जा. तुम्हांला काय किंवा आम्हांला काय, हेतु पवित्र असेल तर यश हें मिळालेंच पाहिजे. आधीं कुणाला मिळेल, व मग कोणाला मिळेल हा प्रश्न निराळा. अशा पवित्र हेतूच्या सिद्धींत भांडणतंटे कशाला हवेत ? ते भांडणतंटे जे कोणी नसते उकरून काढतात, त्यांची मला चीड येते. "

मीं विचारलें, " टिळक पुनर्विवाहावर व्याख्यानें देत नव्हते, महारांमागांना पंक्तीला घेऊन सहभोजनांत जेवीत नव्हते, मिश्रविवाहाचा पुरस्कार करण्या-साठीं दौरा काढून गांवोगांव हिंडत नव्हते, अशानें बहुजनसमाजाचें पाठबळ त्यांना कसें मिळावें ? "

मीं हा प्रश्न मुद्दामच विचारला होता कीं, काय बिनतोड उत्तर मिळतें पहावें. यावर उत्तर मिळालें, " आजपर्यंत सुधारकांनीं पुनर्विवाह केले, मिश्र विवाह केले, सहभोजनें केलीं व ब्राह्मणमहार मिळून एका ताटांत जेवायला बसून लग्नांतल्या नवराबायकोसारखे एकमेकांना घांसहि भरवले असतील. पण असल्या सुधारकी चाळ्यांनीं देशाचें दुर्दैव देशोधडीला लागलें काय ! हिंदुस्था-नांतले मागासलेले लोक, महार, मांग, ओतारी, शिंपी, पाथरवट, विणकरी हे सारे उपाशीं मरतात, ते ब्राह्मणांच्या मुली आपल्याला बायका मिळत नाहींत म्हणून नव्हे, ब्राह्मण जांवई मिळत नाहींत म्हणून नव्हे, किंवा ब्राह्म-णांच्या पितृश्राद्धाला स्वतांला क्षण मिळत नाहींत म्हणूनहि नव्हे, तर सत्ता

दुसऱ्यांच्या हातीं गेली, धंदे बुडाले, शेती पिकेनाशी झाली, अधिकारीवर्ग व रयत यांच्यांत परस्पर विश्वास विरल होऊं लागला, म्हणूनच ते उपाशीं मरतात. ह्या मागासलेल्यांचे कैवारी देशांतल्या विणकऱ्यांनीं विणलेलीं वस्त्रें कां नेसत नाहींत! देशांतल्या ओताऱ्यांनीं ओतलेल्या समयांतून व लामणदिव्यांतून घरांत दिवे कां लावीत नाहींत! देशांतल्या चांभारांनीं तयार केलेले तऱ्हेतऱ्हेचे देशी जोडे किंवा वहाणा कां वापरीत नाहींत! मागासलेल्यांच्या कैवारी बायकांनीं देशांतल्या देशांत चिंचणी तारापूरला तयार होणाऱ्या बांगड्या कां वापरूं नये! तळेगांवच्या किंवा ओगलेवाडीच्या बरण्या कां उपयोगाला आणूं नये! ह्या नेहमींच्या उपयोगाच्या वस्तु देशांतल्या देशांत तयार होत असतां स्वदेशीला उत्तेजन देण्यासाठीं त्या विकत घेऊन देशी कामकऱ्यांच्या पोटाला भाकरी देणाऱ्या टिळक-गांधींना खरे सुधारक व मागासलेल्यांचे कैवारी म्हणायचें नाहीं; व परदेशी पादत्राणांनीं शृंगारलेल्या पायांखालीं देशी चांभारांचें पोट तुडवणाऱ्या, परदेशी कपडे वापरून देशी विणकऱ्यांच्या बायकापोरांना उघडीं पाडणाऱ्या, परदेशी दिवे वापरून देशी ओताऱ्यांच्या घरांत दारिद्र्याचा काळोख पाडणाऱ्या, विदेशी बांगड्या वापरून देशी बांगड्यांवर पोट भरणाऱ्या कांसारांच्या सौभाग्यवतींना अर्धपोटीं रडवणाऱ्या बेगडी सुधारणावादी नरनारींना मागासलेल्यांचे कैवारी म्हणायचें काय? ह्या सर्व आपत्ति दूर करण्यासाठीं आपल्या राष्ट्राच्या संसाराला लागणारें आर्थिक रांधप आपल्या हातीं नाहीं, ती राष्ट्राच्या सैंपाकघरची सत्ता आमची आमच्या हातीं यावी, अशी चळवळ तनमनधनाच्या मोबदल्यांत अहर्निश करणाऱ्या लोकमान्य किंवा महात्माजी यांसारख्या विभूतींना नांवें ठेवलेलीं कोण खऱ्या ब्रिदाचा हिंदपुत्र सहन करील बरें!"

आमच्या घरच्या सैंपाकीणबाईला आजचा सैंपाक मुळींच साधला नसल्याकारणानें परक्याच्या हातीं रांधप असल्यावर जेवणाराचे कसे हाल होतात, याचा मला ताजा अनुभव होता. पण या वेळीं तें मी बोलल्यें मात्र नाहीं. कारण, न जाणो, उद्यांपासून तुम्हां बायकांचें सैंपाकघरचें स्वराज्य तूंच घे अशी आज्ञा व्हायची!

इतकी उज्ज्वल स्वदेशभक्ति लोकांच्या मनांत तिकडच्याविषयीं आपलेपणा उत्पन्न करूं शकली तर त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं; पण ती माझ्या मात्र

मुळावर जन्मलेली आहे कीं काय, असा मला संशय येऊं लागला. आज लोकांच्या वागणुकीवर जी टीका होते, तेच मला शालजोडींतले आहेत, एवढें न कळायला मी कांहीं तितकी नेणती नव्हत्यें. मला स्वतांला चिंचणी-तारापूरच्या भसभशीत बांगड्या कांहीं आवड नसत. देशी लुगड्यांपेक्षांहि चुनड्या किंवा चीट नेसून हिंडण्यांत मला मजा वाटे. लुगडीं किती जड; त्याच चुनड्या किती हलक्या असतात! चीट किंवा मलमलीचें पातळ तर इतकें हलकें फूल असतें कीं, नेसून नेसल्यें आहें कीं नाहीं, हेंहि माझें मला कळत नाहीं. पन्नास रुपयांवरच्या किंमतीचीं लुगडीं घ्यावीं तर तीं मात्र हलकीं निपजतात. त्यापेक्षां कमी किमतीचीं घेऊं गेलें तर तीं चिऱ्यासारखीं जड असतात. तीं आंगावर तोलायचीं तरी कशीं! तशाच गोलाच्या किंवा दुसऱ्या हलक्या किंमतीच्या बांगड्या हातीं भरून मी कैकाडणीसारखी शहरांत हिंडूं लागल्यें, तर लोक मला नाहींका हंसायचे!

तिकडचा स्वभाव जरी लाख असला, तरी आम्हां एकमेकांच्या आवडीनिवडींचा बारावा बृहस्पति होता. माझ्यासारखेंच तिकडूनहि थाटांत राहावें, असें मला वाटे. एकदोन वेळां मीं तसें तिकडे सुचवलेंहि होतें. पण तें मनाला आलें नाहीं. मी म्हणें, आपल्या कपाळीं श्रीमंती भोगायची नाहीं तर नये भोगूं; पण मीं भोगली तर ती आपल्याला कां आवडत नाहीं! माझे नाना श्रीमंत, माझी ताई श्रीमंत, माझीं आईबापें श्रीमंत, त्यांच्या जिवावर मी श्रीमंती भोगणार. पण नव्हे तें! श्रीमंतांच्या मुली गरिबांच्या घरीं पडूं नयेत, त्या एवढ्याचसाठीं. गरिबांच्या मुलांनीं जन्मांत कधीं श्रीमंती भोगलेली नसते, आणि त्यांना माळ घालून श्रीमंतांच्या मुली ह्या अशा पेंचांत पडतात! लग्न करायचें, संसार करायचा तो सुखासाठीं ना! तें सुख जन्मदरिद्री नवऱ्याच्या घरीं कधींहि लाभणार नाहीं, असें मला स्वप्नच पडलें होतें. म्हणूनच मी अष्टौप्रहर देवाची प्रार्थना करीत होत्यें कीं, देवा, मला श्रीमंत माहेर दिलेंस तसेंच श्रीमंत सासर दे. पण देवाला माझी प्रार्थना ऐकूं गेली नाहीं.

श्रीमंती भोगावी तर इकडे हा असा त्रास; सासूबाई भेटल्या त्या जुन्या मताच्या. त्यांना मीं अशी नव्हे अशी हौस केलेली मुळींच खपत नसे. म्हातारीं माणसें हीं! यांनीं नसतील का आपल्या तरुणपणीं आमच्याचसारख्या हौसा मौजा केल्या! आणि नसल्या केल्या तर त्यांच्या नशिबीं नसतील

करायच्या म्हणून ! मला वाटतें, म्हातारपणीं नजर विशेष तीव्र होऊन म्हाताऱ्या माणसांना घरबसल्या मृत्यूचा दरबार दिसत असावा, व पृथ्वीवरच्या जिवंतपणाचा मोह तर सुटत नाहीं. अशा वेळीं त्यांना संसारांतले सुखसोहाळे कसे रुचणार? पण सासूबाईसारखी मी कुठें म्हातारी झाल्यें आहें ! शिवाय मी अझून त्यांची सून व्हायचीच आहें, तोंच हा इतका धाक कोण कसा सहन करील ! तिकडचा राग वेळीं पत्करे. कारण–तें गोड कारण न सांगणेंच बरें. पण सासूबाईचा तोरा कां व कसा पत्करावा !

अशा स्थितींत आमच्या लग्नदिवसाचें अजून उजाडायचेंच होतें. मला विचार पडला, माझ्यासारखी हौशी पत्नी, तिकडच्यासारखे कडकडीत स्वदेशी पति, व सासूबाईसारखी जुन्या युगांतली सासू ! अशा त्रिस्थळी यात्रेंत मी आयुष्याच्या नव्या युगांतील नवा संसार करूं तरी कसा ! त्यापेक्षां यमुनाच तिकडची अर्धांगी झालेली बरी, असेंहि मला रागाच्या भरांत वाटे.



# तिसरी झुळुक

## लीला (१)

अनंतरावांची वृत्ति एकाएकीं बावरल्यासारखी झालेली पाहून मीं त्यांना विचारलें, " अनंत, खरें सांगा. तुमची आज अशी वेड्यासारखी स्थिति कां झाली ? "

अनंतराव उत्तरले, " याचें कारण मनोरमा ! "

मीं माझ्या मनाला तोच प्रश्न केला कीं, लीले, तुझी वृत्ति अशी वेड्यासारखी कां झाली ?—" याचें कारण अनंत ! "

एकदां नलिनी . आमच्याकडे आली होती. तिलाहि मीं हाच प्रश्न विचारला, तेव्हां ती उत्तरली, " याचें कारण माधवराव ! "

यमुना एकदां भेटली, तिला विचारतां ती उत्तरली, " याचें कारण निळकंठ ! "

एखाद्या धरणीकंपाच्या धक्क्यानें एखादें सुंदर नगर त्याच्या पृष्ठभागावर वसलेल्या हर्म्यप्रासादांसह कोसळून त्याचा चुराडा व्हावा, व त्या चुराड्याखालीं आपण चुरडून जावें, असा हा प्रकार प्रत्यहीं होत असे. दुष्प्राप्य वस्तूच्या प्राप्तीसाठीं जीवमात्र नेहमीं अशीच धडपड करीत असतात. तीच धडपड आम्हां सर्वांच्या मागें लागली होती. जें नाहीं, तें प्राप्त करून घेण्याची ही परंपरा जर जीवमात्राच्या वांट्याला आली नसती, तर ब्रह्मांडाचा हा जगड्व्याळ व्यापार चालला असता तरी कशाला ? पण देवाला हा ब्रह्मांडाचा पसारा इतक्या तांतडीनें आटोपता घ्यायचा नसेल, म्हणून जें मिळत नाहीं तें हुडकून काढण्याचा व तें मिळालें नाहीं तर त्याविषयीं निराशेचें वेड पांघरण्याचा असा हा जंजाळ त्यानें जगाच्या मागें लावून दिला असावा. देव भेटत नाहीं, तोंपर्यंत कितीतरी भोळे देवभक्त देवाच्या भजनीं हृदयानंदाची समाधि लावून बसतात ! स्वर्ग हा विश्वाच्या भव्यतम इमारतीचा शेवटला मजला डोळ्यांना दिसत नाहीं, म्हणून त्या स्वर्गाची जोड मिळवण्यासाठीं जीवांची कोण धडपड ! त्यापेक्षां जें प्राप्त होत

नाहीं, त्याचा नाद सोडण्याची गुरुकिल्ली जर कुणाला अवगत झाली असती, तर जगाचा व्यापार किती असूयारहित व शांततेनें चालला असता !

मनोरमेशीं अनंतरावांचें जें संभाषण झालें, त्याची बातमी मनोरमेमार्फत निळकंठांच्या कानांवर गेली असेल व म्हणून त्यांना विषाद वाटत असेल अशी माझी अटकळ होती. पण दुसऱ्याच दिवशीं मी अनंतरावांना भेटायला गेल्यें असतांना निळकंठ त्या ठिकाणीं आले, त्यांच्यापाशीं अनंतरावांनीं आपली चुकी कबूल केली, व यापुढें मनोरमा माझी बहीण आहे, अशी शपथ घेतली. इतका प्रकार झाला तरी निळकंठांच्या चेहऱ्यावरची हास्याची सदाफुली कांहीं कोमेजली नाहीं, हें पाहून मला आश्चर्य वाटलें. मी त्यांना विचारलें, " निळकंठ, तुमच्या भावी वधूवर पापी दृष्टि ठेवणाऱ्या मित्राचा तुम्हांला राग येत नाहीं का ? "

" मुळींच नाहीं. त्यानें आपला अन्याय कबूल केला, व त्याला पश्चात्तापाचें प्रायश्चित्त मिळालें. आतां कसला आला आहे राग ? आतां त्याचें मला उलट कौतुक वाटतें !" निळकंठ उत्तरले.

" धन्य आहे तुमच्या सहनशीलतेची एकूण ! यांत हो तुम्हांला कौतुक कसलें वाटतें ? तुमची विचारपद्धति जगावेगळीच कांहीं आहे एकूण ! " मी म्हणाल्यें.

" खरोखरच जगावेगळी आहे. लीले, अध्यात्मशास्त्राच्या दृष्टीनें ब्रह्म सत्य असून जग मिथ्या आहे, ही वेदांती लोकांची जगाविषयींची कल्पना आपण सोडून दिली, तरी व्यावहारिक दृष्टीनेंहि जगांत आपल्याला जितका सत्याचा पसारा दिसतो, तितका खरोखर तो नाहीं. सत्यवादी महात्म्यांच्या पुण्याईवर जरी जगाची रहाटी चालत असली, तरी एकंदरींत आंत एक बाहेर एक अशा दुरंगी वृत्तीच्या माणसांचीच या जगांत फार गर्दी आहे. तूं म्हणतेस तसा राग जगरूढीच्या गुलामगिरींत खितपत पडलेल्या एखाद्याला त्याच्या मित्राविषयीं कदाचित् आला असता; पण त्याच्यापाशीं अनंत आपलें अंतःकरण उघडें करून दाखवता असता कशाला ? चुका होत नाहींत कुणाच्या हातून ? मी मी म्हणणाऱ्या दूरदर्शी, ज्ञानी लोकांच्याहि हातून चुका होतात; पण माझी चूक झाली, असें प्रामाणिकपणें कबूल करणाऱ्या जीवाच्या वांट्याला मानखंडणा येते, व आपल्या चुकांवर दडपण घालून पवित्र म्हणून उजळ

माध्यानें जगांत वावरणाऱ्या लोकांना शांति-सौख्य-समृद्धींची जोड मिळते, ही जगाची रीत आहे. तत्त्वाच्या दृष्टीनें विचार केला असतां एखाद्या चोरानें चोरी केल्यावरहि त्याला पश्चात्ताप होऊन तो न्यायासनासमोर आपला गुन्हा कबूल करील, तर त्याच्या वांट्याला तुरुंगवास येतो, आणि चोरी करून सोळा आणे नाकबूल होणारा अट्टल लफंग्या मात्र अनेक वेळां निर्दोषी म्हणून सुटतो. ही जगाची रीत आहे, व या जगाशीं वागतांना आम्हांला अनेक वेळां ह्या रितीची गुलामगिरी पत्करावी लागते. याचें नांव व्यवहार! हा व्यवहार बरें लीले, हा व्यवहार! आपल्याला माहीतच आहे कीं, आंधाऱ्या रात्रीचा आंधार जास्त काळाकुट्ट करण्यासाठीं या पृथ्वीच्या पाठीवर कितीतरी स्त्रीपुरुषें विषय-वासनांच्या सुरीनें देहाच्या देव्हाऱ्यांत लावण्यवती नीतिमत्तेचा खून पाडीत असतात व दिवसा बहीणभावंडेंशीं समाजांत वावरतात, याचें नांव व्यवहार! आपल्या प्रजेचा जीवनव्यापार सुरळित चालावा म्हणून राजा कायदे करतो, पण त्याच कायद्यांच्या आधारें वकील आपल्या अशिलांचें अन्याय्य वर्तन न्याय्य ठरवितो, याचें नांव व्यवहार! एखाद्या स्त्रीचें फसून वांकडें पाऊल पडलें व मग तिला पश्चात्ताप होऊन तिनें आपला गुन्हा कबूल केला, तर समाज तिला बहिष्कृत ठरवील, व निंदेचे जळजळीत निखारे तिच्या आंगाव-वर फेंकून तिला व्यभिचारी म्हणेल. पण तीच स्त्री चोरट्या वाटेनें आपल्या पापाची पंखड घेऊन चालतां चालतां प्रतिष्ठितपणानें समाजांत वावरली, तर मात्र नीतिमान् नीतिमान् म्हणून तिचे जोडे डोकीवर घेऊन नाचण्याची जगाची रीत आहे, याचें नांव व्यवहार! लीले, हा व्यवहाराचा विळखा जर मानवी समाजाच्या मानेला पडला नसता, तर ज्यांच्या मातापितरांचा पत्ता नाहीं, अशा अनाथ, पोरक्या मुलांना पोसण्यासाठीं जगांत जागोजाग अनाथ-बालकाश्रम काढावे लागले नसते. 'मीं अन्याय केला' असें कबूल करून जर एखादी अधःपतित विधवा पश्चात्तापपूर्ण स्वरानें समाजाच्या दारीं क्षमेची भिक्षा मागूं लागली, तर समाज तिच्या अब्रूचे धिंडवडे काढून तिला जगां-तून उठवील! या व्यवहाराला भिऊनच ना ती बालहत्या करून आपलें पाप धुवून काढते? अशीं एक नव्हे, दोन नव्हेत, आकाशांतील नक्षत्रांच्या नक्ष-त्रपटीनेंहि मोजतां येणार नाहींत, इतकीं पापें ह्या व्यवहारानें जगाच्या डोक्यावर रचून ठेवलीं असून त्या पापांची जी छाया जगभर पसरलेली आहे, तिलाच

जग व्यावहारिक चातुर्य अशी संज्ञा देतें, समजलीस लीले! ह्या व्यवहार-चतुरतेची लटकी चाड न बाळगतां अनंत शाश्वत सत्यानें माझ्याशीं वागतो, याबद्दल मी त्याचा राग धरूं काय ? " निळकंठ म्हणाले.

निळकंठांची ही इतकी पावन विचारप्रणालि पाहून मला अचंबा वाटला. कितीहि जीवश्च कंठश्च मित्र असले तरी 'बायको' ही वस्तूच अशी आहे कीं, ती त्यांच्या मित्रत्वांत खो घालते. बायकांच्या हातीं जशी राष्ट्राच्या भावी पिढीच्या पाळण्याची दोरी असते, तशीच मत्सराच्या पाळण्याचीहि दोरी असते. भांडणतंटे व घरमोडीच्या कल्पना ह्या नेहमीं बायकांच्या पांचवीला पुजलेल्या असतात, ही सामान्यतः दिसून येणारी जगाची रीत काय ती मला माहीत होती. पण ह्या सामान्य माणुसकीच्या दिसणाऱ्या क्षितिजापलीकडे खऱ्या माणुसकीचें एक खरें क्षितिज आहे, व या क्षितिजावर उभें राहून जगाकडे पहाणाऱ्या लोकांनाच खरें विश्वरूप दिसतें, याची अंधुक कल्पना मला आज आली. मी अगदीं निरुत्तर होऊन बसल्यें.

इतक्यांत अनंतराव मला म्हणाले, " ऐकलेंस लीले, ह्या वृत्तीला खरी माणुसकी म्हणतात ! "

यावर निळकंठ म्हणाले, " पण महाराज, आपली माणुसकी मात्र या ठिकाणीं चांगलीच कसाला लागायची वेळ आली होती. सामान्य संसार-सुखाच्या लालसेनें आपले विचार असे दाही दिशांना बहकूं देणें व ते आवरेनासे होऊन मन मानेल तसा पिंगा घालूं लागले, कीं त्यांच्या संगतीला विटून निराश होणें, हा कांहीं आपल्या माणुसकीचा गौरव नव्हे; ही विटंबनाच आहे. तुला आठवतें अनंत, आपण लहानपणीं एकमेकांना आणाभाका दिल्या होत्या, कीं, कांहीं झालें तरी बायका हें भांडणाचें मूळ आहे; त्यांच्या मोहाला आपण बळी पडायचें नाहीं. ते बोल तूं इतक्या लवकर विसरलास का ? "

मी म्हणाल्यें, " अशाच जर तुमच्या आणाभाका असतील,-अन् अनंत, तुम्हीं कट्टे सुधारक आहां ना हो ? मग—"

मला पुरतेपणीं बोलूं देण्यापूर्वीच अनंत म्हणाले, " कां ? तुझ्या विधवा-निवासांत एखादी 'पुनर्विवाहाला तयार' झालेली विधवा असेल ? "

" होय. तिला आपण पदरांत घेतां का ? " मीं विचारलें.

मला अनंतरावांच्या स्वभावाची परीक्षा होतीच; पण आपला मनाशीं

विचार केला कीं, टांकीवर घाय घालीत असावें. अनंत उद्‌गारले, " तुमच्या आश्रमांतल्या विधवा तेवढ्या---"

मीं अनंतांना पुढें बोलूंच दिलें नाहीं. त्यांच्या तोंडावर हात ठेवून म्हणालें, " पुरे झालें. तुम्ही म्हणतां तशा आमच्या विधवा कांहीं जगांतून उठलेल्या नाहींत. "

" नाहीं तर काय ? " अनंतराव म्हणाले, " तुमचा विधवानिवास म्हणजे पुनर्विवाहाच्या आशेला आलेल्या व संसाराच्या, मुलाबाळांच्या सुखाला तहा-नेलेल्या विधवांचें एक संग्रहालय आहे. "

मी उतरल्यें, " तुम्ही करतां हा आरोप आमच्या विधवानिवासाला फार तर लागू पडेल. कारण, निवासाचे नियमच तसे आहेत. ' पुनर्विवाह करीन ' अशी कबुली दिल्याशिवाय कोणाहि विधवेला आमच्या विधवानिवासाची पायरीच्र चढतां येत नाहीं. पण ही इच्छा निवासांतल्या साऱ्याच विधवांच्या हाडींमाशीं खिळलेली असते, असें मात्र नाहीं. "

" तर काय ? या पुनर्विवाहाच्या सौदेवजा पद्धतीचा ज्यांना तिट्कारा आहे, अशा कोणी विधवा तुमच्या विधवानिवासांत आहेत का ? " निळकंठांनीं विचारलें.

मी उत्तरल्यें, " होय. "

अनंत म्हणाले, " मग त्यांना तुमच्या त्या विधवांच्या संग्रहालयांत रहा-ण्याची लाज नाहीं वाटत ! लोक तुमच्या उद्देशांची इतकी छीः थूः करतात, अनीतिमान् विधवांचे पुनर्विवाहाचे सोहाळे तुमच्या निवासाच्या पंखाखालीं निर्वेधपणें पार पडतात, अशा कुधारणेच्या बजबजाटांत कुजत पडणाऱ्या नव्या नव्या विधवा तुम्हांला प्रत्यहीं कशा मिळतात, याचेंच मला आश्चर्य वाटतें ! "

मी म्हणाल्यें, "आश्चर्य कसलें त्यांत ? अनंत, पोटाचा प्रश्न आला, कीं तिथें लाज, लज्जा, भीड, मर्यादा चट् सारीं खुंटीला गुंडाळून ठेवावीं लागतात. ज्या विधवांना आईबाप, सगेसोयरे किंवा भाऊबंद पोशिंदे नाहींत, त्यांना निरुपा-यानें पोटाची खळगी भरण्यासाठीं-केवळ पोटाची खळगी भरण्यासाठीं बरें अनंत, अशा धर्मार्थ संस्थांचा आश्रय करावा लागतो, व आमच्या निवासांत येणाऱ्या अनाथ विधवांना आपली खुषी नाखुषी बाजूला ठेऊन घांसभर अन्नाच्या व

टीचभर वस्त्राच्या मोबदल्यांत पुनर्विवाहाची कबुली द्यावी लागते. यांत आम्हां विधवांचा कसला आला आहे दोष ! ही खऱ्याखुऱ्या विधवांची गोष्टच सोडा; पण कुठें बोलायची गोष्टच नाहीं निळकंठ, आमच्या समाजांतल्या गरीब व पोरक्या मुलींना अन्नवस्त्रासाठीं आपल्या पवित्रतम कौमार्याला मह्राग होऊन आपल्या भालप्रदेशावरचा कुंकुमटिळक पुसून उसनें वैधव्य आणावें लागतें, व अशा विधवा कुंवारी—निळकंठ, तुमच्या हिंदी राष्ट्राची भावी पिढी ज्या मातांच्या पोटीं जन्माला येणार, त्या उद्यांच्या माता ' फुटक्या कपाळाची विधवा ' म्हणून समाजांत ओळखल्या जातात ! "

माझे वरचे बोल ऐकून निळकंठ व अनंत या दोघांच्याहि आंगावर कांटा उभा राहिला. निळकंठांनीं विचारलें, " लीले, हें खरें का ? एखादी कुंवार आपत्तीनें कितीहि गांजली असली तरी केवळ पोटासाठीं, हिंदुसमाजाला ललामभूत होऊन राहिलेलें आपलें हक्काचें मंगल कौमार्य सोडून ' विधवा ' हा अपशकुनी डाग आपल्या नांवाला लावून घ्यायला कधीं तरी तयार होईल का ? "

अनंतांनींही असाच संशय प्रदर्शित केला. मी उत्तरल्यें, " होईल का असा संशय कशाला ? झाली आहे.—या घटकेला अशी कुंवार आमच्या विधवा-निवासांत नांदत आहे. तिला जो तो आज ' विधवा ! विधवा ! ही फुटक्या कपाळाची विधवा ' म्हणत आहे व ही निंदा केवळ पोटासाठीं सहन करतां करतां ती बिचारी दोधाई ढळढळां रडत आहे ! "

माझे बोल ऐकून अनंतांना कळवळा आला. ते गद्गद कंठानें म्हणाले, " अरेरे ! हा आपला हिंदुसमाज ! आम्हां हिंदूंच्या कुंवार बहिणींना केवळ पोटाची टीचभर खळगी भरण्यासाठीं वैधव्याचें उसनें अमंगळ पाप आपल्या आंगाला चिकटवून घ्यावें लागतें. ही विधवांची परवशता विधवानिवासासारख्या ' पुनर्विवाहाला तयार ' करणाऱ्या विधवांच्या संग्रहालयानें कशी दूर होणार ? त्या समाजसुधारकांना विधवांची वैषयिक सुखलालसा तेवढी आठवली व त्या लालसेच्या वणव्यांत जळून त्यांचा कोळसा होऊं नये, म्हणून त्यांनीं ' पुनर्विवाहाला तयार ' असणाऱ्या विधवांचें हें संग्रहालय उघडलें. पण त्या ऐवजीं पोटासाठीं तळमळणाऱ्या विधवांना योग्य तें निर्वाहापुरतें शिक्षण देतां येऊन त्यांच्या पोटाचा प्रश्न मिटवतां येईल, त्यांची विचारपद्धति प्रगल्भ करतां येईल व त्यांच्या आयुष्याची जबाबदारी त्यांची त्यांना कळूं लागेल, अशी

सुधारणा खेडोखेडीं केली गेली असती तर स्त्रियांची परवशता बऱ्याच अंशांनीं दूर झाली नसती का! मला वाटतें, उदरनिर्वाहाचा एखादा सभ्य धंदा करून अन्नवस्त्र मिळवतां येईल, अशी पात्रता आंगीं आल्यावर कितीतरी विधवा अशा विधवानिवासाची पायरीहि चढणार नाहींत. आज विधवानिवासांत खितपत पडलेल्या विधवांत अशा कितीतरी अढळ पतिव्रता असतील कीं, ज्यांना आपला दिवंगत पति हेंच परब्रह्म वाटत असेल. त्या पतिदेवतेची गोजिरवाणी मूर्ति आपल्या कल्पनांच्या कुंचल्यांनीं चित्ताच्या चित्रपटावर रंगवून तिचें भजन, तिचें चिंतन व तिचा निदिध्यास करण्यांतच त्यांना स्वर्ग-मोक्ष-वैकुंठाची जोड मिळत असेल! पण पोट! हा पोटाचा अवघड प्रश्न सोडवण्यासाठीं त्यांना आपल्या दिवंगत पतीला दुर्बलतेच्या केराच्या कोंपऱ्यांत झांकून ठेऊन त्याच्या व आपल्यामध्यें नव्या संसाराच्या नव्यां विचारांची माती अश्रूंनीं भिजवून त्या मातीची भिंत बांधावी लागत असेल, व त्या भिंतीच्या आडवशांत नव्या पतीला आपला देह अर्पण करावा लागत असेल!—यालाच पुनर्विवाह म्हणावयाचें ना लीले! शिव शिव!"

"पण ज्यांना पांचव्या वर्षी सौभाग्य व सातव्या वर्षी वैधव्य प्राप्त झालें, अशा बालविधवा म्हणजे खऱ्याखुऱ्या कुंवारीच नव्हेत का? माझी एक बालमैत्रिण आपली अशीच कर्मकथा सांगते. ती म्हणते, ती विधवा झाल्याचें लोक सांगतात, म्हणून तिला माहीत. लहानपणीं एके दिवशीं तिची आई रडत रडत तिच्यापाशीं आली व उभी राहिली. 'आई काय ग झालें?' असें तिनें तिला विचारलें, तेव्हां 'पोरी, तुझें कपाळ फुटलें' असें सांगून आईनें आपल्या लुगड्याच्या पदरानें तिच्या कपाळींचें कुंकु पुसलें. ती तेव्हां सारी सात वर्षांची होती. कुंकुं पुसून विधवा कां व कशा होतात, हें तिला तरी काय माहीत? नवरा वारला म्हणजे कुंकुं पुसतात खरें; पण नवरा ही चीज कशाशीं खातात, हें तरी तिला कुठें माहीत होतें? यानंतर बरेच दिवस वैधव्याचा प्रश्न तिला न उमजल्याकारणानें ती आईला कुंकुं लावतांना रोज विचारी, 'आई, तुझ्या कपाळाला तेवढें कुंकुं अन् माझ्या कां ग नाहीं?—' आणि मला मूल झालें असलें तरी मीहि चौदाव्या वर्षीच विधवा झाल्यें ना? अशा आमच्यासारख्या बालविधवांनींहि पुनर्विवाह करूं नये कीं काय?" मीं विचारलें.

या माझ्या पृच्छेवर निळकंठ उत्तरले, " लीले, या ठिकाणीं विधवांनीं पुनर्विवाह करावा किंवा न करावा, हा प्रश्न नाहीं. माझें म्हणणें एवढेंच कीं, कोणाहि व्यक्तीनें, संस्थनें किंवा समाजानें कोणाहि विधवेवर पुनर्विवाहाची सक्ती करूं नये. लग्न काय किंवा पुनर्विवाह काय, हा प्रश्न स्त्रीपुरुषांनीं आपल्या जाणतेपणीं सोडवायचा असतो. ज्या विधवांना पुनर्विवाह करावासा वाटेल, त्यांनीं खुशाल करावा. कारण, पंढरपूरसारख्या क्षेत्रीं अनाथबालकाश्रमांत बेपत्ता आई-बापांचीं मुलें दिवस काढीत आहेत, त्यांना आपल्या पुनर्विवाहित पित्याच्या संसारांत पुनर्विवाहित मातेच्या मांडीवर खेळतांना पाहून आम्हांला आनंदच वाटेल. मनोविकारांना बळी पडून पुढें केवळ अब्रू बचावण्यासाठीं त्या मनो-विकारांतील पापाची साक्ष पटवून देण्याकरितां जन्माला आलेल्या अर्भकांचें नरडें मुरगळण्याचें आसुरी धैर्य आमच्या विधवांच्या आंगीं उत्पन्न होण्या-ऐवजीं पुनर्विवाहाच्या नव्या संसारांत नव्या संतानांना आंगच्या दुधाचा पान्हा पाजून वाढवणाऱ्या सात्विक वृत्तीच्या माता मिळतील तेवढ्या आमच्या समाजाला पाहिजेच आहेत. पण हें कार्य कांहीं ' धर विधवा, कीं लाव पुन-र्विवाह ' अशा सुधारकी चाळ्यांनीं तडीला जायचें नाहीं. राष्ट्रांतल्या एकूणएक लहानथोर स्त्रीपुरुषांचें शील तयार होऊन ज्याला त्याला आपल्या आयुष्याची जबाबदारी ओळखतां येऊं लागेल व स्वावलंबनाचा धडा स्वतःला गिरवतां येईल, असे कांहीं उपाय योजिले गेले, तरच त्यांना सुधारणा म्हणतां येईल. हें ध्येय डोळ्यांसमोर ठेवून ज्या संस्था निघतील, त्यांच्याच हातून समाजसेवा किंवा देशसेवा होईल. "

"तें सारें होईल. अशा संस्था आम्हीं काढूं व त्यांत परमेश्वर आम्हांला यशहि देईल. मनांतल्या साऱ्या गोष्टी जुळल्या तर एक नमुनेदार विधवाश्रम काढायचा माझ्या मनांत आहे. पण मीं विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर ? " मीं विचारलें.

अनंत गोंधळल्यासारखे झाले. त्यांना आतां काय बोलावें, हेंच सुचेना. मी निळकंठांना म्हणाल्यें, " निळकंठ, तुमचा शब्द तरी खर्च करा ना त्यांच्यापाशीं ? मित्राची भीड मित्राच्यानें कधीं मोडवत नसते. "

माझी खात्री होती कीं, निळकंठांचा शब्द कांहीं अनंतांच्यानें मोडला जाणार नाहीं. नीळकंठांनीं मला विचारलें, "लीले, तूं म्हणतेस ती नवरी मुलगी बालविधवा कोण आहे ? "

" घटकाभर समजा; मीच आहें. इतके दिवस मी मन सोडून बोलल्यें नाहीं; पण आतां बोलल्यें. आतां तरी सांगा अनंत, आपण माझें पाणिग्रहण करायला तयार आहां का ? अनंत, तुमची माझी ओळख आज दोन वर्षांची आहे, पण मीं आजपर्यंत हा प्रश्न आपणासमोर काढला नाहीं; कारण, आजपर्यंत पुनर्विवाहाला माझें मनच तयार होत नव्हतें. पण आज तें तयार झालें. आतां द्या माझ्या प्रश्नाचें उत्तर ! " मीं विचारलें.

निळकंठांनाहि माझी दया आली. त्यांनींहि अनंतांना उपदेश केला, " अनंत, लीलाच ती विधवा असली तर तिच्यासारखी सच्छील वधू मिळाल्यावर तुला आणखी काय पाहिजे ? माझ्या मतें तूं तिला पदरांत घ्यावेंस. "

मला वाटलें कीं, आतां मात्र मित्राची भीड मित्राच्यानें मोडवणार नाहीं. पण—पण काय ! अनंत उत्तरले, " निळकंठ, विवाहसंस्कार म्हणजे कांहीं बाजारांतल्या भाजीपाल्याची बाजारहाट करणें नव्हे. ह्या जन्माच्या गांठी जन्मांतून एकदांच पडायच्या असतात. ह्या ब्रह्मगांठी असतात. ही ब्रह्मगांठ लीलेच्या पहिल्या विवाहांत एका पुरुषाच्या पदरीं मारली गेली. ती लग्नकाळची शोभा हरपली, ती लग्नगांठ करपली, तरी तिचे वळसे कांहीं सुटले नाहींत. अशा स्थितींत पुनर्विवाह करणें किंवा न करणें हा लीलेच्या व माझ्या कुलाचा, शीलाचा, नीतीचा, धर्माचा प्रश्न आहे. लीले, तूं बालविधवा ऐस किंवा प्रौढ विधवा ऐस; तूं विधवा आहेस—तूं परदारा आहेस. आर्य पतिव्रतांनीं, एकदां ज्याला माळ घातली, त्या एका पतीशिवाय सारे पुरुष आपल्या बाप-भावांप्रमाणें मानायचे असतात, हा आर्य पतिव्रतांचा उज्ज्वल सतिधर्म तूं विसरूं नकोस. तूं परदारा आहेस, मी परपुरुष आहें. तूं माझी बहीण आहेस, मी तुझा भाऊ आहें. "

अनंतांच्या बोलण्याचा मला रागहि आला, व रडूंहि आलें. मी निळकंठांना विचारलें, " निळकंठ, इथें तुमच्या शब्दांचीहि कांहीं मात्रा चालत नाहींना ? त्यांना तुम्ही दोन गोष्टी सांगत नाहीं ना ? "

" निळकंठ काय सांगणार ? लीले, तूंच सांग. तूं परदारा ना ? परदारेचा दार होणें, हें जारकर्म, हा अधर्म नव्हे काय ? ज्या पुरुषानें आपल्या धर्मार्थकाममोक्षांचा अर्धा वांटा तुला देऊन आपल्या संसाराची ठेव प्रेमानें, विश्वासानें तुझ्या स्वाधीन केली, ज्यानें अग्नि-ब्राह्मणांसमक्ष तुझें पाणिग्रहण केलें,

त्या आपल्या सौभाग्यदेवतेशीं तूं प्रतारणा करणार काय ?–पण हा तुझा दोष नाहीं. विषयोपभोगांसाठीं हपापलेल्या इतर चारचौघां लोलुप विधवांप्रमाणें तूंहि हपापलीस, यांत तुझा तरी कसला दोष ! आज काल कांहीं लोकांनीं गत रूढींच्या माना मोडून, परंपरेच्या छातीवर पाय देऊन हा जो सुधारणेचा गोंधळ माजविला आहे, त्याचा हा परिणाम आहे. लीले, हीच तूं विधवा जर कांहीं शतकांपूर्वीची असतीस, तर खास आजच्या लीलेहून इतकी निराळी दिसली असतीस कीं, तुला ओळखतांच आलें नसतें. लीले, शतका–दोन शतकांपूर्वीच्या तुझ्या जन्मीं जर तुझ्यावर वैधव्याचा असाच डोंगर कोसळला असता, तर त्या डोंगराखालीं आपण गडप् होऊं, या भयानें तूं दुसऱ्या पतीच्या संसारांत––त्या नरककुंडांत––उडी मारून आपला जीव बचावला असतास काय ? पहिल्या पतीच्या निधनानंतर दुसरा पति करावा, ही पापवासना त्या वेळीं तुझ्या मनाला शिवली तरी असती का ? केवळ इंद्रियांचे चोज पुरविण्यासाठीं तूं परपुरुषाच्या शय्येवर आपलें शरीर विटाळायला आज तयार झालीस, तशी त्या वेळीं तयार झाली असतीस का ? नाहीं. मला वाटतें, लीले, ही परपुरुषाच्या शय्यासंभोगाची कल्पना त्या शतकांत जर कोणी तुझ्या कानीं येऊन सांगितली असती, तर तुझ्या हृदयावर तीच वीज पडून त्याची राख झाली असती. त्या वेळीं तुझा पति मृत्युशय्येवर पडला असतां कालांतरानें तशाच दुसऱ्या शय्येवर दुसऱ्या पतीशीं आपल्याला नवे विलासविहार करायचे आहेत, ही जालीम विषारी कल्पना तुझ्या अंतःकरणांत जागृत तरी झाली असती का ? त्या गतकाळच्या पुण्यशतकांत ज्या ज्या भारतीय पुण्यपतिव्रतांचे पति मृत्युशय्येवर पडले, त्यांना त्यांना पतीशीं सहगमन केल्यावर स्मशानभूमींत व स्वर्ग-मोक्ष-वैकुंठांतहि अक्षय पतिसेवा घडविणारी पतीची चिताच निदानींची विलासशय्या म्हणून डोळ्यांसमोर दिसत असे. त्या चितेंत स्वतांच्या देहाची आहुति देऊन, त्या चितेंतून निघणाऱ्या धुराच्या विमानांत बसून वायुरूप दिव्य देहानें स्वर्गारोहण करण्यांतच त्यांना आपल्या पातिव्रत्याचा मंगल शेवट करावासा वाटे ! धन्य त्या पतिव्रतांची ! धन्य त्यांच्या चारित्र्याची ! विसाव्या शतकांतील पतिव्रते, लीले, सुधारणेच्या वेलीवरील भासमान विषयसुखांच्या फुलांना भुलून स्वतांच्या परंपरागत पातिव्रत्याची माती करूं पहाणाऱ्या विधवे, तुला ती गतपतिव्रतांची दिव्य दृष्टि प्राप्त होत

नाहीं का ! लीले, ह्या आजकालच्या विधवा !–पतीचा जीव पंचत्वाशीं एक जीव होत असतां पुनर्विवाहांतील कलमबंदीच्या प्रेमवृक्षावर प्रेमाचीं गोड फळें म्हणून जे नवे जीव आपल्या उदरीं जन्माला येणार, त्यांचे तोंडवळे कसे असतील, याचा विचार करण्यांत विधवांनो, तुमच्या मनाची गुंतागुंत झाली असेल. पतीच्या निर्वाणकाळीं स्मशानांतील सहसमाधीची पेटती चिता डोळ्यांसमोर दिसण्याऐवजीं भविष्यकाळच्या नव्या सासरीं शय्यासुखासाठीं आपल्या वांट्याला कोणता पलंग येईल, याचें गोड कल्पनाचित्र आज तुमच्या डोळ्यांसमोर उभें रहात असेल. पतीच्या निधनानें आपल्या नांवामागील सौभाग्यपदाला हरताळ लागणार, म्हणून विषाद वाटण्याऐवजीं कालांतरानें नव्या सासरीं कोणत्या सुंदर अक्षरांचें सुंदर उपनांव दुसऱ्या पतीच्या नांवानें आपल्याला धारण करावें लागेल, याचीं स्वप्नमय दृश्यें पहाण्यांतच आज तुम्हांला कौतुक वांटत असेल ! लीले, हे सारे सुधारणेचे खेळ तुम्हांला खोट्या सुधारणांच्या कल्पनांनीं व नव्या नव्या रूढींच्या आणि नव्या नव्या स्मृतींच्या आधारांनीं शिकवले; पण त्यामुळें तुम्हांला तुमच्या परंपरागत अढळ पातिव्रत्याचा विसर मात्र पडत चालला, तुमची किंमत कमी होऊं लागली, तुमच्या शीलाच्या भांड्यांचा नाद जाऊं लागला, इकडे तुमचें लक्ष्य आहे काय ? ”

आतां मात्र माझी सहनशीलता हिणकस ठरली. अनंतांचे वाग्बाण मला कांहीं सहन होईनात. त्यांनीं माझ्या हृदयाच्या चिंध्या चिंध्या उडवल्या. मीं त्यांना हात जोडून विनवलें, “ अनंत, कृपा करून असल्या कठोर वाग्बाणांनीं मला घायाळ करूं नका.”

यावर अनंत पूर्वीसारख्याच कठोर हृदयानें उत्तरले, “ जा–परमेश्वराच्या पायां पड; त्याची प्रार्थना कर. लीले, एका काळीं जी तूं सौभाग्यवती म्हणून आपल्या पतीच्या सुखशय्येवर लोळत होतीस, तीच तूं, आज तुझें सौभाग्य डोळ्यांआड होतांच आपल्या देहानें परपुरुषाची शय्या भूषवूं पहातेस ! जा–तूं खरी पतिव्रता असशील, पुराणकाळापासून ह्या भारतवर्षाला ललामभूत होऊन राहिलेल्या आर्यसतींच्या पातिव्रत्याची तुला कांहीं चाड वाटत असेल, तर असल्या पापी विचारांनीं आपलें मन विटाळूं देऊं नकोस. असले चाळे आपल्या मनाला सुचूं नयेत, म्हणून निरंतर आपल्या पतिदेवतेची कल्पनामूर्ति आपल्या अंतश्चक्षूंसमोर उभी करून तिची पूजा अर्चा करण्यांत दंग रहा—”

इतक्यांत माझ्या मांडीवर झोंपीं गेलेला बिंबाधर जागा होऊन रडूं लागला, त्याच्याकडे बोट करून अनंत म्हणाले, "पहा ! हें पहा तुझ्या पतीचें गोड प्रतिबिंब तुझ्या ह्या राजबिंड्या बिंबाधराच्या रूपानें तुझ्या मांडीवर हंसत खेळत आहे. त्याचा गोंडस चेहरा, त्याचे बोबडे बोल, त्याच्या मनोहर बाल-लीला गोड मानून आपल्या जीवाची करमणूक करून घे. जा–तुझा पती, तुझा देव, तुझें जीवनसर्वस्व ह्या बिंबाधराच्या रूपानें तुझ्या रक्ताशीं मिसळून रोमरोमांच्या सहस्र नयनांनीं तुझ्याकडे पहात तुझ्या पातिव्रत्याची कसोटी ठरवीत आहे. त्याच्यासाठीं–त्याच्या छायेसाठीं–त्याच्या स्मृतीसाठीं, निदान त्याच्या ह्या जिवंत प्रतिबिंबासाठीं तरी तूं पुनर्विवाहाच्या फंदांत पडूं नकोस."

आतां या दोघांसमोर उभें राहणेंहि मला अशक्य झालें. आज दोन वर्षां-पासून मी अनंतरावांची कल्पनामूर्ति माझी सौभाग्यदेवता म्हणून मनांतल्या सातव्या मनांत सात कुलपांच्या जामदारखान्यांत दडवून ठेवली होती; पण या घटकेला मला कळून चुकलें कीं, ती चोरी कांहीं मला जन्मवेरीं पचणार नाहीं. मग उगाच आशा तरी कशाला हवी ? मी मनाचा धडा केला कीं, यापुढें अनंतांचें जगच आपण विसरून जावें. त्याप्रमाणें त्यांना निरोपहि दिला, "अनंत, आजपर्यंत मी तुमच्याकडे ज्या दृष्टीनें पहात होत्यें, ती माझी दृष्टि आपण फोडून टाकली आहे. आतां तुमच्यापुरती तरी मी आंधळी झाल्यें आहें. या जगांत मी आतां मेल्यें असें समजा व आजपासून मला विसरा."

निळकंठ मला म्हणाले, "लीले, इतका त्रागा करायला उठूं नकोस."

"त्रागा कसला त्यांत ! ज्या गांवाला जायचें नाहीं, त्या गांवची वाट तरी आपल्याला कशाला पाहिजे !" असें म्हणून मी त्यांच्यासमोरून वाऱ्यासारखी चालती झाल्यें.

*   *   *   *

सारें जग मला विधवा म्हणतें, व मीहि जगाला सांगत्यें कीं, मी विधवा ! पण मी विधवा नाहीं, हें एकट्या माझ्याशिवाय साऱ्या जगांत दुसऱ्या कुणालाहि माहीत नाहीं. माझे बाबा व माझी आई माझ्या वयाच्या चौदाव्या वर्षी वारलीं, तेव्हां घरची गरिबी म्हणून कुंवारपणाचें दिवाळें काढून मी विधवा बनल्यें, व माझा बिंबाधर—माझ्या पाठीला पाठ लावून आलेला हा गुलाम बिंबाधर माझा मुलगा म्हणून साऱ्या जगाला सांगत आल्यें. माझ्या बाबांना

देवानें उदंड आयुष्य व उदंड संपदा दिली असती, किंवा त्यांच्या पश्चात् माझा कोणी पाठीराखा असता, तर माझ्या त्या सत्तेच्या कौमार्यावर फुलणाऱ्या सत्तेच्या सौभाग्याच्या रम्य फुलबागेंत भरल्या चुड्यांनीं मला संसार करतां आला असता. पण हें माझें व माझ्या बिंबाधराचें जन्मरहस्य जगाला काय माहीत ? माझीहि प्रतिज्ञा होती कीं, मरेतोंपर्यंत हें रहस्य रहस्यमय संशयाखालींच दडवून ठेवावें.—-अनंत, माझ्या सौभाग्यदेवतेचें प्रतिबिंब ह्या लहानग्या बिंबाधरांत एकवटलेलें पाहून तरी मी माझ्या पतीशीं प्रतारणा करूं नये म्हणतां, पण हा बिंबाधर माझ्या कुशींत जन्मलेला माझ्या पतीचा अंश नसून माझ्या मातेच्या कुशींत जन्मून माझ्या पाठोपाठ या जगांत आलेला माझ्या पित्याचा अंश आहे, हें यांतलें इंगीत तुम्हांला कुठें माहीत आहे ? —-बाळ बिंबाधर !–निर्व्याज छकुलें हें ! याला तरी काय माहीत कीं, मी याची आई नसून ताई आहें म्हणून ! ह्या बाळाच्या बोबड्या बोलांतून परमेश्वर नित्य जगाला सांगत असतो कीं, हा बिंबाधर लीलेच्या पोटचा नसून पाठचा आहे. पण ह्या बोबड्या बोलांचा असा अर्थ कोणी तरी लावील का ? आई, बाबा, तुम्ही स्वर्गातील निळ्या काळ्या ढगांच्या उतरंडीवर बसून माझ्याकडे पहात असाल का ? तुमची लाडकी लीला तुमच्या पश्चात् पोटासाठीं स्वतांच्या कौमार्यावर कालांतरानें उगवणारी सौभाग्याची कळी चुरडून जन्माची विधवा बनली, ती आज ‘ विधवा ! विधवा ! ही फुटक्या कपाळाची विधवा ! ’ म्हणून समाजाच्या निंदेला बळी पडत आहे, हें पाहून तुम्ही डोळे मिटून घेतले असतील का ? मी केवळ पोटासाठीं विधवानिवासाच्या चोरबाजारांत ‘ पुनर्विवाहाला तयार ! ’ म्हणून माझा कोरा पवित्र देह वापरलेल्या जुन्या जुन्हेराच्या नैतिक मोलानें विकायला काढला, या माझ्या पातकाबद्दल तुम्ही माझ्या मस्तकावर शिव्याशापांचा वर्षाव चालवला असेल का ? पण आई ! बाबा ! आईबापांनीं गरिबींत जन्म दिल्यामुळें त्यांच्या नांवानें बोटें मोडणाऱ्या उद्धट कन्यांप्रमाणें मी तुम्हांला कधींच दोष देणार नाहीं. तशी अधम कन्या मी नाहींच ! —बाळ बिंबाधर, तूं सुद्धां नाहीं ना रे मोठा झाल्यावर आपल्या जन्मदात्यांना, तीं गरीब म्हणून उणीं उत्तरें बोलणार ? —नाहींच बोलणार माझा बाळ ! तो तसा फार गुणी आहे. देवा ! आमच्या वंशवेलीवर उगवलेल्या ह्या मुक्या कळीला वाढत्या

आयुष्याचा वारापाऊस मिळून हंसण्याबोलण्याची वाचा फुटल्यावर आपण ज्या वेलीवर फुललों, त्या वेलीचीं पाळेंमुळें शोधण्याची बुद्धि देऊं नकोस!

* * *

अनंतरावांचा मला किती विश्वास होता! पण त्यांनीं ऐनवेळीं असा दगा दिल्यावर माझ्या मस्तकावर आकाश कोसळल्यासारखें झालें. एवढ्या अफाट जगांत कुणाचा आधार नाहीं व तशांत मी बाईल्माणूस! आतां मी काय करूं?

त्या दिवशीं अनंतरावांकडून नकाराचें अपयश घेऊन मी आमच्या विधवा-निवासांत येत्यें न येत्यें, तोंच निवासाच्या व्यवस्थापकांनीं माझ्यामागें टुमणें लावलें कीं, पुनर्विवाह करा. निवासाची पायरी चढतांनाच मी पुनर्विवाह करीन, अशी कबुली दिली होती. अर्थात् ते सांगतील त्या वेळीं पुनर्विवाहाची नवी नवरी सजणें मला प्राप्त होतें. झालें. माझी कबुली मिळतांच ठिकठिकाणच्या वर्तमानपत्रांतून 'एक अठरा वर्षें वयाची कऱ्हाडे ब्राह्मण जातीची सुशिक्षित व सुस्वरूप गतभर्तृका पुनर्विवाहाला तयार!' अशी जाहिरात फडकूं लागली! माझ्या दुर्दैवानें पहिल्या वेळीं जाहिरातींत 'ब्राह्मण जातीचा वर पाहिजे' अशीं अक्षरें ल्याहायचीं विसरून गेल्याकारणानें मला ब्राह्मणांपेक्षां अब्राह्मणांनींच विशेष मागणी घातली. त्यांतले अब्राह्मणांचे तेवढे सारे अर्ज व्यवस्थापकांनीं अगोदरच निकालांत काढले व ब्राह्मणांचे तेवढे माझ्यापाशीं दिले. त्यांत एक अमळनेरचे सुशिक्षित कऱ्हाडे बिजवर सुमारें चाळिशीच्या उमरीचे होते. दुसरे पुण्याचे एक कऱ्हाडे प्रोफेसर होते; त्यांना पहिली बायको जिवंत असतांना दुसरी बायको करायची होती. तिसरे सोलापूरचे एक बिजवर वकील होते. पण या तिघांपेक्षांहि ध्यानांत ठेवण्यासारखी एक व्यक्ति म्हणजे मुंबईचेच साठीची झुळुक लागलेले एक लक्ष्मीपुत्र होते. इतक्या साऱ्यांनीं मला येऊन पाहिलें; पण माझ्या बिंबाधराला पाहून जो तो बिचकला! शेवटच्या नवरदेवांनीं मात्र लेंकुरवाळ्या विधवेशींच आपल्या मनांतून पुनर्विवाह करायचा आहे, असें सांगितलें. विधवानिवासाच्या नियमांप्रमाणें ते माझ्या आंगावर हजारांचे दागिने घालायला व स्वतांच्या नांवची विम्याची पॉलिसी, इतकेंच काय; पण घरदारहि माझ्या नांवानें करून द्यायला तयार होते; पण त्यांना मात्र मी साफ नकार दिला. मनांत म्हणाल्यें, असल्या मळमळीत सौभाग्यापेक्षां झळझळीत वैधव्य आहे तें काय वाईट!

यामुळें विधवानिवासाचे व्यवस्थापक माझ्यावर रागावले. माझा बिंबाधर माझ्या पुनर्विवाहाच्या आड येईल, अशी त्यांना पूर्वीपासूनच अटकळ होती. तीच शेवटीं खरी झाल्यावर ते मला म्हणाले, बिंबाधराला अनाथबालकाश्रमांत पाठवायचा. मीं साफ सांगितलें कीं, माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत मी कांहीं त्याला हातावेगळा होऊं द्यायची नाहीं. त्याला आई नाहीं, बाप नाहीं, बिचाऱ्याच्या खस्ता कोण काढणार ! तसें नाहीं तर त्या म्हाताऱ्याशीं पुनर्विवाह करा, असें मला सांगण्यांत आल्यावर मात्र मला चीड आली. मी रागाच्या भरांत उत्तरल्यें, ' माझ्यावर तुमची अशी बळजबरी चालणार नाहीं. '

व्यवस्थापकांनीं मला विचारलें, " चालणार नाहीं याचा अर्थ काय ? विधवानिवासाच्या नियमांप्रमाणें तुम्ही पुनर्विवाह केलाच पाहिजे. "

मीं विचारलें, " पण योग्यतेचा नवरा मिळाल्याशिवाय मी कशी बरें पुनर्विवाहाला उभी राहूं ? "

व्यवस्थापक रागानें माझ्या आंगावर जणूं काय वाघचसे तुटून पडले, " कसली योग्यता घेऊन बसलां तुम्ही ? लेंकुरवाळ्या विधवांना पोटापाण्याची सोय करून देण्यापेक्षां कोणत्या जास्त योग्यतेचा नवरा मिळणार ? "

मला हा अपमान सहन झाला नाहीं. पण मी त्यांचें अन्न खात होत्यें, त्यामुळें मला बोलायला तोंड नव्हतें. माझे डोळे पाण्यानें भरून आलेले पहातांच विशेष न बोलतां व्यवस्थापकांनीं मला एवढीच समज दिली, " तुमचें वर्तन उद्धटपणाचें व विधवानिवासाच्या उद्देशांना विघातक आहे. तें तसेंच कायम राहिल्यास तुम्हांला हा निवास सोडून जावें लागेल. ' पुनर्विवाहाला तयार ' म्हणून मी तुमच्या नांवची पुन्हां एकदां जाहिरात देतों. त्यावेळीं एक ना एक वर तुम्ही पसंत केलाच पाहिजे. "

किती किळसवाणी विवाहपद्धति ही ! आमच्या विधवानिवासाच्या नियमांप्रमाणें वधूवरांनीं एकमेकांना पसंत करण्याचें नाटक कांहीं घटकांत आटोपतें. नवरदेवाच्या नीतिमत्तेचा, कुलशीलाचा किंवा वयाचा विशेष खोल विचार न करतां त्यानें स्त्रीधन म्हणून कांहीं दागिने किंवा हजारा दोन हजारांची विम्याची पॉलिसी व ' बायकोचें पोट भरीन ' असें बिन् तिकिटाचें लेखी वचन दिलें, कीं त्याच्या पसंतीनुसार त्याला एक विधवा दान करायची ! मग त्या एकमेकांचे गुण, दुर्गुण, आवडीनिवडी कांहींहि असोत. निवासाच्या

अड्ड्यांत पुनर्विवाहाची जी ही सोडत उघडली जाते, या सोडतींत त्यांच्या नशिबानें येईल तें सुखदुःख त्यांनीं भोगावें. पुन्हां ही पद्धति सदोष म्हणतां कामा नये; कारण तिच्यावर सुधारकांच्या मान्यतेचा शिक्कामोर्तब झाला आहे ! प्रौढविवाह रूढ झाला याचें कारण वधूवरांना स्वतांवरची जबाबदारी कळूं लागून आपल्या आवडीप्रमाणें संसारांतील जन्माची जोड मिळवतां यावी. पण चार घटकांत आमचा विचारविनिमय होणार कसा, व आवडनावड ठरणार कशी ? अशा घाईनें झालेले पुनर्विवाह पाहून लोक म्हणतात, विधवा वधूनें वराला माळ घातली नाहीं; त्याच्या श्रीमंतीला, दागदागिन्यांना व एक दोन हजारांच्या विम्याच्या पॉलिसीला माळ घातली. विधवा वधू जशा कांहीं माणसांतून उठलेल्या असतात ! त्यांना चैनीपलीकडे सौभाग्याची कांहींच चाड नसते !

असल्या विधवानिवासांत—विधवानिवास तरी कसला हा ! ह्या विधवांच्या बाजारांत राहाण्यापेक्षां जीव देणें बरें, असें मला वाटूं लागलें. इकडे 'पुनर्विवाहाला तयार' म्हणून संस्थेमार्फत आणखी दुसऱ्या दोघीं विधवांबरोबर माझा लिलांव एकवार, दोनवार, तीनवार चालूच होता.

पण आमच्यापेक्षां आमची काळजी देवाला जास्त असते. तो सरस्वतीबाईच्या अंतःकरणांत उभा राहिला. त्या माझ्यापाशीं येऊन मला विचारूं लागल्या, " गुणवंतभावजींची बायको—शारदाबाई--आजारी आहे. तिचें आजारपण व मुलाबाळांचें घर—या साऱ्या गोष्टी मला व यमूला, दोघींना कांहीं झेंपत नाहींत. तुम्ही आमच्या घरीं येऊन राहातां का ? "

मीं लगेच होकार दिला, व सरस्वतीबाईच्या घरीं गेल्यें. अशानें विधवानिवासाचा ससेमिरा चुकला, यामुळें जीव हायसा झाला. जातांना अनंत किंवा निळकंठ यांचें मत मी मुद्दाम घेतलें नाहीं. त्यांचा गुणवंतरावांशीं उभा दावा होता. ते मला तिकडे जाऊं नको म्हणूनच सांगते असते. कारण गुणवंतराव बायकांशीं तितके सज्जन राहात नाहींत असें म्हणत ! पण न कां राहीनात ! माझ्यापुरतें मीं पाहिलें म्हणजे झालें.



# चवथी झुळुक

## राधा (१)

एकदां वीणावैनी मला म्हणाली, " वन्सें, चार दिवसांपूर्वी नगरभुवनांत स्त्रियांच्या कलाकौशल्याचें प्रदर्शन उघडलें आहे, तें पाहायला येतां का ? "

मीं विचारलें, " त्यांत पहाण्यासारखें असें काय आहे ? "

" काय आहे याचा अर्थ काय ? ठिकठिकाणच्या बायकांनीं केलेलीं कला-कुसरीचीं कामें आहेत. एकीनें वाढवलेल्या बांगड्यांचे तुकडे जमवून एक सुंदर तबकडी तयार केली आहे, एकीनें राजाराणीची झिगाची तजबीर भरली आहे, एकीनें मोठा थोरला रेशमी पोपट विणला आहे,—" इतक्यांत सूनबाई तिथें आली. तिच्याकडे बोट दाखवून वैनी म्हणाली, " आमच्या मनूताईनीं पैसे ठेवायच्या लोंकरीच्या पिशव्या तयार केल्या आहेत, तिच्या मैत्रिणींनीं तऱ्हतऱ्हेचे रुमाल विणलेले आहेत, असें काय आहेन् काय नाहीं;—चला तरी एकदां आमच्याबरोबर; मजा पाहून येऊं. "

यावर मी कांहीं बोलणार, तोंच सूनबाई वैनीच्या कानांना लागून पुटपुटली, तें मला ऐकूं आलें, " ताई, त्यांना कशाला ग बोलावतेस ? त्या असलें जुन्हेर नेसून आमच्याबरोबर आल्या तर तिथल्या साऱ्या बायका आम्हांला हंसतील ! "

वैनी सूनबाईला गप्प करून मला म्हणाली, " उठा. नेसा तें काल आणलेलें नवें लुगडेंन् चला आमच्याबरोबर. "

" ताई, मी आपली माझ्या मैत्रिणींबरोबर जात्यें. मला माझ्या पैशांच्या पिशव्या विकायच्या आहेत. " असें म्हणून सूनबाई झक्पक् पोशाग करून प्रदर्शनाकडे गेली.

वैनीचा शब्द मोडायचा नाहीं, म्हणून मी तिच्याबरोबर जायला तयार झाल्यें; पण काल आणलेलें नवें लुगडें कांहीं माझ्याच्यानें नेसवेना. त्याचा तो रुंदच रुंद रेशमी पदर, ते रुंद रेशमी कांठ,—इश्श ! माझ्यासारख्या डोकीवरच्या पदराच्या बायकांनीं इतक्या किंमतीचीं लुगडीं कशाला नेसावीं ? आंग झांकायचें म्हणून आंगभर जाडेंभरडें धडोतें असलें, कीं काम झालें.

मी लुगडें न नेसतांच निघाल्यें, असें पाहून वैनी मला म्हणाली, " असें काय वन्सं, नेसाना तें लुगडें ! "

मला चमत्कारिक वाटूं लागलें. मीं विचारलें, " वैनी, सवाष्णपणींहि इतकीं भारी लुगडीं मी नेसल्यें नाहीं, ती आतां अहेवपणीं कशी नेसूं ? "

वैनी म्हणाली, " त्यांत काय झालें ? शहरांतल्या तुमच्यासारख्या साऱ्याच बाया असलीं लुगडीं वापरतात. ही मुंबई आहे वन्सं, हें घर नाहीं.––नेसा तें लुगडें. "

वैनीच्या आग्रहासाठीं, तिच्या श्रीमंतीची अब्रू जाऊं नये म्हणून, मी तें लुगडें नेसल्यें. रेशमी पदर लोकांना दिसूं नये म्हणून मुद्दाम निऱ्यांत घेतला, इतकेंहि करून मला असल्या श्रीमंती थाटाची लाज वाटली. लुगड्याप्रमाणेंच पायांत जोडा घालण्याचा वैनीनें आग्रह केल्यामुळें मी पायांत जोडाहि घातला. माझ्या पायांना माझ्या साऱ्या आयुष्यांत जोड्याचा हा पहिलाच प्रसंग होता. हे चोचले आहेत, हें मला माहीत असूनहि वैनीच्या श्रीमंतीची अब्रू राखली जावी, व लोकांनीं माझ्यामुळें तिला हंसूं नये, म्हणूनच मी ते पत्करले.

म्हाताऱ्या सासूबरोबर फिरतांना पाहून मैत्रिणी हंसतील, या भयानें सूनबाई अगोदर निघून गेली हें मला कळलें. हेंच काय; पण इतर दिवशींहि तिच्या मैत्रिणी घरीं आल्या, म्हणजे ' ह्या आपल्या भावी सासूबाई ' अशी ओळख द्यायला तिला लाज वाटे. मोठ्या सुनेचें व माझें कधींच पटत नसे, व तिचा नवरा तर तिच्या मुठींत होता. त्यांची गोष्ट सोडली तर ही धाकटी सूनबाईच अपूर्वाईची; तेव्हां तिला ' सूनबाई ' अशी हांक मारावीशी वाटे. पण अशा वेळीं ' ओ ' द्यायलाहि सूनबाई लाजे. मला सूनबाई म्हणूं नका; मनू किंवा मनोरमा म्हणा, असें तिनें कितीतरी वेळां मला सांगितलें होतें, व पुढेंपुढें तर ती ' ओ ' देईनाशीच झाली. इतकें झालें तरी तिला मी असें नव्हे असें बोलल्यें नाहीं; कारण, ती श्रीमंताची लेंक होती. मी तिची सासू होणार असल्यें तरी तिची आश्रित होत्यें. रितीची एखादी गोष्ट तिला सांगायची झाली तरी ती भीतभीत, चोरासारखी सांगावी लागे व तीहि न ऐकण्यांतच आपली हुषारी दिसून येते, अशी सूनबाईची कल्पना असल्यानें माझ्या उपदेशाला ती सदा विरजण घाली.

आम्ही प्रदर्शनाच्या मंडपांत गेलों, तों तिथें बायकांचा नुसता बाजार भरलेला दिसला. मोठमोठ्यांच्या बायका-बहिणी-मुली इथें खुशाल निरनिराळ्या मालाचीं दुकानें मांडून बसल्या होत्या. सरस्वतीबाईची यमू व सूनबाई जवळ जवळ बसल्या होत्या. ह्या साऱ्या कोण तर म्हणे स्वयंसेविका ! एकसारखे पुरुष आपले प्रदर्शन पाह्यला म्हणून येत, जागोजाग स्वयंसेविका म्हणून ठाकून ठिकून उभ्या असलेल्या मुलींकडे वांकड्यातिकड्या नजरेनें पहात व त्यांच्या तोंडीं आपली वाहवा व्हावी, म्हणून त्यांच्या हाताला हात लागून ' सोनें ' बनलेला माल विकत घेत. सूनबाईच्या पैशांच्या पिशव्या तर चण्यांकुरमुऱ्यांसारख्या खपत होत्या !

ह्या शहरच्या बायकांना कांहीं तरी लाज ! मी एवढी म्हातारी सासू समोर आल्यें असें पाहून तरी सूनबाई उठून उभी राहील, अशी मला आशा होती; पण ती फुकट गेली. घरीं तर ती मला, निळूला किंवा कुणालाच लाजत नसे. पण शिकलेल्या मुली चाणाक्ष असतात, त्या घरच्या घरीं कशा वागल्या तरी परक्यांसमोर वडील माणसांचा मान ठेवीत असाव्या असें मला वाटे. ती कल्पना आज कांहीं गुणाला आली नाहीं. तिथचा तो बायकांचा बाजार पाहून मला प्रश्न पडला कीं, हें प्रदर्शन बायकांचें–त्यांच्या निलाजरेपणाचें आहे कीं काय !

माझीच सून व माझीच वैनी, यामुळें त्यांना नांवें ठेवतांना माझी कुचंबणा होत असे. त्या बहिणीबहिणींनीं तो तिरपा भांग पाडावा, फुग्याचा आंबाडा बांधावा, टांचण्यांनीं पातळाच्या निऱ्यांचा सोगा व पदर चापूनचोपून बसवावा, तोंडाला कसली ती मेली पांढरी पूड चोळावी, टांचणीनें कुंकूं लावावें, चुण्या पाडलेला फितीचा पोलका घालावा, पायांत लालभडक कोरा करकरीत जोडा, मनगटावर सोनेरी घड्याळ, डोळ्यांना चष्मा व डोक्यावर ती निळसर तांबूस रंगाची झगझगीत रेशमी छत्री ! अशा थाटानें बहिणीबहिणी बाहेर निघाल्या, कीं एखाद्याला वाटेल कीं, ह्या कोण आहेत ! माझा मुलगा नुसते केंस ठेवतो म्हणून मी म्हणें, पोरगा चवचाल झाला. पण इथें पहात्यें तर सूनबाई त्याच्याहि डोक्यावर बसली आहे !

प्रदर्शनाच्या मंडपांत ' हीच का तुझी सासू ?' अशी सूनबाईच्या मैत्रिणींनीं सूनबाईची थट्टा सुरू केली, ती मी ऐकत होत्यें. यमुना मनोरमेला समजावीत होती, " मनू , असें चिडूं नये. मैत्रिणी थट्टा करणारच ! "

यावर सूनबाई म्हणाली, " मीच ताईला जाऊन सांगत्यें, त्यांना घरीं घेऊन—" वेगासरशी सूनबाई वैनीकडे येऊं लागतांच यमुना तिला मध्येंच थांबवून समजावूं लागली, " मनू , वडील माणसांचा असा कंटाळा करून कधीं कुणाचें चालेल का ? "

" हो हो ! माझें चालेल. " असें म्हणून सूनबाई वैनीपाशीं आली, व तिच्या कानांत गुणगुणली, " ताई, ह्या मुली मला चिडवतात. तूं त्यांना तरी घेऊन घरीं जा किंवा मी तरी जात्यें. "

वैनी मला म्हणाली, " वन्सं, घरीं चला आतां. "
इतक्यांत सरस्वतीबाई मला हांक मारून म्हणाल्या, " राधाकाकू, आज एकदां आमच्या घरीं येऊन जाना ! "

वैनीच्या मनांतून खरोखर घरीं यायचें नव्हतेंच. तें तिचें मन ओळखून मी तिला तिथेंच सोडलें, व सरस्वतीबाईबरोबर त्यांच्या घरीं गेल्यें.

घरीं गेल्यावर सरस्वतीबाईंनीं मला विचारलें, " तुमची भावी सून बरीच चढेल दिसते नाहीं ? "

" नुसती चढेल दिसते कां ? आमच्या तोंडावर कितीतरी वेळां ती तुमची थट्टा करते हो राधाकाकू ! " लीला म्हणाली.

लीलेच्या मांडीवर गुणवंतरावांचा श्यामसुंदर खेळत होता, तो गुलाम मला विचारूं लागला, " कोण थट्टा करते ? आमची यमूआक्का का ? "

" नाहीं बरें बाळ ! " मी उत्तरल्यें, " सरस्वतीबाई, तुमची यमू खरो-खरच सालस मुलगी आहे. माझ्या सूनबाईला ती मघांशीं अक्कल शिकवीत होती. तुम्ही पाहिलेंच असाल तें नाटक ! "

" होय. " सरस्वतीबाई उत्तरल्या.

मी म्हणाल्यें, " तेव्हां माझ्या मनाला एक गोष्ट विशेष लागली ती हीच कीं, सूनबाई माझी सून म्हणवून घ्यायला लाजते. पण म्हणावें, माझ्या मुलाला मी नऊ महिने उदरांत वाढवून जन्म दिला, तेव्हां ना तो तुझा आतां नवरा होणार ! तो मला ' आई ' म्हणतांना लाजत नाहींन् तूं मात्र मला ' सासूबाई ' म्हणायला लाजतेस ! तूं उद्यां त्याची बायको होणार, त्याच्या तुटक्या खेंटराच्या वादीइतकी तुझी किंमत ! तुला इतका अभिमान हवा कशाला ! "

सरस्वतीबाई म्हणाल्या, " माहेरचें शिक्षणच मुलीला तसें मिळतें— तीच आमची यमू पहा ! "

"यमू खरोखरच लाखांतली मुलगी आहे." मी उत्तरल्यें, "यमूच्या नखाची सरहि माझ्या सूनबाईला यायची नाहीं. "

" म्हणूनच वाटतें, यमूला सून करायची नाकारलीत ! शिवाय तुमच्या सूनबाईला मंगळ आहे. " सरस्वतीबाई म्हणाल्या.

सूनबाईला मंगळ आहे, हे शब्द कानीं पडल्याबरोबर माझ्या आंगावर वीज पडल्यासारखी झाली. मंगळाची वधू बिन्मंगळाच्या वराला केली तर त्यांच्या संसाराचा हटकून बिघाड होतो म्हणतात. नानावैनी वधूवरांच्या पत्रिका पहाण्याच्या भानगडींत पडल्या नाहींत, याचें कारण तर हेंच नसेल !

मीं विचारलें, " सूनबाईला मंगळ आहे, हें तुम्हांला कसें कळलें ? "

" आमच्या गुणवंतभावजींसाठीं आम्ही तिच्या बापाकडून तिची पत्रिका आणवली. " सरस्वतीबाई म्हणाल्या. खास ! नानावैनींना माझा मुलगा जड झाला असला पाहिजे किंवा सूनबाई तरी जड झाली असली पाहिजे. एरव्हीं असला अमंगळ योगायोग जुळवून आणायला तीं तयारच झालीं नसतीं.

क्षणभर विचार केल्यावर सरस्वतीबाई पुन्हां मला म्हणाल्या, " मनोरमा ही वीणाबाईच्या पोटची नाहीं व नीळकंठहि पोटचा नाहीं. त्यांना ह्या दोघां मुलांच्या जन्माच्या शुभाशुभाची तितकी पर्वा कां वाटेल ! "

" मग हें लग्न कसेंहि करून मोडलें पाहिजे तर ! " मी म्हणाल्यें.

" तशीच कांहीं आमची इच्छा नाहीं; कारण कुणाच्या लग्नांत कधीं बिघाड घालूं नये म्हणतात. पण मोडलेंच तर माझी यमू तुम्ही करून घ्याल का ? " सरस्वतीबाई म्हणाल्या.

सरस्वतीबाईच्या ह्या प्रश्नांत किती तरी रसवंती भरली होती ! एखाद्या नाकीं सूत धरलेल्या माणसाच्या तोंडांत गंगा आणून घातल्याबरोबर त्याचे पंचप्राण जागे व्हावे, तशी माझ्या निळूच्या लग्नाच्या बाबतींत ठार मरत असलेली माझी आशा सरस्वतीबाईच्या ह्या शब्दांनीं पुन्हां जिवंत झाली. मी त्यांना विचारलें, " मला यमुना सून आवडते; अगदीं मनापासून आवडते. पण नानावैनी काय म्हणतील ? "

" त्याची नको काळजी तुम्हांला. मीं असें ऐकलें आहे कीं, तुमच्या नाना-

वैनींनीं शोधून काढलेला जांवई मनोरमेच्या आईबापांना पसंत नाहीं. ते तिला दुसरें स्थळ शोधायच्या विचारांत आहेत. तसें झालें तर अनायासें सुंठीवांचून खोकला गेला." सरस्वतीबाई म्हणाल्या.

मी म्हणाल्यें, "हो! आणि नाहीं म्हणून मलाच सांगायची पाळी आली तर तेंहि मी आज सांगायची नाहीं. त्यांना तोंवर भ्रमांतच राहूं दे. मी सांगेन, एवढ्यांतच कांहीं लग्नाची घाई नको. सिंहस्थाला अद्याप एक वर्ष आहे."

माझी युक्ति सरस्वतीबाईंनाहि पटली. त्यांनीं मला एवढें मात्र बजावून सांगितलें कीं, मनोरमेचा बाप प्रत्यक्ष येऊन या गोष्टीचा निकाल करीपर्यंत मी होकार किंवा नकार कांहींच बोलतां नये. लोक मला म्हणत, तुमची सून तुमच्या डोक्यावर मिरीं वाटील, इतकी जहांबाज आहे. पण आतां लोकांना म्हणावें ती माझी सूनच नव्हे!

सरस्वतीबाईंचा निरोप घेऊन मी घरीं आल्यें, तेव्हां एक गोष्ट मात्र मी विसरल्यें. यमुना सून झाली तर ती मुलगी चांगली आहे, सुंदर आहे, सालस आहे, शिवाय ती आमच्याच गांवची आहे—सर्व खरें. पण हुंडा काय देणार, हें मात्र मीं त्यांना विचारलें नाहीं. नानावैनींपाशीं हा प्रश्न मीं आपण होऊन काढला नाहीं याचें कारण, तीं आमचीं पोशिंदीं होतीं; पण यांचें कांहीं तसें नाहीं. बाकी, माझा मुलगा एकदांचा पदवीधर झाला असता तर मी पावड्यानें हुंडा उपसला असता. पण माझें कर्म खोटें, म्हणुन त्याला स्वराज्यन् स्वदेशी अशा भानगडींत पडायची वासना झाली!

जांवई पदवीधर नाहीं, व पदवीधर व्हायची आशाहि नाहीं, म्हणून नानावैनी अलीकडे निळूवर बरींच नाराज झालेलीं दिसत होतीं. मनांत म्हटलें, त्यांना म्हणावें, तुमची मुलगी आतां एखाद्या एकेऱ्या सोडून दुहेऱ्या पदवीधराला द्या. आपण आपली गरिबाची मुलगीच सून करणार. म्हणतात ना, मुलगी करावी गरिबाची नि मुलगी द्यावी श्रीमंताकडे!



# पांचवी झुळुक

## यमुना (१)

दररोज जो जो नवरा मुलगा मुलगी पाह्यला येईल, त्याच्यासमोर स्वतांच्या देहाचें प्रदर्शन करून परीक्षा देतां देतां माझा जीव मला नकोसा झाला होता. कुणाला माझें रूपच पसंत नाहीं तर कुणाला हुंडा पुरा पडत नाहीं. कुणाचें गोत्र जुळत नाहीं, तर कुणाला या वर्षीं लग्नच करायचें नाहीं. ह्या वरपक्षाच्या कुळाव्यांना वाटतें कीं, मुलगी पाहाणें म्हणजे जसें कांहीं गुरांच्या बाजारांत जाऊन एखादी आंखुडशिंगी, बहुदुधी म्हैस पैदा करण्यासारखेंच आहे !

ही जन्माची होणारी विटंबना अपुरी पडेल, म्हणूनच कीं काय, आईनें माझ्या मनांत निळकंठरावांविषयीं नसता प्रेमभाव जागृत करून ठेवला होता. त्यांना अगदीं पहिल्यानें मी घरीं वाढूं लागल्यें, तेव्हांपासून मला वाटे कीं, तेच माझे पती व्हावे, व त्यांच्याच सेवेंत माझा सारा जन्म जावा. पण त्यांची वाग्दत्त वधू मनोरमा ही माझी जीवाभावाची मैत्रिण होती. तिच्यासभोंवार सवतीमत्सराचा वणवा पेटवून त्यांत तिला जाळावी, व त्या वणव्यावर आपण आपली पोळी भाजीत बसावें, असें मला केव्हांहि वाटेना. एवढ्याचसाठीं मीं आईला सांगितलें कीं, आई, तूं मनोरमेच्या लग्नांत बिब्बा घालूं नकोस. पण ती माझें ऐकेल तेव्हां ना !

एकदां आई मला म्हणाली, " यमू , तुला मी निळकंठरावांनाच देणार. "

मीं विचारलें, " ती कशी ? त्यांचें तर लग्न जुळलेलें आहे. "

आई म्हणाली, "तें जुळलें असलें तरी राधाकाकूंना मनोरमा सून पसंत नाहीं."

खरोखरच मनोरमा जरा चढेलपणानें वागे. तिला स्वतांच्या श्रीमंतीचा व रूपाचा कोण डौल होता ! सासू गरीब म्हणून ती तिला कस्पटासारखी वाटे. मी तिला कितीतरी वेळां उपदेश केला कीं, असें उद्धटपणानें वागूं नये. पतीला, सासूला व वडील माणसांना मान द्यावा; त्यामुळें आपल्या सुशिक्षितपणाला कांहीं बट्टा लागत नाहीं.—पण तें कांहीं तिच्या गळीं उतरेना. राधाकाकूहि जरा दुराग्रही व हट्टी होत्या खऱ्या. शिवाय त्यांचा सारा जन्म खेड्यांत गेलेला ! त्यांना आमची शहरची राहाणी रुचली नाहीं तर तो त्यांचा दोष नाहीं. पण

हें न समजल्यामुळें मनोरमा मात्र आपल्या हातानें आपल्या पायांवर दगड घालून घेणार, अशी मला भीति होती. तिच्या जागीं मी जर असत्यें, तर सर्वांना गोड करून घेऊन, सर्वांची आवडती होऊन बसल्यें असत्यें. मी आईला म्हणाल्यें, " आई, मी पुन्हां एकदां मनोरमेला समजावून सांगत्यें, म्हणजे ती आपल्या सासूबाईशीं नीट वागायला लागेल. "

आईला माझा राग आला. ती म्हणाली, " ह्या जगाच्या उठाठेवी तुला कशाला हव्यात ? मी तुझ्यापुरतें बोलत्यें आहें. "

मी म्हणाल्यें, " पण ह्या लग्नाच्या गोष्टी कुळाव्यांच्या आवडीनिवडीवर ठरायच्या नसून वधूवरांच्या आवडीनिवडीवर ठरायच्या असतात. ते एक मला आवडतात; पण मी त्यांना आवडेन तेव्हां ना ! "

इतक्यांत लीला तोंडपुजेपणा करायला पुढें आली व म्हणाली, " सरस्वती-बाई, मला विचारा.—निळकंठांना तुमची यमू आवडते. "

लीलेचा शब्द ऐकून मंत्रमुग्ध झालेल्या सर्पाप्रमाणें काका बाहेर येऊन म्हणाले,

" मीहि तेंच म्हणतों. यमूच्या भावी पतिराजांनीं आपल्या वधूचा पक्ष आजपासूनच उचलून धरला आहे. "

" तेंच-तेंच मला अगोदर सांगूं दे ! परवांच्या वंदेभारतम्‌च्या अंकांत ' बाल सरस्वती ' या मथाळ्याखालीं एका माणसानें एका माणसाची केलेली स्तुति वाचावी. " लीला म्हणाली.

काका व लीला यांचा हा फाजीलपणा मला आवडला नाहीं. अजून कशाला कांहीं ठिकाण नाहीं, तों भावी पतिराज काय ! मला माहीत होतें कीं, ' वंदे-भारतम् ' च्या अंकांत निळकंठरावांनींच माझ्या एका भाषणाची स्तुति केली होती. त्यांच्याशिवाय माझ्यासारख्या मातीमोल सामान्य कुंवारीला 'बाल सरस्व-ती'च्या उच्च शिखरावर कोण नेऊन बसवणार ! पण या एका गोष्टीवरून लोकांनीं भलभलते तर्क लढवावे, हें मात्र मला आवडलें नाहीं—मुळींच आवडलें नाहीं. मीं काकांना स्पष्ट विचारलें, " काका, वर्तमानपत्रांचे लेखक व संपादक आपल्या लेखांतून ज्या ज्या बायकांची प्रशंसा करतात, त्यांचे त्यांचे जांवई किंवा पति होण्याची त्यांची इच्छा असते, असें तुम्हीं म्हणूं शकाल का ? "

" हो ! मी म्हणूं शकेन. " आई म्हणाली, " निळकंठरावांनीं तुझी स्तुति केली, याचें कारण त्यांना माझे जांवई बनायचें आहे, व तुझे—"

पुढें आईला मीं बोलूंच दिलें नाहीं. पण तिचें तोंड मी गप्प करत्यें तों काकांनीं मुक्ताफळें उधळलीं, " तीच मनोरमा तुझ्या बरोबरीनें किंवा वेळीं तुझ्यापेक्षांहि कांकणभर सरस बोलते, असें सारे लोक म्हणत असतांना तिला कुठें निळकंठांनीं नाहीं ' बाल सरस्वती ' म्हटलें तें ? "

मी उत्तरल्यें, " सूर्याला जशी दिव्याची गरज नसते, तशी खऱ्या प्रेमाला गाजावाजा करण्याची कांहींच गरज नसते. मनोरमा व निळकंठ यांच्या अंतःकरणाची साक्ष एकमेकांना एकदां पटलेली आहे. तिची ते निराळी प्रशंसा तीं काय करणार ! बाकी, माझी त्यांनीं स्तुति केली याबद्दल तुम्ही त्यांना दोष देणार, तर जगांतील किती तरी सौंदर्यवतींच्या गुलाबी गालांवर सूर्यकिरण नाचत असतात, म्हणून सूर्याला व्यभिचारी म्हणा. एकाएकीं वाहूं लागणारा झंझावात कितीतरी उपवर युवतींच्या उन्नत वक्षस्थलावरचा लुगडयाचा पदर फरफरां ओढून त्यांच्या छातीशीं बिलगतो, किंवा धोः धोः वाहात येणारा जोराचा पाऊस रस्त्यांतच कितीतरी पतिव्रतांना भिजवून ओल्या चिंब करून त्यांच्या अब्रूवरचें वस्त्राच्छादन विरल करतो, म्हणून त्यांनाहि व्यभिचारी म्हणा हवें तर ! "

लीला म्हणाली, "आम्ही तरी आमच्या पदरच्या गोष्टी बोलतों थोडयाच जग बोलतें, तें आम्ही बोलतों. "

आई म्हणाली, " निळकंठरावांच्या वाणींत व करणींतहि अशी कांहीं अजब जादू आहे कीं, ती कुणाच्याहि अंतःकरणांत गुदगुदल्या करते, व कितीएकींना नादीं लावते. "

मीं विचारलें, " खरें; पण यांत त्यांचा काय दोष ? मात्र अशीं कितीहि बायकांचीं मनें त्यांच्या पायांशीं धरणें धरून बसलीं तरी तीं पायांशींच वसतील, तीं कांहीं डोक्यावर चढायचीं नाहींत. अंतःकरणाच्या पवित्रतेचें व बुद्धीच्या ओजस्वितेचें आकर्षणच असें अजब आहे. अशा सोनेमोल गुणांच्या जोडीला पुरुषी मनाचा खंबीरपणा असला, कीं त्या व्यक्तीच्या पायीं कोणती कुंवार आपल्या चित्ताची पायघडी पसरणार नाहीं ! हा विशेष गुण निळकंठरावांच्या आंगीं आहे यासाठीं तुम्ही त्यांच्या नीतिमत्तेला नांवें ठेवलींत तर तुमच्या तोंडाला कोण हात लावणार ! पण तुम्ही तुमची वाचा अशी विटाळली तरी तुमच्या मनाचेंहि मन, तुमच्या आत्म्याचाहि अंतरात्मा तुम्हांला सांगेल कीं, निळकंठराव

हे सुंदरदाराकरीं शोभणाऱ्या आंगठीवरचे खडे नसून त्यांच्या हृदयीं निरंतर वास करणारे कौस्तुभमणि आहेत. कोमल नारीहृदयांची गुलामगिरी त्यांनीं पत्करली नसून त्या हृदयांची स्वामिसत्ता त्यांच्या चरणीं लोटांगणें घालीत आली आहे. असले थोर मनाचे पुरुष कधीं जगाच्या नादीं लागत नसून जगाला नादीं लावीत असतात."

आमच्या गप्पा चालल्या असतांना शारदाकाकू पाणी पाणी करून ओरडूं लागल्या. मी लीलेला म्हणाल्यें, "लीलाबाई, काकूला पाणी पाजा जा पाहूं!"

"तुझ्या काकूच्या दुंगणाला एक दासी सदांची बांधलेली हवी." असें म्हणून लीला तडफडत आंत गेली.

काका जळफळून म्हणाले, "मरेना कां ती एकदांची!"

आई म्हणाली, "दुखणें एकपटन् नखरा सातपट अशांतली त्यांची अवस्था आहे. तब्बेत राखण्यासाठीं लीलाबाईंना ठेवली, तों म्हातारी म्हटल्याबरोबर खरोखरीच त्या ओणव्यानें चालायला लागल्या."

आधींच काकांना बायको नावडती, तशांत ती आजारी. व त्या नवरा-बायकोंत बिब्बा घालून द्यायला आई तयार! इतक्यांच्यानें बिचारीच्या जन्माची पुरी माती व्हायची नाहीं म्हणूनच कीं काय, लीलेची लांवसट आमच्या घरीं येऊन राहिली होती. अलीकडे लीलेला असें काय झालें होतें नकळे; तिला आपला काकांशीं फाजीलपणा करावासा वाटे.

घरांत जातांना काकांनीं आईकडे एकवार स्नेहपूर्ण दृष्टीनें पाहिलें. या दृष्टींतून त्या उभयतांच्या पापाचा धूर धुमसत असून तो माझ्या डोळ्यांना झोंबत होता. शेक्सपिअरच्या हॅम्लेटची आई व्यभिचारी निघाली तेव्हां दुःख व संताप यांनीं तो वेडा झाला होता, तरी तो पुरुष होता. पण माझी आई!—व्यवहार सांगतो कीं, ती कशी झाली तरी तुझी आई आहे; तिच्या कपाळीं पापाचें खापर फुटलें तर त्याच्या कंवच्या तुझ्याहि कपाळीं उडणार! हे विचार सुचले, कीं माझें मस्तक ब्रह्मांडासभोंवार गिरगिरमाता खेळूं लागतें. काकांची व आईची दृष्टादृष्ट झाल्याबरोबर माझ्या अंतःकरणांतील शांततेला मरण येऊन तिची चिता धडधड पेटूं लागे, व त्या चितेच्या भयाण प्रकाशांत माझ्या हृत्पटलावर खोदलेलें संशयाचें लिखित मला स्पष्ट वाचतां येई—हॅमूलेटच्या आईनें जसा दिराच्या नादीं लागून आपल्या सौभाग्यदेवतेचा खून केला, व

व्यभिचाराच्या इमारतीवर शेवटचा कळस चढविला, तशीच माझी आईहि बाबांच्या पंचप्राणांची समई मालवून त्या पापाच्या आंधारांत व्यभिचाराचें काळें कालवून काळें कुट्ट करिते कीं काय !

ती आई ; मी लेंक ! पण तिच्याबरोबरच माझ्यावरहि काकांचे डोळे फुटावे काय ! —ह्या गोष्टी चवाठ्यावर आणूं नयेत हें मला समजतें; पण अंतःकरण दुःखी विचारांनीं तुडुंब भरलें, कीं त्यांतून दुःखवव्याचा फेंस वाणीवाटे हा असा उसळूं लागतोच. मी उपवर झाल्यें, म्हणून बाबा तिकडे माझ्यासाठीं स्थळ शोधूं लागले. पण ज्या माहितीच्या घरीं मुलगी सांगायला जावें, त्या ठिकाणीं जबाब मिळावा, कीं आम्हांला हुंड्यापूर्वी कुलशीलाची थोरवी पाह्यची आहे.—असले जबाब ऐकून बाबांनीं घरीं यावें व जागोजाग हृदयाला टोंच-लेल्या अपमानाच्या भाल्यांतून वाहाणाऱ्या रक्ताचें पाणी डोळ्यांवाटे ओतून उशाखालची गिरदी भिजवावी. लोकांना कुलशीलाच्या थोर मुली पाहिजे असतात व माझ्या बाबांचें कुलहि खानदानीचें प्रख्यात होतें. असें असतां जग मला कुलवंताची कन्या म्हणायला तयार नाहीं, याचें कारण आई, तूंच ना ! काका, तुम्हीच ना ! घरांत काकू तर आईला जाऊ न म्हणतां सवत म्हणत असे. आईला याचा राग यावा, तिनें काकांपाशीं चहाडी करावी, व काकांनीं काकूंना लाथांबुक्यांनीं मरेमरेतों मारावें ! असले भयाण देखावे रोज पहातां पहातां माझ्या आंगावर कांटा उभा राही !

मला निळकंठांचें अर्धांगीपद लाभलें तर तें नको होतें असें मुळींच नव्हे. पण त्यांच्याविषयीं मी मनांत खूणगांठ मारून ठेवली होती कीं, त्यांच्या नांवचें कुंकूं मला लावतां येणार नाहीं. मी तितकी श्रीमंत नाहीं म्हणूनहि नव्हे, किंवा जग मला कुलवंताची कन्या म्हणायला भीत असे, म्हणूनहि नव्हे. आमच्या घरचा धिंगाणा त्यांनीं कैक वेळां पाहिला होता, व कोळशाच्या खाणींत रत्न सांप-डावें, तशी मी माझ्या आईच्या पोटीं जन्माला आल्यें, असे उद्गारहि त्यांनीं माझ्यापाशीं अनेक वेळां काढले होते. मातापितरांच्या पापांचें खापर मुलांच्या माथीं फोडण्याची जी जगाची रीत आहे, तिचा त्यांना मनापासून तिट्कारा होता. पण त्याचें आतां काय !

दुसरी गोष्ट, लग्नाची सौदेवजा पद्धत निळकंठरावांना मुळींच पसंत नव्हती. मुलगी दारोदार दाखवीत हिंडावें, वरांनीं तिला पसंत किंवा नापसंत करावी,

आजच्या होकाराला उद्यां नकार मिळूं नये म्हणून कायदेशीर वाङ्‌निश्चय करून घ्यावे, आज ठरलेलीं लग्नें मुलांमुलींच्या पालकांच्या लहरींप्रमाणें वेळोवेळीं मोडावीं, हा नुसता माणसांचा सौदा आहे, असें ते वारंवार म्हणत.

यावर मी त्यांना नुक्ताच एकदां टोमणा हाणला होता, " तुमच्या आयुष्यांत तुम्हां कधीं असला माणसांचा सौदा ठरवण्याच्या भानगडींत पडणार नाहीं ना ?"

" नाहीं. " निळकंठराव उत्तरले, " यमुने, मी वर जसा माणूस आहें, तशीच मला सांगून येणारी प्रत्येक वधूहि माणूस आहे, हें मी कधींहि विसरणार नाहीं. आम्हां पुरुषांच्या हातीं सत्ता आली, म्हणून आम्ही परमेश्वराच्या स्त्री-जीवांची लायकी-नालायकी कोणत्या अधिकारावर ठरवावी ? आम्हां वरांना तेवढा मान आहे आणि वधूंना मान नाहीं का ? असली विटंबना मी कोणाहि वधूच्या वांट्याला कधींहि आणणार नाहीं. ज्या वधूकडे मी एकवार माझी भावी वधू या दृष्टीनें पाहीन, तिलाच मी माझी अर्धांगी करीन. तिच्यापेक्षां उत्तम अशी एखादी वधू मला माळ घालायला तयार आहे कीं काय, याचा मी विचारहि करणार नाहीं. "

" आणि समजा, दुर्दैवानें तुमचें लग्न मोडलें तर ? " मीं विचारलें.

" मोडणार तरी कसें ? मामामामी माझीं हितकर्ती आहेत, त्यांच्या मध्यस्थीनें ठरलेलें लग्न आहे तें ! आम्ही खेळांतलीं बाहुलाबाहुलीं आहों थोडींच; तीं आमचीं लुटुपुटूचीं लग्नें जोडतील व मोडतील ? "

" मामामामी कांहीं मोडणार नाहींत; पण त्यांचा तरी कुणीं काय नेम सांगावा ? आपल्याला माहीतच आहे कीं, आपण कांहीं आपल्या मामांच्या मर्जीप्रमाणें वागत नाहीं. मनोरमेचें व आपल्या आईचें पटत नाहीं. शिवाय मामामामींच्या डोकीवर मनोरमेचीं आईबापें आहेत. माझी अशी संवय आहे कीं, पहिल्यानें वाईट तें घेऊन चालावें. त्यांनींच वेळीं कर्मासारखा आपल्या वाङ्‌निश्चयांत खो घातला तर ? "

" ही तुझी कल्पनाच किती अमंगळ आहे पहा ! "

" पण पुष्कळ वेळां अमंगळ गोष्टीच नांवारुपाला येऊन कित्येक जिवांचा संसार दुःखमय करतात. मंगलता ही जगांत सोन्यामोत्यासारखी महाग आहे. "

" तसेंच झालें तरी मी माझें शील कधींहि सोडणार नाहीं. मनोरमा दैवदुर्विलासानें माझी अर्धांगी न होतां दुसऱ्याची झाली;--पण ती कल्पनाच नको.

तसें झालेंच तर तिच्याशिवाय जगांतल्या साऱ्या स्त्रिया जशा आज माझ्या आयाबहिणी आहेत, तशाच त्या जन्मभर राहातील."

"देव करो व तुमच्या आशांना नियतीचें पाठबळ असो."

"पण यमुने, असला संशय तूं माझ्यापाशीं कां प्रगट केलास?"

"उगाच. आपल्या मनाची परीक्षा पहात होत्यें झाल्यें."

"आतां तूंच सांग, तूं माझ्याकडे कोणत्या दृष्टीनें पहातेस?"

"आपण माझ्याकडे कोणत्या दृष्टीनें पहातां?"

"मी तुझा भाऊ आहें; तूं माझी बहीण आहेस, या दृष्टीनें पहातों."

"मग झालें तर. आपल्याच उत्तरांत माझ्याहि उत्तराचा समावेश होतो."

"पण तुझ्या आईची योजना तर निराळीच आहे."

"त्या योजनेला मीं यश येऊं देऊं नये, अशी आपली इच्छा आहे ना?"

"होय."

"मग मी आपल्या इच्छेआड कधींच जाणार नाहीं." मी उत्तरल्यें.

मीं मनाचा धडा केला कीं, माझें कांहीं झालें तरी आईच्या प्रयत्नांना यश म्हणून येऊं द्यायचें नाहीं. निळकंठ आईला जांवई म्हणून आवडत होते व मलाहि त्या नात्याचें श्रेय घेण्यांत धन्यता वाटली असती. पण निळकंठरावांसारख्या कडकडीत एकपत्नीव्रती दाशरथीरामाच्या नव्या अर्वाचीन अवतारासमोर माझ्या वासना पार वितळून गेल्या.

* * * *

त्याच दिवशीं मनोरमेला हा वृत्तांत कळला तेव्हां ती मला चौपाटीवर गांठून म्हणाली, "यमूताई, तुझ्या आईपेक्षां तुझ्याकडे मी निराळ्या दृष्टीनें पहात्यें. तुला सर्व कांहीं माहीत आहे. आतां तूं माझ्या सौभाग्यावर आपला वारसा सांगून माझ्या जन्माचें मातेरें करणार कीं काय?"

मी उत्तरल्यें "नाहीं. आईच्या पापाचा संबंध मला नको. मी आमच्यामधलें सध्यांचें मैत्रिणीमैत्रिणीचें नातें मोडूं इच्छीत नाहीं. तुझी व निळकंठांची जीवनयात्रा सुखाची झाली म्हणजे त्या यात्रेवर तीर्थस्नानें करण्यांतच मला आनंद आहे."

मग सरस्वतीबाईच्या प्रयत्नांना तूं राजी नाहींस ना?"

"नाहीं."

" दे माझ्या हातावर हात ! "

" हा घे " असें म्हणून मी मनोरमेच्या हातावर हात दिला.

" मग माझ्या लग्नांत तूं काय करशील ? " मनोरमेनें मला हंसत हंसत विचारलें.

तिच्या विचारण्याचा रोंख मला समजला. मी उत्तरल्यें, " मी करवली— नवऱ्यामुलाची धाकटी बहीण—म्हणून हातांत करा घेऊन नवऱ्यामुलाच्या मागें उभी राहीन ! "

मनोरमेला मनापासून हंसूं आलें. ती लडिवाळपणानें माझ्या गळ्याला मिठी मारून उद्गारली, " असली प्रेमळ मैत्रिण मला साऱ्या जन्मांत दुसरी लाभली नाहीं. पण यमूताई, मी लग्न होऊन सासरीं गेल्यें, कीं तुझी माझी ताटातूट होणार ना ? "

" त्याला इलाज नाहीं. "

" कां—इलाज कां नाहीं ? इलाज आहे. "

" कोणता तो ? "

" मी जशी तिकडच्या संसाराची धनीण होणार, तशी तूंहि अनंतरावांच्या संसाराची धनीण व्हावेंस. "

इतक्यांत लीला पुढें आली, व विचारूं लागली, " दोघींची आपसांत कसली वांटणी चालली आहे ? सौभाग्याची कीं काय ? "

लीलेचा मला मनस्वी राग आला. मी तिला म्हणाल्यें, " लीलाबाई, तुम्ही आमच्यांतल्याच खऱ्या; पण आमच्या घरीं राहूं लागल्यापासून काकांच्या व आईच्या संगतीचें वारें लागून तुमची बुद्धि फिरत चालली आहे. यापुढें तुम्ही आमच्या खासगी व्यवहारांत पडूं नका. "

" मला काय करायचे आहेत तुमचे खासगी व्यवहार ! पण अनंतराव कांहीं परसांतला भाजीपाला नाहींत, एवढें मात्र सांगून ठेवल्यें.—मनू , तुलाहि त्यांच्या स्वभावाचा अनुभव आहेच. तुझ्या बाबींत त्यांना चांगलीच ठोकर बसली आहे—"

मनोरमा लीलेला हातानें गप्प करीत म्हणाली, " लीलाताई, दुधानें भरलेलें भांडें आहे तें; स्वतांच्या ओंठीं लागेना म्हणून असें उपडें कां करतां ? "

रागारागानें आमच्याकडे पहात रडूं लागलेल्या बिंबाधराला समजावण्या-

साठीं लीला आंत निघून गेली. मनोरमेनें अनंतरावांशीं घडलेला अतिप्रसंग माझ्यापाशीं चोरून ठेवला नाहीं. त्यावरून मला अनंतरावांचा तिरस्कार वाटण्याऐवजीं आदर वाटूं लागला. चंद्रावरचे डाग जसे चंद्राला शोभतात, तशी अनंतरावांची प्रणयपिपासा त्यांच्या चरित्राला जास्तच खुलवते, असें मला वाटलें. लीला अलीकडे त्यांच्या नांवाचा बोभाटा करूं लागली होती कीं, अनंतराव पुनर्विवाह करण्यासाठीं राक्षसासारखे माझ्यामागें लागले आहेत.—माझ्या आईलाहि तिनें असेंच सांगून अनंतरावांविषयीं तिच्या मनांत विष ओतून ठेवलें होतें. पण सोन्याची पारख सोनाराला असते, तशी त्यांची पारख मला होती.

मनोरमेनें मला पुन्हां विचारलें, "मग काय, तिकडून अनंतरावांकडे शब्द काढायला लावूं ?"

"हो ! त्यांचा काय मनोदय आहे, तो तरी कळेल. बाकी तेहि निळकंठांचेच भाऊ असले तर ?"

"तसें कांहीं नाहीं. मी पहात्यें त्या साऱ्या गोष्टी. कांहीं असलें तरी तिकडचा शब्द अनंतरावांना मोडतां यायचा नाहीं. माझ्या प्रयत्नांना देवानें यश दिलें तर—त्या दोघां मित्रां मित्रांचें ठरलेंच आहे कीं, एकत्र जन्म काढून देशाच्या सेवेंत देह चंदनासारखा झिजवायचा. त्यांच्याबरोबर आपल्याहि हातीं त्यांच्या संसाराची सत्ता आली तर आमच्या पुण्याला पारावार राहाणार नाहीं."

आमच्या गोष्टी चालल्या आहेत, तोंच काका बाहेरून आले. त्यांची व मनोरमेची दृष्टादृष्ट होतांच ती एखाद्या चौताळलेल्या वाघिणीसारखी ताड्कन् उठली, व दांत ओंठ खात कांहींसें ओंठांतल्या ओंठांत पुटपुटत निघून गेली. ती कां उठली, हें मला तेव्हांच कळलें, त्यामुळें तिला मीं कुंकूं लावायलाहि थांबवून घेतलें नाहीं.

आईला मात्र मी मोघम जाणवून ठेवलें कीं, मनोरमेच्या लग्नांत बिघाड आणणें मला पसंत नाहीं. तिच्या आईबापांचें मत व मंगळाची हकिगत यांत शुभाशुभ कांहींच नाहीं, म्हणून तें मात्र मी मनोरमेपासून हेतुपुरस्सर चोरून ठेवलें.



# सहावी झुळुक



## निळकंठ (२)

आधींच मी त्यांच्या मताप्रमाणें वागत नाहीं, म्हणून मामा माझ्याविषयीं बरेच नाखुष झाले होते. तशांत माझ्या कॉलेजमधल्या व बाहेरच्या चळवळीं-मुळें कॉलेजच्या प्रिन्सिपालसाहेबांनीं मला विद्यार्थिदशेंतून कायमचा हद्दपार केला व माझ्या नांवावर असा शेरा मारला कीं, त्यामुळें कोणत्याहि ठिकाणीं माझें शिक्षण मला करतां येऊं नये. बरें; मामांच्या कारखान्यांत काम करावें तर आधींच रसायनशास्त्र म्हणजे माझा कपाळशूळ! तशांत माझ्यावर सासूपणा गाजवणारे गुणवंतरावांसारखे अधिकारी! यामुळें मीं तोहि मार्ग सोडला. अशानें मी दिवसेंदिवस मामांचा नावडता बनत चाल्लों होतों. आईच्या एककल्ली वागणुकीनें मामींचें मनहि बरेंच दूषित झालें होतें.

अशा स्थितींत पुढें काय करावें, हा प्रश्न माझ्यासमोर होता. मी तरी एकट्यानें काय करणार! अनंत किंवा माधव यांच्या कार्याची जी दिशा, तीच आपल्याहि कार्याची ठेवावी, हा माझा संकल्प होता. त्या संकल्पाचा खल करण्याची सोन्याची संधि आज अनायासें आली होती. अनंत, माधव व नलिनी यांच्या कॉलेजांना सुट्टी असल्यानें सर्वांमिळून अनंताच्या घरीं आज आमचा तळ पडला.

मनोरमा नलिनीला म्हणाली, "नलिनी,-हो पण चुकल्यें, तूं माझी नणंद व्हायची आहेस; तुला थोरली हांक मारली पाहिजे-नलिनीवन्सं, आज माधवराव पुण्याहून आल्यावरच तुम्हांला आमच्याकडे यायला फावलें ना?"

नलिनीनें मुकाट्यानें लाजून खालीं मान घातली. माधवाला मात्र मनोरमेची थट्टा आवडली नाहीं. त्यानें तिला विचारलें, "मनोरमावैनी, लग्नाचा खोडा तुम्ही तुमच्या पायांत अडकवून घेणार तर घ्या; पण लोकांना कां त्या पापाला प्रवृत्त करतां?"

"हें पाप का? माधवराव, लग्न करणें हें पाप का?" मनोरमेनें विचारलें. हा बोलण्याचा वेळ नाहीं, असें पाहून नलिनीनें तिला हातानें गप्प रहाण्याची खूण केली.

मनोरमा मला म्हणाली, " बरें, अनंतरावांपाशीं तरी आपण यमुनेविषयीं गोष्ट काढावी. "

माधवानें मला विचारलें, " निळकंठ, तुम्हां दोघांना हें लग्नवेड लागलें कीं काय ? "

मनोरमा म्हणाली, " माधवराव, एखाद्याच्या जमत असलेल्या लग्नांत बिब्बा घालणें हें पाप आहे बरें ! "

माधव उत्तरला, "बरें बरें ! ह्या पापाचे डोंगर माझ्या डोक्यावर वाहून तरी तुमचीं लग्नें मोडलीं तर मी साखर वांटीन. "

"असले अभद्र शब्द आमच्या तोंडावर तरी बोलूं नका !" मनोरमा म्हणाली.

" हा माझा ब्रह्मचाऱ्याचा शाप केव्हांहि खोटा होणार नाहीं." माधव म्हणाला, " या कडू शापाला धाब्यावर बसवण्याचा प्रयत्न लीलेनें पहिल्याप्रथम केला; पण तिलाहि त्याचें प्रायश्चित्त घेणें प्राप्त झालें. मनोरमे, दोन वर्षांपूर्वी आम्ही या ठिकाणीं एकत्र जमलों असतां देशसेवेची सांगता कशी करावी, ह्या विचारांचे भव्यभव्य मनोरे बांधीत होतों, तेव्हां लीलेनें आपल्या उदात्त विचारांच्या खांबांवर ते सांवरून धरावे !—ती लीला, व आज गुणवंतरावांसारख्या मानवी राक्षसाच्या हातचें बाहुलें बनून त्यांच्या वासनांना स्वतांचा बळी देणारी व स्वतां आमचे बळी घेऊं पहाणारी लीला, या दोन लीलांची सांगड कोण कशी घालील ?—पण ह्या वाइटांतूनहि चांगलें निपजेल. लीला परती एकटी अधःपतित होईना; तिच्या चाळ्यांनीं तुमच्या लग्नगांठी तरी तुटल्या जाण्याचा संभव आहे, हें एका अर्थी बरें आहे. "

" इडापिडा टळो व अमंगळ दूर पळो ! माधवराव, तरवारीचे घाव सहन करवतील; पण तुमचीं बोलणीं सहन करवत नाहींत. " असें म्हणून मनोरमा विषादपूर्ण चित्तानें बाहेर चालती झाली.

मी माधवाला म्हणालों, " माधव, लग्नाचा प्रश्न हा ज्याच्या त्याच्या मनाचा प्रश्न आहे. त्या विषयावर आपण यापुढें कुणीं कांहीं बोलायचें नाहीं. "

अनंत म्हणाला, " माझेंहि तसेंच मत आहे. आतां आपल्यापुढें जो मोठा जबाबदारीचा प्रश्न आहे, तो हाच कीं, पुढें काय ? माझी परीक्षा झाली, आतां मी मोकळा झालों. माधव, तूंहि या वर्षी मोकळा होणार. नलिनीताईचा तर प्रश्नच नको, त्यांना पहिला वर्ग मिळतो, कीं दुसरा वर्ग मिळतो, एवढीच शंका आहे."

नलिनी म्हणाली " मी एम्. बी.; बी. एस्. झाल्यावर मिडवाइफ्री शिकण्यासाठीं पोस्टग्रॅजुएटचा कोर्स घेणार आहें. "

माधव म्हणाला, " मग तर फारच चांगलें. एक डॉक्टरीणबाई, एक शेतकरी, एक कारखानदार,—आणि निळकंठ, आपण कोण होणार ? तुला ना पदवी; ना धंदा. तशांत बायकोचा फांस गळ्याला.—पण त्या विषयावर कांहीं बोलायचें नाहीं. "

मी उत्तरलों, " माझ्या गळ्याला बायकोचा फांस पडला तरी मी कांहीं बायकोसारखा बनणार नाहीं; बायकोलाच माझ्यासारखी बनवीन. आम्ही दोघेंहि तुमच्या बरोबरीनें कार्य करूं. माधव, तूं काय, शेतांत नांगर धरशील व शेतकऱ्यांच्या मुलांना उत्तम शेतकरी बनवून त्यांच्या हातीं त्यांच्या पोटापाण्याचा प्रश्न सोडवशील. अनंत, तूंरे काय करशील ? "

अनंत म्हणाला, "मी आपला धंदेवाला माणूस आहें. खेडोपाडीं हजारों गरीब लोक जे अन्नापाण्याविणें उपाशीं मरतात, त्यांना उद्योग देणें, व औद्योगिक ज्ञानाची वाढ करणें हें माझें ध्येय मी मरेतों पाळणार ! हिंदुस्थान ही सुवर्णभूमि आहे. ह्या सुवर्णभूमीच्या उदरांतून उद्धृत केलेली अपार संपदा निरनिराळ्या राजोपचारी लुटारूंनीं आजवर लुटून नेली, व पुढेंहि लूट करण्यासाठीं कितीतरी अप्रतिष्ठित लुटारू काळाच्या उदरांत दडून बसले असतील. पण इतक्या सर्वांनीं लुटून संपायची नाहीं, इतकी संपदा आमच्या हिंदभूमीच्या उदरीं असतांना हिंदु रयत अन्नाला महाग व्हावी काय ! ही संपत्ति शोधून काढण्याला आम्ही शेतकरी व कामकरी बनल्याशिवाय गत्यंतर नाहीं. मी एकदां ठरविलें तेंच माझें ध्येय. मी आमच्या देशीं जाऊन रंगाचा, वनस्पतींच्या अर्कांचा असे कारखाने काढण्यांत आयुष्य वेंचणार. पहिल्यानें तऱ्हेतऱ्हेच्या वनस्पतींचे अर्क काढण्याचा उद्योग मी आरंभणार आहें. "

माधव म्हणाला, " मी बोलून चालून शेतकरी आहें. मी सोयवार जमीन पाहून ती माझ्या ताब्यांत घेणार, तिथें नमुनेदार कृषिप्रयोगक्षेत्रें तयार करणार, शेतकऱ्यांच्या मुलांना शेतकीचें शिक्षण देण्यासाठीं शेतकीशाळा स्थापन करणार व हिंदुस्थानांतील शेतांत सोनें पिकवून दाखवणार. "

नलिनीला मीं विचारलें, " आक्का, तूं काय करणार ? "

नलिनी भीतभीत, लाजत लाजत हंसऱ्या तोंडानें हळूच उत्तरली, " मीं

डॉक्टरीण असल्यें तरी मला शेतकरीण होणेंच जास्त आवडेल. करतें आहे का कोण मला शेतकरीण ? ”

माधव चवताळलेल्या वाघासारखा नलिनीला उद्देशून म्हणाला, “ ‘नारी प्रत्यक्ष राक्षसी’ म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. नलिनी, तुला मी हजार वेळां सांगितलें कीं, माझ्यासभोंवार असें मोहाचें कुंपण घालायचा तूं प्रयत्न करूं नकोस. तूं तरुण आहेस; मी तरुण आहें. मनोविकार आमच्या मनाचा ताबा घेऊन आम्हांला आपले गुलाम बनवायला टपून बसलेले आहेत. ”

“ मग त्यांच्याशीं सलोखा ठेऊन त्यांच्या हातावर तुरी द्यायला विवाह हा एकच रामबाण उपाय आहे. ” अनंत म्हणाला.

मी म्हणालों, “ माधवाला नावडत्या विषयाची चर्चा तुम्ही पुन्हां पुन्हां कशाला करतां ? ”

नलिनीनें निश्चयात्मक स्वरानें विचारलें, “ पण लग्न करायचें नाहीं, लग्न करायचें नाहीं, यांतली गोम तरी काय आहे ती मला एकदांची समजून घ्यायची आहे. ”

माधव उत्तरला, “नलिनी, लग्न करायचें नाहीं याचा अर्थ इतकाच कीं, आपण मध्यम वर्गांतले लोक लग्न करण्याच्या पात्रतेचे नाहीं. लग्न ही मोक्षसाधनाची गुरुकिल्ली आहे, यांत कांहीं राम नसला तरी लग्न हा चैनीचा एक प्रकार आहे हें तर खरें ? ”

“ लग्न हा केवळ चैनीचाच प्रकार ? ” नलिनीनें आश्चर्यानें विचारलें.

मी म्हणालों, “माझ्या मतें तर लग्न हा आयुष्यांतील सुखाचा मूलमंत्र आहे.”

“ पण त्या मंत्राची दिक्षा घेतांना सोन्याची नित्य धुपारती करावी लागते ना ! लग्न कोणीं करावें ? लक्ष्मी ज्यांच्या घरीं पाणी भरीत आहे, बायकोला व पुढें कुटुंबाचा विस्तार केवढाहि झाला तरी त्याला पोसायचें सामर्थ्य ज्यांच्या आंगीं आहे, त्यांनीं लग्न करावें. संसार हा सारा पैशाचा खेळ आहे. आम्हांला परमेश्वरानें जर कांहीं बुद्धिवैभव दिलें असेल, तर त्याचा विनियोग करून केवळ बायकापोरांचें उदरभरण करण्यापूर्वी देशाचें दैन्य दूर करणें, हें आमचें कर्तव्य आहे. ” माधव म्हणाला.

मीं विचारलें, “ एकूण तूं जर एखाद्या लक्षाधिशाचा मुलगा असतास, तर लग्न केलें असतेंस ! ”

माधव उत्तरला, " हो हो ! अवश्य केलें असतें. एकचसें काय, एक सोडून दोनहि केलीं असतीं. मी तुझ्यासारखा प्रेमाच्या वेडानें वेडा बनणारा, किंवा सध्यांच्या विवाहांना आणि पुनर्विवाहांना माणसांचा सौदा म्हणणारा वेडा पीर नाहीं. "

नलिनी म्हणाली, " पण आम्हांला आमच्या आईबापांनीं गरिबींत जन्म तरी कां दिला ? आज आम्हां दोघांपैकीं कोणी तरी एक श्रीमंत असतें, तर सोन्यापेक्षां पिवळें झालें असतें. "

" हाच—हाच प्रश्न आम्हांला उद्यां आमचीं मुलें विचारतील, व दारोदार भीक मागतांना आमच्या नांवानें बोटें मोडतील. एवढ्याचसाठीं, केवळ त्यांना आमच्या वंशांत जन्माची वाट सांपडूं नये, म्हणून आम्ही लग्न करतां उपयोगी नाहीं. नलिनी, तुझ्या बापानें तुझ्या शिक्षणाला पुरेल इतका पैसातरी बँकेंत तुझ्या नांवावर ठेवला होता; पण आमच्या वडलांनीं संपत्तीऐवजीं थोडें फार कर्जच ठेवलें होतें. असले दरिद्री जन्माला घालून भिकाऱ्यांची परंपरा सुरू करण्याचा मोह निळकंठाला झाला आहे; पण त्याला त्याचें फळ भोगावें लागेल. "

नलिनीला तरी काय माहीत माझ्यावर मामांची तितकी माया नाहीं हें ! तें कोडें तिला मी उलगडून सांगितलें. शिवाय मनोरमेचीं आईबापेंहि मला मनोरमा देण्याच्या बाबतींत बरींच नाराज़ आहेत, ही आईच्या तोंडावाटे कळलेली अशुभ वार्ताहि मी सर्वांना कळवली. केवळ एकवार शब्द गेला म्हणून व मनोरमेचा हट्ट आहे म्हणूनच काय तें आमचें लग्न व्हायचें होतें.

माधवानें गंभीर चर्या करून मला विचारलें, " निळकंठ, अशा अनाथ स्थितींत तूं आज बायको, व उद्यां पोरांचें लेंढार घेऊन काय करणार ? "

हाच प्रश्न माझ्यासमोरहि उभा होता. माझा सारा भरंवसा मामांवर काय तो होता; पण त्यांचें मन मला राखतां न आल्यामुळें ती बाजू आंगावर आली. घरीं जाईन, तर वडील बंधूंनीं अगोदरच माझ्या सत्तेचें वाटोळें करून माझ्या नशिबावर वरवंटा फिरवून ठेवला होता. तरी पण अजून मी निराश झालों नव्हतों. माझ्या सामर्थ्यावर माझा विश्वास होता. मी उत्तरलों, " वाडवडिलांच्या संपत्तीवर किंवा आप्तांच्या उपराळ्यावर नशीब काढणारा नामर्द मी नाहीं. मी माझ्या सहचारिणीसह माझ्या जन्मभूमीला जाईन, तिथें आम्ही स्वतांचीं हाडें कसवूं व आमच्या श्रमांची भाकरी मिळवूं."

" पोटापुरतें अन्नवस्त्र मिळवून आल्या दिवसाची गुजराण करणारे पोटार्थी, किंवा ठराविक मोबदल्यांत ठराविक काम करणारे गुलामवजा नोकर सारेच असतात! त्यांच्याहून तूं निराळें तें काय करणार ? " माधवानें विचारलें.

मी म्हणालों, " काय करणार तें शांत चित्तानें ऐकून घ्या. माझ्या जन्मभूमींत मला काय करतां येणार नाहीं ? मलाचसें काय; पण माधव, अनंत, नलिनी,—तुम्हां सार्‍यांना जन्मोजन्मीं पुरून उरेल इतकें अफाट कर्मक्षेत्र तुम्हांला मी माझ्या जन्मभूमींत देतों."

" स्वतांला राह्यला सत्तेचें घर तरी आहे का पण ? " माधवानें विचारलें.

" तेंहि भाऊ बळकावून बसला! " नलिनी म्हणाली.

मी म्हणालों, " बसेना कां बिचारा बसला तर ? "

" मग श्रीमंताची लेंक बायको करून तिला गांवीं नेल्यावर नदीच्या कांठीं झाडाखालीं बिर्‍हाड करणार कीं काय ? " माधवानें विचारलें.

असे प्रश्नांवर प्रश्न विचारून मला तिघांनीं मिळून डोक्यावर उचलून धरलें. पण मी त्या तिघांनाहि पुरून उरणारा होतों. मी गंभीर स्वरानें म्हणालों, " हो! आम्हीं नदीकांठीं झाडाखालींच बिर्‍हाड करणार. माझ्या जन्मभूमीविषयीं खरोखरच माझ्या मनांत प्रेम असेल, अन्नावांचून तळमळणाऱ्या अशिक्षित व मागासलेल्या लोकांच्या कल्याणासाठीं माझ्या अंतःकरणाला पीळ पडत असेल, माझें व माझ्या अर्धांगीचें जीवन माझ्या असमर्थ देशबांधवांचा व त्यांच्या अनुरोधानें देशाचा उद्धार करण्यांत सार्थकीं लागायचें असेल, तर आमच्या पुण्याईनें दगडमातीच्या खडबडाटांत त्या नदीकिनाऱ्यावरच आमच्यासाठीं आम्ही नंदनवनासारखी सुंदर बाग तयार करूं व त्या बागेंत ताजमहालासारखा मणिमुक्ताखचित राजवाडा बांधूं. माझ्यावर माझ्या देशबांधवांचा विश्वास आहे. इतक्या हजारों जिवांच्या प्रेमाची जोड घेऊन त्या भांडवलावर मला ज्याचा सौदा करतां येणार नाहीं, असें कोणतें वैभव आहे ? "

" मग तुझ्या ताटाबरोबर आमची वाटी ठेवली तर चालेल ना ? " माधवानें विचारलें.

मी उत्तरलों, " अवश्य चालेल. आमच्या मालकीचे पांच गांव ज्या सावकारांच्या ताब्यांत आहेत, त्यांतला एक सावकार अगदीं थोड्या व्याजानें माझा रहाता गांव मला वहिवाटीला द्यायला तयार आहे. तसेच बाकीचे गांवहि

त्या गांवांची सध्यांची मालकीण मला सवलतीनें देईल. त्या चार-पांच गांवांची मिळून आपण एक सुंदर वसाहत वसवूं. त्यांतल्या एका गांवीं अनंत, तूं आपला कारखाना काढावास. माधव, तूं एका गांवीं आपली शेतकी करावीस. नलिनीताई, मोफत सूतिकागृह व रुग्णालय चालविण्याची शपथ तूं यापूर्वीच घेतली आहेस; तुझ्या जोडीला मनोरमेला तयार करण्याचें काम तुझें आहे. कामकऱ्यांच्या बायकामुलांना शिक्षण देण्याची जबाबदारी मनोरमा शिरावर घेईल. उरलेल्या गोष्टी–ग्रामपंचायती स्थापन करणें, पतपेढ्या काढणें, गरीब कामकऱ्यांना कर्जापायीं सावकार, तंट्यापायीं सरकार व दारूसारख्या व्यसना-पायीं आपत्तींचा ससेमिरा यांच्या दाढेंतून सोडवणें, इत्यादि कामें मी करीन माझी अशी इच्छा आहे कीं, आमच्या पांच गांवच्या शेतकऱ्यांनीं आमची शेती करावी, आमच्या कामकऱ्यांनीं आमच्या कारखान्यांत कामें करावीं, त्यांचें व त्यांच्या बायकामुलांचें शिक्षण आमच्या देखरेखीखालीं व्हावें, त्यांना अडल्या गरजेला आम्ही व आम्हांला त्यांनीं उपयोगी पडावें, त्यांच्या बायकांचें बाळंतपण आमच्या बायकांच्या हातून व्हावें, तात्पर्य काय, आमची पांच गांवची वसाहत म्हणजे एक नमुनेदार व साऱ्या हिंदुस्थाननें धडा घेण्यासारखें लहानसें संस्थान बनलें पाहिजे.”

“ आणि या संस्थानचीं भाग्यवान् राजाराणी कोण ? ” नलिनीनें विचारलें.

मी उत्तरलों, “ राजा नाहीं नी राणी नाहीं. सारी सत्ता प्रजेची. माधव, अनंत, तुमच्या योजनेंत स्वतां सधन होण्याच्या कल्पनेचा अंतर्भाव होत असेल, पण माझी योजना तशी नाहीं. आमच्या कारखान्यांतील नफ्याची किंवा आमच्या शेतांतील धान्याची संपदा आमच्या दरवाजाच्या आंत कोंडली न राहतां तिचा भाग तिच्यासाठीं श्रमलेल्या सर्व जीवांना सारखा मिळाला पाहिजे. गरीब बिचारे कामकरी व शेतकरी आमच्या कारखान्यांत व शेतवाडींत आपल्या रक्ताची पांवळी करणार, मग त्यांच्या श्रमांचा मोबदला त्यांना मिळा-यला नको का ? त्यांनीं पायांनीं चालावें व आम्ही गाडीघोड्यांतून हिंडावें, त्यांनीं जाडींभरडीं वस्त्रें नेसावीं व आम्ही तलम वस्त्रें नेसावीं, त्यांच्या बाय-कांनीं ओक्या गोसावणींसारखें दागिन्यांशिवाय हिंडावें व आमच्या बायकांनीं सोन्यामोत्यांच्या दागिन्यांनीं आपले देह नटवावे, हा कुठच्या देवाघरचा न्याय ! त्यांचा कोणी शास्ता नाहीं, आम्ही त्यांचे शास्ते, म्हणून आम्ही

त्यांच्या श्रमांवर स्वतांची श्रीमंती साजरी करावी काय ? मी तर म्हणतों, माझी बायको शेतकऱ्यांच्या किंवा कामकऱ्यांच्या बायकांपैकींच एक अशी शोभली पाहिजे. "

इतक्यांत मनोरमा आली. मघांचा पेहराव या वेळीं तिच्या आंगावर नव्हता. बाहेर सहल करायला जाण्याच्या बेतानें ती सारे शृंगार करून आली होती. तिच्याकडे बोट दाखवून माधवानें मला विचारलें, " हीच आपली बायको कामकरीण किंवा शेतकरीणशी शोभणार ना ? महाराज, नमस्कार असो तुम्हांला ! आम्हांला बायका नाहींत म्हणून वेळीं आम्ही तुझ्या कल्पनेप्रमाणें वागूं. नलिनीहि —"

माधवाच्या तोंडचें वाक्य पुरें होण्यापूर्वींच नलिनी म्हणाली, " माझ्या-सारखी साधी मुलगी तर साऱ्या त्रिभुवनांत दुसरी मिळायची नाहीं, असें प्रत्यक्ष माझी काकू म्हणते. "

माधव म्हणाला, " झालें तर. पण निळकंठ, ही मनोरमा-हा श्रीमंतीचा झपाटा तूं कसा आवरणार ? "

खरोखर, मला त्यावेळीं खालीं मान घालवी लागली. अंतःकरणांतल्या अंतः-करणांत सांठवून ठेवलेल्या विचारांचें रत्नभांडार मी माझ्या जिवलग मित्रां-समोर उघडून बसलों असतां त्याला मनोरमेच्या श्रीमंती झपाट्याचा वारा लागतांच त्यांतील रत्नांचे कोळसे झाले. मला पुढें बोलायला तोंडच उरलें नाहीं.

माधव ' श्रीमंती झपाटा ' म्हणाला, हे शब्दहि मनोरमेच्या जिवाला झोंबले. ती जरा तिरस्कारानें माधवाला म्हणाली, " माधवराव, विधवांना सौभाग्य-वतींचा हेवा वाटतो, तसाच गरिबांना श्रीमंतांचा हेवा वाटतो नाहीं ? "

" तो प्रश्न तूं निळकंठालाच विचार. " माधव उत्तरला.

माझ्या चेहऱ्यावर पडलेली रागाची छाया मनोरमेच्या दृष्टीआड राहूं शकली नाहीं. ती माझ्यासमोर चोरासारखी गप्प राहिली. तिची लंगडी बाजू सांवरून धरण्याच्या उद्देशानें मी म्हणालों, " मनोरमा सध्यां औट घटकांची श्रीमंती भोगून घेत आहे. लग्नापूर्वींच ह्या सर्व हौसा भागलेल्या बऱ्या. "

नलिनी म्हणाली, " आतां माझी परीक्षा झाल्यावर ही योजना अमलांत आणायची. "

माधव जातां जातां मुद्दाम मला व मनोरमेला चिडवण्याच्या उद्देशानें

म्हणाला, " आमच्या परीक्षा होतील, व निळकंठ, तुमचीहि नवराबायकोंची परीक्षा होईल ! लग्न होऊन एखादें मूल मनोरमेच्या मांडीवर खेळूं लागलें, किंवा निदान तिच्या गर्भवासांत तरी कांहीं महिने झोंपीं गेलें, म्हणजे तीच तुमची परीक्षा ! "

लगेच मनोरमेच्या गालांवर रागाची लाली पसरली. ती म्हणाली, " पळून गेले म्हणून सुटले, नाहींतर इथच्या इथें नलिनीच्या तोंडावर त्यांना तोडीला तोड उत्तर दिलें असतें.—बरें पण; मघां मी विचारीत होत्यें, त्याचें काय ? "

मीं अनंताला विचारलें, " अनंत, यमुनेशीं लग्न करायला तूं तयार आहेस का ? "

" ही मुलगी कुणामार्फत सांगून आली आहे ? " अनंतानें विचारलें.

मनोरमा उत्तरली, "माझ्यामार्फत. माझीहि अशी इच्छा आहे कीं, यमुनेची व तुमची लग्नगांठ मारली जावी. यमुना तुम्हांला माहीत आहे. त्यापेक्षां जवळची ओळख तुम्हांला द्यायची म्हणजे माझा डोळा चुकवून माझ्या पाटावर तिलाच गौरीहर पुजीत बसवण्याची योजना सध्यां सरस्वतीबाईकडून चालली आहे. तिच्या आईच्या कीर्तीवर कांहीं जाऊं नका;—सांगा काय तें. "

अनंत म्हणाला, " पण मायलेंकींचें जर या बाबतींत एकमत नाहीं, तर मी होकार किंवा नकार देऊं तरी कसा ? सरस्वतीबाई व गुणवंतराव यांच्याशीं गांठ आहे ती ! "

" म्हणून काय झालें ? गुणवंतराव कोण असे परमेश्वर लागून गेले आहेत ? " अनंतानें विचारलें.

" ते परमेश्वर असते तरी पुरवते; पण ते सैतान आहेत, म्हणून त्यांचें मला विशेष भय वाटतें. परमेश्वर केवळ अपराध्यांनाच शासन करतो; पण सैतानाच्या सैतानशाहींत निरपराधी जीवांना अगोदर आत्माहुति द्यावी लागते. ते गुणवंतराव, त्यांच्या त्या सरस्वतीबाई व त्यांच्या पापाची वांटेकरीण झालेली ती लीला—नको ! नको ! मनोरमे, जिवांत जीव आहे, तों ह्या तीन जिवंत पापांचा संबंध नको ! " मी म्हणालों.

पुन्हां माझ्याकडे वळून मनोरमा म्हणाली, " घालायची त्यांची समजूत. अहो अनंत, तुमची कबुली आहे असें एकदां कळलें, म्हणजे मग यमुना आपल्या आईला तसें स्पष्ट सांगेल. "

अनंतानें विचारलें, " पण मनोरमे, तुला यमुनेच्या लग्नाची इतकी काळजी कां ? तुलाच करून घे जा ती बायको पाहिजे तर. "

मनोरमा उद्गारली, " मला बायको करायची असती तर मी तुमच्या-सारखी मुळींच लाजल्यें नसत्यें. पण काय करणार ! देवानें माझ्या कपाळीं दुसऱ्याची बायको व्हायचें भवितव्य लिहिलें म्हणून मला गत्यंतर नाहींसें झालें आहे. माझी इच्छा एवढीच, आम्ही आज मैत्रिणीशा वागत आहों, ती आमची मैत्री जन्मभर टिकावी. जातीच्या बायका गरीब गाई आम्ही; आमचे आईबाप आमच्या मानेला दोरी लावून आम्हांला नेऊन बांधतील, त्याच्या दारीं गेलें पाहिजे. मग आमची ताटातूट होणार, ती होऊं नये. "

नलिनी मध्येंच म्हणाली, " अनंतराव, तुम्हांला जर केव्हां ना केव्हां लग्न करायचें असलें, तर आजच होकार द्या. कारण, इतकी चांगली नवरी-मुलगी तुम्हांला दुसरीकडे मिळायची नाहीं. "

"पण नलिनीताई, खरेंच सांगतों, लग्न करावें, कीं न करावें, याविषयीं माझा ठाम निश्चय अद्याप झाला नाहीं. लग्न करावें कीं न करावें, ह्या गोष्टीचें उत्तर अंतःकरणाच्या वाणींतून निघालें पाहिजे. पण माझें अंतःकरण ह्या एका विषया-पुरतें झोंपीं गेलें आहे. अशा स्थितींत मी होय कसें म्हणूं ? " अनंतानें विचारलें.

मनोरमा म्हणाली, " निदान आमच्यासाठीं तरी होय म्हणा. "

अनंत उत्तरला, " तुमच्यासाठीं होय म्हणूं ? केवळ तुमच्या मजे-खातर मी एका सच्छील कुंवारीच्या जन्माची माती करूं काय ? असली जिवंत मानवी देहाची विटंबना करणारा लग्नघरचा सट्टेदलाल मी नव्हे. खरोखरच सांगतों, मनोरमे, यमुनेला किंवा दुसऱ्या कोणत्याहि कुंवारीला माझ्या हृदयांत वास्तव्य करण्याला जागा नाहीं. पति ह्या नात्यानें मी जगांतील कोणा तरी स्त्रीला आपल्या संसारांत आश्रय द्यावा, असें मला वाटत नाहीं. तिच्यावर मला पतिभावानें प्रेम करतां येणार नाहीं. यासाठीं यमुनेला माझा निरोप सांग जा कीं, अनंत तुझ्याबरोबर पाठोपाठच्या बहीणभावंडांचें नातें राखण्याची इच्छा करतो, त्याला तूं मान दे. "

नलिनीला अनंताचे हे विचार ऐकून विस्मय वाटला. तिनें विचारलें, " अनंतराव, तुम्ही सध्यां एखाद्या प्रेमनिराशेच्या जाळ्यांत सांपडलां आहां कीं काय ? "

अनंत सर्वांना हात जोडून विनवूं लागला, "कृपा करून ह्या विषयांत माझ्याशीं कोणी कांहीं बोलूं नका. ज्या गोष्टीच्या आठवणीनें माझ्या रक्ताचें पाणी होतें, अशी ही एक गोष्ट आहे. बस्स–एवढेंच."

शेवटचे शब्द उच्चारतांना अनंताचे डोळे भरून आले, व तोंडून शब्द निघेनासा झाला. तो लगेच उठून वेगासरसा आमच्या दृष्टीआड झाला.

मनोरमा स्वतांशींच म्हणाली, "आमच्यांत हे एक प्रेमवेडे आहेत खरे बाई !"

अनंताच्या ह्या विचारपद्धतीचा मलाहि थांग लागेना. माझें मन मात्र संशय घेऊं लागलें, याला कारण मनोरमा असेल का !

* * * *

मनोरमेला वाटलें कीं, आपण आज आपोलोबंदरवर नौकाविहाराची सहल करायला जावें. मीहि तिच्या इच्छेला संमति दिली. कारण, आज कांहीं जबाबदारीच्या गोष्टींविषयीं तिच्या अंतःकरणांत मला प्रत्यक्ष वस्तुस्थितीचा प्रकाश पाडावयाचा होता.

धक्क्याजवळ गाडी उभी करून आम्ही धक्क्याच्या दगडी पायऱ्या उतरून खालीं गेलों व एक रुपया देऊन दोघांसाठीं एक स्वतंत्र होडी ठरवून तिच्यांत बसलों. चैनीसाठीं मी कधींहि पैसे खर्च करीत नसें; पण विकत्त्या मुंबईसारख्या शहरांत फुकटा एकांत तरी कसा मिळावा ! होडीवरील नावाड्याला मीं सांगितलें, कीं पाहिजे तर चार आठ आणे जास्त घे; पण एकतासपर्यंत होडी माघारी आणूं नकोस. त्याला ती गोष्ट पटली. आमचें खासगी संभाषण होडीवाल्यालाहि कळूं नये, एवढ्याचसाठीं मी मुद्दाम मराठी न समजणारा मुसलमान होडीवाला हुडकून काढला होता.

जनसंमर्दापासून आमची होडी बरीच दूर गेल्यावर मी मनोरमेला विचारलें, "मनोरमे, तूं परवां मला विचारीत होतीस, मी मामांसारखा श्रीमंती पोशाग कां करीत नाहीं—खरें ना ?

"होय." मनोरमा उत्तरली.

मी म्हणालों, "आज तूंहि श्रीमंती पोशाग केला आहेस. या पोशागानें तुझें आंग सोन्याचें झालें असेल तर मला पाहूंदे.—कर पाहूं तुझा तो हात इकडे !" असें म्हणून मी मनोरमेचा हात माझ्या हातीं घेतला, व तो निर-

खून पहात तिला विचारलें, "श्रीमंती वस्त्राभूषणांनीं तुझा हात कांहीं सोन्याचा झाला नाहीं. देशांत उपासमार भोगणाऱ्या अनंत दीनदुबळ्या लोकांसारखा किंवा आपल्या बंगल्याच्या पायथ्याशीं भिक्षा मागत वणवण हिंडणाऱ्या भिकाऱ्यांसारखाच तो रक्तमांसाचा आहे, खरें ना ?"

यावर मनोरमा कांहींच उत्तरली नाहीं. तिचा चेहरा मात्र गोरामोरा झाला.

"ह्या तुझ्या आंगावरच्या बहुमोल कपड्यांत किती गोरगरिबांच्या अन्नाचा चुराडा झाला आहे, याचा तूं विचार केला आहेस का ? असाच डौल मी करावा, व मजेनें आयुष्य काढावें, ही तुझी प्रबल इच्छा आहे. होय ना ? सांग. या वेळीं खोटें बोलूं नकोस. तुला माझ्या गळ्याची शपथ आहे. ही शपथ घालून मामी तुला पावलोपावलीं बोलती करते, हें मला माहीत आहे सांग; हीच ना तुझी इच्छा ?" मी विचारलें.

"होय." मनोरमा उत्तरली.

मीं विचारलें, "ही श्रीमंती तूं भोगतेस व मलाहि भोगायला शिकवतेस, ती कुणाच्या जिवावर ? मामामामींच्याच ना ? दुसऱ्याच्या जिवावर चैन करणें, ही गोष्ट तुला लाजिरवाणी वाटत नाहीं काय ? तूं म्हणशील, तुझी ताई चैन करते, ती पन्नास–पाऊणशें–दीडशें–दोनशें रुपये किंमतीचीं लुगडीं नेसते, तीच तुलाहि नेसवते. ती करते तीहि चूक करते, असें असलें तरी ती मामांच्या जिवावर हक्कानें विलास करते. मामांच्या अफाट संपत्तीची ती मालकीण आहे. पण त्यांच्या जिवावर श्रीमंती भोगणारी तूं उद्यां माझी अर्धांगी झाल्यावर तुझी ही संस्थानी बडेजावी मला कशी चालवतां येईल ? तूं पुन्हां म्हणशील, मामामामींचा आधार; पण हा आधार राखून तुझी बडेजावी चालवण्यासाठीं मी आजन्म मामामामींचा बंदा गुलाम होऊन राहूं काय ? सध्यां मी त्यांच्या अन्नावर पोसला जात आहें, याचीच मला लाज वाटते. आमच्या वयाचीं तरुण मुलें अशीं जन्मभर वाडवडिलांच्या अन्नावर पोसलीं जाण्यापेक्षां जन्मतांच मेलेलीं काय वाईट ? मामामामी कितीहि चांगलीं असलीं तरी त्यांच्या चांगुलपणाचा अवास्तव फायदा घेण्याची मला व तुला, दोघांनाहि लाज वाटली पाहिजे. हें जग रिकामपणीं बसून खाणाऱ्या आमच्यासारख्या आयतोबा जीवांकरतां परमेश्वरानें निर्माण केलें नसून श्रमसौंदर्याचे जे भोक्ते आहेत, त्यांच्यासाठीं निर्माण केलें आहे. गरीब बिचारा शेतकरी तहानभूक न म्हणतां

कडकडीत उन्हांत शेतांत राबून फुलझाडांची, फळझाडांची किंवा धान्याची लागवड करतो, तेव्हांच सुंदर फुलें फुलतात, सुंदर फळें धरतात व सुंदर शेतें पिकतात. तूं व तुझी ताई रोज दारच्या जाईजुईशेवंतीचे गजरे डोक्यांत माळतां किंवा दवण्याचे हिरवे पल्लव आंबाड्यावर खोंवतां, त्या फुलांची सुंदरता, मधुर वास, त्या दवण्याची नयनमनोहर हिरवळ आपल्या घरच्या माळ्यानें मातीपासून निर्माण केली, हा सुवास व हें सौंदर्य त्या माळ्याच्या श्रमांचेंच फळ नाहीं काय ? असेच श्रम आपण केले पाहिजेत, तरच आपण माणसें ! अशा श्रमजीवी जीवांचीच हिंदुस्थानाला आज गरज आहे; आयत्या पिठावर रेघा ओढणाऱ्या ऐद्यांची नाहीं.—ही तुझ्या-माझ्यासारख्या परान्नपुष्ट आयतोबांची गोष्ट झाली. पण स्वयंसिद्ध श्रीमंतांची श्रीमंती तरी परमेश्वरी न्यायानें त्यांचीच आहे किंवा कसें, याचा तरी तूं आपल्या मनाशीं कधीं विचार केला आहेस का ? आपल्या हिंदी राष्ट्राच्या उत्पन्नाची जर लोकसंख्येंत विभागणी केली, तर माणशीं रोज कसाबसा दीड आणा वांटणीला येतो. कल्पना कर कीं, उद्यां एखाद्या संस्थानिकानें आपल्या गादीचा वारसा आमच्या स्वाधीन केला, व आम्ही राजाराणी झालों, तरीहि रोज दीड आणा खर्च करण्यापुरतीच आमच्या संपत्तीवर न्यायानें आमची सत्ता चालेल. पण हा न्याय न ओळखतां आम्ही चैनींत पाण्यासारखा पैसा उधळतों, हा आमचाच अन्याय नाहीं का ? श्रीमंत ! म्हणे आम्ही श्रीमंत ! आपल्या देशबांधवांना भुकेनें तडफडत व थंडीनें कुडकुडत ठेऊन स्वतां पंचपक्वान्नांवर ताव मारणारे व भारी कपडे वापरणारे श्रीमंत दररोज आपल्या ऐषआरामांत किती गोरगरिबांच्या पोटाला बिब्बा घालतात, याची मनोरमे, तुला जाणीव आहे का ? श्रीमंतांना राहायला हवाशीर बंगले मिळतात; पण गरिबांना ह्या शहरच्या वस्तींत धड बसण्यापुरतीहि जागा मिळत नाहीं. ते खुराड्यासारख्या अपुऱ्या जागेंत गोठ्यांतील जनावरांसारखे गर्दी करून रहातात. अशा विपन्नावस्थेंत कष्टमय आयुष्य काढण्यापेक्षां तुरुंगवास बरा, तुरुंगांत तरी पुरेसें अन्न व पुरेशी जागा सरकार देतें, यासाठीं मुद्दाम अपराध करून कैद भोगणारे कैदी केवळ असह्य दारिद्र्यामुळें आमच्या हिंदुस्तानांत निर्माण होतात ! हें दुर्दैव आपल्या वांट्याला कशानें आलें याचा तूं विचार करशील, तर तुझ्या आंगावरचे रेशमी कपडे कांटेरी चिलखताप्रमाणें तुझ्या आंगाला बोंचूं लागतील, व हे डामडौल तुला व्यभिचाराइतके किळ-

सवाणे वाटूं लागतील. गरीब व उपाशीं पोटांच्या पायघडीवरून ऐषआरामाच्या उड्या मारायला शिकवणाऱ्या ह्या श्रीमंतीचा मग तुला वीट येईल. तूं आपल्या थाटमाटांत थोडीशी काटकसर करून अडल्यानडल्या गरिबांना जाडेंभरडें अन्न-वस्त्र देशील तर तुझ्या वयाच्या कितीतरी उपवर मुलींच्या अब्रूवर व पोटावर पांघरूण पडेल. त्यांच्या तान्ह्या बाळांना तूं घुटका घुटका दूध पाजलेंस, तर त्यांचे धन्यवाद तुला मिळतील. तूं रोज रस्त्यानें गाडींतून फिरूं लागलीस किंवा दिवाळी फंडाच्या निमित्तानें चाळोचाळ हिंडूं लागलीस म्हणजे ह्या गरिबीची तुला खरी कल्पना करतां येत नाहीं काय ? रंजल्या गांजल्या अनाथांचे 'हाय हाय' असे आर्तस्वर तुझ्या सभोंवार निघत असतांना तुझ्या मनाला विंचू डसल्यासारख्या वेदना होत नाहींत काय ? तीच तूं आपल्या चैनींतला बराच पैसा अडल्यानडल्या लोकांसाठीं खर्च करशील, तर त्या हंसऱ्या मुखांतून तुला जे आशीर्वाद मिळतील, त्यांनीं तुझें मन जास्त प्रसन्न होणार नाहीं काय ? मनोरमे, स्वतां आनंदी होण्याची कला दुसऱ्यांना आनंदी करणाऱ्या परोपकाऱ्यांनाच साधत असते. मनोरमे, माझी आई म्हातारी, म्हणून तिची सेवा करण्यांत किंवा तिची आज्ञा मानण्यांत तुला लाज वाटते. जणूं काय तुझ्या किंवा माझ्या वांट्याला म्हातारपण साऱ्या जन्मांत कधीं येणारच नाहीं ! उद्यां आम्ही म्हांतारीं झालों व आमच्या मुलांनीं आमची अशीच आबाळ केली, तर ती तुला कितपत रुचेल बरें ? मनोरमे, वडील माणसांनीं दिलेल्या शापांची किंवा आशीर्वादांची पूर्तता करण्याला परमेश्वर सदांचा बांधलेला असतो. आम्ही लेंकरांनीं अवहेलना केल्यामुळें वडील माणसांच्या डोळ्यांतून पाणी आलें, तर त्या पाण्यांत परमेश्वरी कृपेचे पर्वतहि विरून जातील. तशीच मित्रमंडळी ! माझ्या किंवा तुझ्या मित्रमंडळीशीं तूं उद्धटपणानें वागतेस. परवां तूं अनंतावर आपल्या तोंडाचा पट्टा चालवलास. याला जग कदाचित् बाणेदार-पणा म्हणेल; पण मी त्याला शिरजोरपणा म्हणतों. शालीनता ही तुम्हां बायकांची शोभा आहे. पण गुणवंतरावांशीं बोलतांना तूं शालीनतेच्या तोंडाला काळें फांसलेंस ! आतांपर्यंत मला मुठींत ठेऊन माझ्या आचारांचा ओघ आपल्या विचारौघाच्या अनुरोधानें वाहता करण्याचा तूं थोडाथोडका अट्टहास केला नाहींस, व ह्या अंगीकृत कार्यांत तूं यशस्वी होशील, याविषयींहि मला शंका नाहीं. तुम्हां बायकांना तर ही परमेश्वरी देणगीच आहे. पण ह्या सत्तेचा

दुरुपयोग करून तुम्ही बायकाच घरोघर भाऊबंदकीचा वणवा पेटवून धनंतर संसारांना दुहीच्या आगी लावतां ना? स्त्रीजात ही जात्याच सुंदर आहे. तशांत तुझ्या रूपाची रमणीयता व माझ्या चित्ताची चंचलता यांची गांठ पडल्यावर न जाणो, कदाचित् मी तुझ्यासभोंवार घिरट्या घालणारा बाईलवेडाहि होऊन बसेन! अशा स्थितींत जन्मसिद्ध लावण्य ही परमेश्वरी ठेव तुझ्या हातीं आहे, तिची उधळपट्टी करून तूं मला स्वतांच्या स्वार्थी विचारांचा दास बनवणार काय?"

"माझ्या लावण्यांत इतकें का विष सांठवलेलें आहे?" मनोरमेनें विचारलें.

मी उत्तरलों, "तुझ्या लावण्यांत विषहि आहे व अमृतहि आहे. आपल्या लावण्याच्या मनोरम प्रान्तांत माझें मन रंगवून तूं माझ्या हातून जनसेवा घडवून आणशील, तर तुझें लावण्य जनतेवर अमृताचा वर्षाव करीत आहे, असें मी म्हणेन. पण तूं मला आपल्या नादीं लावून स्वार्थाला, लोभाला व आत्मवंचनेला प्रवृत्त केलेंस तर तें लावण्य विषमय नाहीं, असें कोण म्हणेल? पहा! माझ्यासारखा भावनाप्रधान चंचल वृत्तीचा तरुण आपल्या भावी गृहलक्ष्मीची यापेक्षां कोणत्या निराळ्या शब्दांनीं व कोणत्या निराळ्या मंत्रांनीं आराधना करणार!"

"मग मीं काय करावें अशी आपली इच्छा आहे?" मनोरमेनें विचारलें.

"तूं मनानें उदार व्हावेंस, सर्वांभूतीं प्रेम करण्याच्या दयाशील उदात्त मनोवृत्तींनीं श्रीमंत व्हावेंस, जनसेवेच्या व तदनुरोधानें देशसेवेच्या मंगल कुंकुमाचा सौभाग्यटिळक आपल्या ललाटीं रेखावास, परोपकार व समता यांचीं उंची जरतारी वस्त्रें परिधान करावींस, रंजल्यागांजल्या लोकांना विपत्तींतून मुक्त करून त्यांच्या धन्यवादांचीं भूषणें आंगाखांद्यावर धारण करावींस, अशा वैभवशालीनतेनें तूं माझ्या संसाराचा स्वर्ग करावास, अशी माझी इच्छा आहे. मनोरमे, स्वर्ग–मोक्ष–वैकुंठ ह्या पुण्यवंत जीवांच्या किंवा पुण्यमय देवांच्या वसाहती विश्वाच्या डोल्हाऱ्याच्या तिसऱ्या, पांचव्या किंवा सातव्या मजल्यावर वसल्या नसून त्या भावनामय आहेत. त्यांचें जनन जीवमात्राच्या सात्विक कर्मक्षेत्रांतच होत असतें."

बराच वेळ कांहीं न बोलतां मनोरमा आमच्या होडीच्या कडेनें समुद्राच्या निळ्या पाण्यांत पटापट उड्या मारणाऱ्या माशांकडे टक लावून बसली

होती. आपल्या आयुष्याचा इतक्या जबाबदारीनें विचार करतांना मी तिला आज प्रथमच पहात होतों. ही तिच्या चित्तांतील विचारक्रांति हांहां म्हणतां इतक्या जोरानें वाढूं लागली कीं, त्यामुळें तिच्या सभोंवार करुणामय नेत्र-कटाक्षांच्या विजा चमकूं लागल्या, हुंदक्यांचें जंगी वादळ सुटलें व क्षणार्धांत दोन्ही डोळ्यांतून पर्जन्यवृष्टि सुरू झाली. इतकी अंतःसृष्टीची घडामोड कर-णाऱ्या त्या आदिमायेच्या गालांवर गुलाबी लालीचें श्रमसौंदर्य पसरलें, व त्या लालीवर पाणीदार मोत्यांप्रमाणें कांहीं अश्रु चमकूं लागले. ह्या अश्रूंची मौक्तिकमाला गुंफतां आली तर पहावी म्हणून वाऱ्याची एखादी लाट मधून मधून हळूच मनोरमेच्या विखुरल्या केंसांची एखादी बट तिच्या गालांवर रुळवीत होती. कांहींसा राग, कांहींसा अनुराग व कांहींसा अनुताप या तिहेरी जाळ्यांत बायका एकदां सांपडल्या, कीं त्या सुंदर नसल्या तरी सुंदर दिसूं लागतात. तशांत मनोरमा जात्याच सुंदर असल्यामुळें तर तिच्या सुंदरतेला आतां मर्यादाच उरली नाहीं. विशेषतः तिचा विस्तीर्ण भालप्रदेश व पाणीदार डोळे यांनीं तर मला बेभानच करून सोडलें.

ह्या विचारसमाधींत बराच वेळ निघून गेला तरी मनोरमेची तंद्री मोडली नाहीं. हां हां म्हणतां आकाशाची बाग नक्षत्रांनीं फुलून गेली, व चंद्रदेव त्या बागेच्या एका नक्षत्रकुंजांत येऊन क्रीडा करूं लागला. आज पौर्णिमा अस-ल्यानें चंद्रबिंब कल्पनातीत सुंदर दिसत होतें. चंद्रबिंबाला बिलगून एक मोठा निळसर पांढरा मेघ चालला होता. चंद्राची रोहिणी कुठें आहे म्हणून मी पाहूं लागलों तों ती मात्र आढळेना. त्यावेळीं मी ओळखलें कीं, मनोरमेच्या लाव-ण्याला पाहून रोहिणी मनांतल्या मनांत लाजली असली पाहिजे, व शरमिंदे-पणानें तिनें आपल्या तोंडावरून निळसर पांढऱ्या मेघाचा बुरखा घेतला असला पाहिजे. मी जर चितारी असतों, तर विचारसृष्टीच्या युगांतरांतील आजच्या मनोरमेचें मनोरम चित्र रेखाटून तें मी माझ्या देव्हाऱ्यांतील देवीच्या मूर्तीशेजारीं स्थापून त्याची नित्य पूजा केली असती.

कां नकळे; पण मनोरमा रडूं लागलेली पहातांच माझें चित्त आनंदानें हंसूं लागलें. यावरून जग मला निष्ठुर म्हणेल, पण जगाला माहीत नाहीं, असें एक गूढ कारण माझ्या आनंदाच्या मुळाशीं आहे. मनोरमा रडत होती खरी; पण तिच्या रडण्यांतून सर्वाभूतीं सात्विक प्रेमाचा मंजुळ स्वर निघत

असलेला मला ऐकूं येत होता. प्रेमी जीवांच्या मनोमय प्रेमसमाधींत परस्परांच्या कल्पनारम्य मूर्तींची प्राणप्रतिष्ठा करतांना त्या मूर्तींच्या मस्तकावर जो मंगलाभिषेक केला जातो, तेच हे अश्रु ! त्यांना अमंगळ कोण म्हणेल !

पदरानें डोळे पुसून घोगऱ्या स्वरानें मनोरमेनें मला विचारलें, " आपल्याला जर माझ्या इतक्या चुका माहीत होत्या, तर त्या वेळींच सुधारण्याचें श्रेय आपण कां नाहीं घेतलें ? आपल्या कळवळ्याच्या उपदेशानें माझी वृत्ति पालटली तर त्यांत नवल नाहीं; पण ताईचीहि वृत्ति पालटली असती. "

" पालटली असती खरी; पण गुरूच्या वचनांवर शिष्याचा विश्वास असला तरच गुरूचा उपदेश त्याला मानवतो. " मी म्हणालों.

" आपल्या उपदेशावर माझा विश्वास आहे, व ताईचाहि असेल. " मनोरमा म्हणाली.

" असेल ! —पण जाऊंदे. वडील माणसांच्या असल्या बऱ्यावाईट गोष्टींविषयीं आपण लहानांनीं चर्चा करूं नये. " मी उत्तरलों.

" असें काय ! एखाद्याच्या आशेची निराशा करणें हें पाप आहे. सांगावें काय आपल्या मनांत आहे तें ! " मनोरमा म्हणाली.

इतक्यांत नावाड्यानें विचारलें, " होडी पीछे लेयँगे क्या सेठ ! "

मनोरमा मनगटावरील घड्याळ पाहून म्हणाली, " अर्धा तास अवकाश आहे अजून. "

" तेवढा वेळ किनाऱ्याला जायला लागेल. " नावाडी उत्तरला.

मी म्हणालों, " अच्छा लेव पीछे. "

नावाड्यानें होडी मागें फिरवली, व आम्ही किनाऱ्याकडे चाललों. नावाडी मधून मधून आमच्याकडे संशयित मुद्रेनें पहात होता. त्याला वाटलें असावें कीं, नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें घरच्या माणसांना चोरून प्रणयचेष्टा करणारें हें एक रंगेल जोडपें आहे !

मनोरमेनें पुन्हां विचारलें, " विषय बदलला तरी मी विसरायची नाहीं. मघांच्या आपल्या संशयी बोलण्याचा अर्थ काय तो सांगावा. "

" हे प्रश्न घरांत नसता वाद माजवणारे असतात, म्हणून मी त्यांची वाच्यता करीत नाहीं. " मी उत्तरलों.

" असें काय ! आपल्याला माझ्या गळ्याची शपथ आहे. मला माहीत

आहे, माझ्या गळ्याची शपथ आपल्याला मोडतां येणार नाहीं. ज्या गोष्टी ब्रह्मदेवहि आपल्या हातून करवूं शकला नसता, त्या गोष्टी माझ्या गळ्याच्या शपथेवर मीं आपल्या हातून करवल्या आहेत. लक्ष्यांत असूं द्या, मी आपली अर्धांगी व्हायची आहें. आपल्या वाचेनें मी बोलणार; माझ्या वाचेनें आपण बोलावें—सांगावें काय तें. " मनोरमेनें हट्ट धरून विचारलें.

मी उत्तरलों, " मनोरमे, मी गरीब, म्हणून मी आपल्या जातीगोताचा आहें, हें बरोबरीच्या मैत्रिणींत बोलायलाहि मामींना लाज वाटते. अगदीं क्षुल्लक गोष्ट ! मी थोड्या दिवसांपूर्वी स्त्रीसमाजांत मिशनरी कार्य कसें करावें याविषयीं कांहीं सूचना केल्या, त्या त्यांना रुचल्या नाहींत. तशांत त्यांच्या मैत्रिणींनीं मामींचे कान भरवून दिले कीं, तुमचे पुरुष तुमच्या ताब्यांत नाहींत; त्यांची थोडीशी कानउघाडणी करा !—झालें ! मामींसारख्या सुशिक्षित स्त्रीचा घरांतील पुरुषांवर ताबा नाहीं !—सुशिक्षित स्त्रियांना किती शरमेची गोष्ट आहे ही ! त्या वेळीं आपला मोठेपणा राखण्यासाठीं मामींना माझ्यावर व मामांवरहि अजाणपणाचा आरोप करणें अपरिहार्य झालें. त्याच वेळीं तुझ्या लग्नाची गोष्ट निघाली, तेव्हां मामी असेंहि म्हणाल्या, ' निळकंठ एक भटका फटिंग, त्याला ना कुळ ना गोत, ना घर, ना दार, असल्या सडेसोट उडाणटप्पूला मुलगी दिली तर ती ठार बुडेल. "

"खरें का हें पण ? मी ताईला याच्या खऱ्या खोट्याचा जाब विचारूं का ? " मनोरमेनें ईर्षेला पेटून विचारलें. तिला मनांतून मामींचा फार संताप आला.

मी म्हणालों, " नको. यांतलें अवाक्षरहि ताईला विचारूं नकोस. ह्या गोष्टी मनोमन ओळखायच्या असतात. "

" असल्या गोष्टी कधीं कधीं माझ्याहि अनुभवाला येतात. एकूण ताईची अशी करणी कसाबाची व बोलणीं मानभावाचीं आहेत तर !" मनोरमा म्हणाली.

मनोरमा जातीची बायको पडली, तिचें मन एकदां बिथरलें तर कायमचें बिथरेल, असा हा बेवनाव मला नको होता. मी म्हणालों, " ह्या गोष्टी तूं तितक्या जिवाला लावून घेऊं नकोस. आपल्या घरचे पुरुष आपल्या मुठींत आहेत, हें बरोबरीच्या चार बायकांत हळदीकुंकवाच्या समारंभांत सिद्ध करण्यासाठीं मामींना हा आत्मश्लाघेचा मार्ग पत्करावा लागला. मामींनीं माझ्या जातीगोताचा पत्ता नाहीं म्हटलें, व इतर बायकांना तो एक चर्चेचा विषय होऊन

बसला, यांत मला दुःख नाहीं, व लाजहि नाहीं. वडील माणसांच्या तोंडची निंदा आहे ती; मला तीं फुलेंच आहेत. पण यावरून मला एक धडा मिळाला तो हा कीं, माझ्या जन्मदात्या आईइतका अलोट आदर ज्यांच्याविषयीं माझ्या मनांत वसत आहे, त्या मामींनीं जर माझ्याविषयीं अकारण इतका तिरस्कार दाखवला, तर सरस्वतीबाईसारख्या ज्या परक्यांच्या परक्या बायांविषयीं माझ्या मनांत आदर किंवा अनादर मुळींच नाहीं, त्यांनीं माझ्याविषयीं किती तिरस्कार दाखवावा ! ”

“आपण ताई-नानांचे इतके आवडते असतांना जर आपल्याला ताई इतकी दूर पहाते, तर माझ्याविषयींही तिचे विचार अर्थातच जरा विचित्र असले पाहिजेत. कारण, मी ताईच्या पाठचीहि नाहीं किंवा पोटचीहि नाहीं.” मनोरमा उद्गारली.

एका निष्पाप कुमारिकेचें मन तिच्या मातृतुल्य भगिनीविषयीं आपण वृथा कलुषित करीत आहों, हें आपल्या हातून भयंकर पाप होत आहे, अशी माझी मनोदेवता मला खोटी साक्ष देऊं लागली. पण खरें पाहूं गेलें असतां यांत मी पाप तें काय करीत होतों ! मामींच्या स्वभावावर झगझगणारा वत्सलतेचा सोनेरीपणा मनोरमेच्या दृष्टीला आजपर्यंत दिपवून सोडीत होता, त्याचें तकलादी स्वरूप तिच्या नजरेला येईल व तिला संसाराचा एक धडा मिळेल, अशी मला आशा होती. मी म्हणालों, “ हीच गोष्ट तुला अगोदर कळली पाहिजे होती. आतां तूंच सांग बरें; मामामामींच्या जिवावर आपण आज जें वैभव भोगतों, तें शाश्वत आहे का ? ”

“ नाहीं. ” मनोरमा निश्चयाच्या स्वरानें उत्तरली.

“ खरोखरच नाहीं. कारण, तूं काय किंवा मी काय, मामामामींच्या पोटचीहि नाहीं व पाठचीहि नाहीं. अशा परक्यांच्या परक्यांचा सांभाळ करतांना आपल्या वत्सलतेचा बराच मोठा भाग कांहीं महिन्यांनीं स्वतांच्या उदरीं जन्माला येणाऱ्या लीलाधरासाठीं मामींनीं राखून ठेविला असला, तर ही त्यांची एकट्याचीच रीत नव्हे; ही जगाची रीत आहे. याविषयीं आपण त्यांना नांवें ठेवण्यांत अर्थ नाहीं. उलट मामी काय किंवा मामा काय, आमच्या पात्रतेपेक्षां जास्त आपलेपणानें आमचें पालन करतात, या त्यांच्या उपकारांबद्दल आपण त्यांना जन्मदात्या मातापितरांप्रमाणें मान दिला पाहिजे. ”

“ आम्ही त्यांच्यावर मातापितरांप्रमाणें प्रेम करावें व त्यांनीं मात्र आपल्या

वत्सलतेचा बराच मोठा भाग आमच्यापासून चोरून ठेवावा, हा न्याय विचित्रच नाहीं का ? " मनोरमेनें विचारलें.

मी म्हणालों, " यांत विचित्र तें काय आहे ! मनोरमे, जगांतल्या साऱ्या स्त्रिया जर पाळलेल्या किंवा मानलेल्या मुलांवर पोटच्या मुलांप्रमाणें प्रेम करायला लागल्या, तर मग अपत्यप्रेमाची थोरवी ती काय उरली ! सुखाचें रमणीयत्व वाढवण्यासाठीं ज्या परमेश्वरानें जगांत दुःखाच्या विषवेलीची लागवड केली, त्याच परमेश्वरानें पोटचें संतान व पाळलेलें किंवा मानलेलें संतान यांच्याविषयींच्या प्रेमांत पृथक्‌पणा निर्माण केला आहे. आपण मामामामींच्या पोटचींहि नाहीं किंवा पाठचींहि नाहीं. अर्थात् सध्यां त्यांचें आपण जें अन्न खातों, तें आमच्या सत्तेचें नसून त्यांच्या मेहेरबानीचें आहे. असल्या मेहेरबानीचें मेलेलें अन्न तूं जन्मभर खाणार काय ? "

" नाहीं. मी लोकांच्या मेहेरबानीवर कां पोसेन ? स्वाभिमान व स्वावलंबन यांची चाड मला देखील आहे. आपलें लग्न झाल्यावर आपण आपल्या देशीं जाऊं. त्याठिकाणीं आपल्या कष्टानें मिळेल ती भाजीभाकर आपण खाऊं, व मिळतील तसलीं जाडींभरडीं वस्त्रें नेसूं. " मनोरमा उत्तरली.

" शाबास ! हीच जाणीव मला तुझ्या अंतःकरणांत उत्पन्न करायची होती. मामामामींचें वैभव आपलें नाहीं, याचा अर्थ मामामामी आपलीं नव्हेत, असा मात्र नव्हे. तीं आपलीं मायबाप आहेत; आपण त्यांचीं लेंकरें आहों. पण आम्ही आमचीं होणार तेव्हां आम्ही दुसऱ्यांचीं होणार ना ? आत्मदानाची पुण्याई थोर आहे खरी; पण ती आत्मयज्ञ करणाऱ्या आत्मज्ञानी जीवांनाच लाभत असते. " मी म्हणालों.

" हा आपलेपणा मी आजपासून ओळखूं लागेन. आजपर्यंत मी ऐषआराम व सुखोपभोग यांची दासी होत्यें, पण आतां त्यांची स्वामिनी झाल्यें आहें. मानवी जीवन म्हणजे थट्टेतील पोरखेळ नव्हे, याची जाणीव मला आज झाली. आजपर्यंत मी माती होत्यें, त्या मातीचें आपल्या सहवासांत आतां सोनें होत आहे. हे सौभाग्यदेवा ! मला नानाताई कन्यादानपूर्वक आपल्या चरणीं अर्पण करणार, त्या पूर्वीच आपल्या उपदेशानें फुललेलें हें माझें मनःपुष्प मी आपल्या चरणीं अर्पण करत्यें." असें म्हणून मनोरमा माझ्यासमोर नम्र झाली.

माझ्या पायांवर मस्तक ठेवण्यासाठीं मनोरमेनें मान नमवतांच मी अनन्य भावानें परमेश्वराची प्रार्थना केली, " हे परमेश्वर ! सत्याला व कर्तव्याला स्मरून जगांत वावरणाऱ्या जीवांच्या चांगुलपणाचें श्रेय तूं इतक्या सढळ हातानें त्यांच्या पदरांत घालतोस ! हे भगवन् ! हीच विचारजागृति माझ्या व माझ्या भावी सहचारिणीच्या अंतःकरणांत वसंतऋतूंतील फुलवेल होऊन राहूंदे. त्या वेलीवरच्या फुलांनीं आम्ही तुझी पूजा करूं, व आमची आयुर्मर्यादा संपतांच त्याच फुलांचे झेले उडवीत तुझ्या चरणीं येऊं. "

बोलतां बोलतां अपालोबंदरचा किनारा आला, व आमची होडी किनाऱ्याला लागली. धक्क्यावर उतरतांना मनोरमेच्या जरतारी पदरावर, कानांतल्या माणकांच्या कुड्यांवर व नाकांतल्या हिऱ्याच्या चमकीवर चंद्रकिरणांची प्रभा फांकल्यानें तीं विद्युल्लतेसारखीं चमकूं लागलीं. इतकी नयनमनोहरता मनोरमेच्या आंगीं आहे, असें यापूर्वी मला केंव्हांहि वाटलें नव्हतें. मग कदाचित् आज तिच्या चित्ताला जी उपरति झाली, त्या ईश्वरी साक्षात्काराचेंहि तें तेज असेल ! मी तर क्षणभर वेडावून तिला म्हणालों, " तशीच–मनोरमे, तशीच क्षणभर उभी रहा ! "

वाहत्या पाण्याशीं चाळे करायची मनोरमेला फार आवड होती. ती एका पायरीवर बसली व मोकळे पाय तिनें खालीं सोडले. इतक्यांत समुद्राची एक लाट धांवत धांवत आली, तिनें मनोरमेच्या पायांना विळखा मारला व तिच्या पायांतले जोडे उराशीं धरून समुद्राच्या तळाशीं निमज्जन केलें. मनोरमा विस्मयानें म्हणाली, " हें काय ! जोडा वाहून गेला. "

मी म्हणालों, " सागराच्या देवघरांतील देव्हारा कुणा देवतेच्या पादुकांशिवाय उघडा पडला असेल, म्हणून तो आपल्या दासीला लाटेच्या रूपानें पाठवून तुझ्या पादुका घेऊन गेला. "

वहात गेलेला मनोरमेचा जोडा आणण्यासाठीं नावाडी चुळबुळ करूं लागला; पण आम्हीच त्याला नको म्हणून सांगीतलें, व त्याच्या मजुरीबद्दल त्याच्या हातावर दीड रुपया ठेऊन पायऱ्या चढूं लागलों.

चालतां चालतां मी म्हणालों, " मनोरमे, आज तूं किती सुंदर दिसतेस ! "

"मी आहेंच तशी सुंदर. पण हें वस्त्राभूषणांचें सौंदर्य मनोरमेच्या सौंदर्याशीं एकजीव झालेलें आपल्याला यापुढें मात्र पाहायला सांपडायचें नाहीं. आज शेवटचें पाहून घ्या. " मनोरमा उत्तरली.

मी म्हणालों, " तूं वैभवाच्या भोगानें जितकी सुंदर दिसतेस, त्यापेक्षां वैभवाच्या त्यागानें जास्त सुंदर दिसशील. "

यावर मनोरमेनें लाजून खालच्या मानेनें स्मित हास्य मात्र केलें.

आमची गाडी आमच्यासाठीं वाटच पहात होती. तिच्यांत आम्ही बसलों व गिरगांवांत आमच्या घरीं आलों.



# सातवी झुळुक

## मनोरमा (२)

तो साक्षात्काराचा दिवस मी जन्मवेरीं कधीं विसरायची नाहीं. त्यावेळीं त्या घटकेलाच माझें मन मला सांगू लागलें कीं, मी आहें तशी नाहीं, व असल्यें तरी आतां तशी असतां कामा नये. कारण, आतां यापुढें माझ्या जीवनचरित्राचें प्रतिबिम्ब एका उज्ज्वल लोकसेवकाच्या अंतःकरणावर अर्धांगीच्या पवित्र व जबाबदारीच्या नात्यानें उमटायचें आहे. माझ्यासाठीं ते संसारी बनणार, त्या संसारांत रमणीयता उत्पन्न करून आणि आत्मसेवा, लोकसेवा व देशसेवा यांना जन्म देऊन वाढवणारी संजीविनी आम्हांला निर्माण करायची आहे.

श्रीमंती व गरिबी यांपैकीं कोणती दशा आपल्याला आवडते, हें आज माझें मलाच कळेनासें झालें आहे. पण एवढें मात्र तिकडच्या उपदेशानें मला शिकतां आलें कीं, आप्तेष्टांच्या घरच्या भाडोत्री श्रीमंतीपेक्षां सत्तेची गरिबी हजार पटींनीं चांगली असते. हें मत बनलें खरें; पण ह्या विचारांतल्या गोष्टी आचारांत आणतांना माझें मन किती कुचराई करीत होतें म्हणून सांगूं! संसाराच्या अलोट मोहांत धुंद झालेल्या एखाद्या भटाभिक्षुकावर शंकराचार्य व्हायची पाळी आली म्हणजे मूर्तिमंत संन्यास त्याच्या डोळ्यांसमोर उभा राहून एका बाजूला संसाराचा पसारा व एका बाजूला संन्याशाच्या भगव्या छाटीच्या बुरख्याखालून आपल्याकडे येणारें वैभव अशी परस्पर-विरोधी स्थिति पाहून त्याचें मनहि जितकें थरारत नसेल, तितकें आजची श्रीमंती व उद्यांची गरिबी पाहून माझें मन थरारलें. लोभ! हा जळ्ळा लोभ किती वाईट आहे! आजच्या घटकेपर्यंत मी श्रीमंती भोगली, लक्ष्मीला एखाद्या दासीप्रमाणें माझे पाय चुरायला लावलें, ते सारे सोहाळे आतां विसरायचे, व गरीब बनायचें, आणि तें कुणासाठीं? तर एका तिकडच्या पायांसाठीं!

त्याच रात्रीं मी माझे श्रीमंती थाटाचे भारी किंमतीचे कपडे बांधून कपाटांत ठेऊं लागल्यें, तोंच ताई एकाएकीं माझ्यापाशीं येऊन मला विचारूं लागली, "आज आपला काय बेत आहे बाईसाहेब?"

ताईच्या ह्या प्रश्नानें मी लाजल्यासारखी झाल्यें. पण ताईचा थट्टेखोर स्वभाव माझा हा लाजाळूपणा चवाठ्यावर आणल्याशिवाय राहणार नाहीं, या भयानें मी उत्तरल्यें, " ताई, आजपासून मी श्रीमंती कपडे वापरणार नाहीं. "

" कां वापरणार नाहीं ? उद्यांच्या गरीब संसाराचें वारें आजच आंगांत शिरलें वाटतें ! कुणी ग तुला शिकवलें हें ? " ताईनें विचारलें.

ह्या ताईच्या प्रश्नाला काय उत्तर द्यावें, हेंच मला सुचेना. तिकडचें नांव सांगितलें तर ताई कदाचित् रागवेल हें भय होतें. पण देवानेंच काळजी दूर केली. मी अशी संकटांत पडलेली पहातांच माझे देवच माझ्या साह्याला धांवून आले. ती मूर्ति कोण होती ? पुन्हां तेंच ! पुन्हां पुन्हां कितीदांतरी सांगूं कीं तें नांव उच्चारायला मला लाज वाटते म्हणून !

" मामी, मनोरमेला हें मीं शिकवलें " मामींना उत्तर देणें झालें.

" एकूण पुरुषांचाच विजय झाला म्हणायचा शेवटीं ! माझी कल्पना होती कीं, मनोरमा तुला आपल्या मुठींत ठेवणार. पण पहात्यें तर हा उलटाच प्रकार ! " मामी म्हणाल्या.

यावर तिकडून मुद्दाम टीका करायची झाली, " कां, मामी, तुमच्या मनोरमेला तुम्हांला अद्यापीहि ताळ्यावर आणतां येईल. तुमच्या मताधिकारांच्या, समानहक्कांच्या चळवळींत तिला एकदां घोळती करा, म्हणजे ती आजकालच्या शिकल्यासवरलेल्या बायकांना मुळींच अपवाद व्हायची नाहीं. "

ताईनें विचारलें, " याचा अर्थ असाच घ्यायचा ना, कीं, शिकल्या सवरलेल्या बायका तेवढ्या साऱ्याच पुरुषांच्या डोकीवर बसतात आणि आपली पायरी सोडून वागतात ? "

ह्या ताईच्या प्रश्नांत थोडासा स्वाभिमान जागृत झालेला दिसला. तिला वाटलें, तिकडून टोमणा द्यायचा झाला तो तिलाच ! मी मध्येंच म्हणाल्यें, " नाहीं ग ताई, शिकलेल्या बायकांला मी आजसुद्धां कांहीं अपवाद नाहीं. शिकलेल्या बायकांच्या नवऱ्यांप्रमाणें कुणाच्या आंगीं स्त्रीदाक्षिण्य येईल तर तें मला पाहिजेच आहे. पण—हा मात्र शिकलेल्या पुरुषांना अपवाद नाहीं का ? आजकालच्या शिक्षणाचा परिणाम साधारणतः आमच्या हिंदुसमाजावर असा होतो कीं, हें शिक्षण बायकांना पुरुषांच्या डोकीवर बसवतें.-- "

मी पुढें बोलण्यापूर्वीच ताई म्हणाली, " आणि आपल्या बायकांना डोकीवर

नाचवण्याची बाइलवेडेपणाची कलाहि पुरुषांना शिकवतें. पण यांतला तुमचा कोणता पंथ ? ”

“ आमचा आपला तृतीय पंथ ! ” मी उत्तरल्यें. हे शब्द उच्चारतांना मला हंसूं आलें, तसेंच तिकडेहि हंसूं आलें. मनांत मी म्हटलें, सासूबाई जर यावेळीं इथें असत्या, तर मला खास फाजील म्हणाल्या असत्या.

ताईला तिकडून सांगणें झालें, “ मामी, खरोखरच आमचा तृतीय पंथ आहे. नवऱ्यांनीं बायकांना लाथांखालीं तुडवणें किंवा डोकीवर नाचवणें, ह्या दोन्ही गोष्टी आमच्या पंथाशीं अगदीं विसंगत आहेत. संसारांत नवऱ्याचा नवरेपणा व बायकोचा बायकोपणा कायम राहिला तर तीच समानहक्कांची शोभा व तीच संसारसुखाची गुरुकिल्ली, असें आमचें ठाम मत असल्यानें वरच्या दोन्ही पंथांशीं आमचें पटण्यासारखें नाहीं. मी म्हणतों, स्त्रियांनीं सभासमारंभांच्या उंबरठ्यांची माती झिजवण्यापूर्वीं स्वतांच्या संसाराची घडी नीट बसवणें, हाच स्त्रियांचा पहिला हक्क आहे. ”

हे तिकडचे विचार माझ्या मनालाहि पटले. पण त्याच वेळीं माझ्यासमोर एक भीति मूर्तिमंत येऊन उभी राहिली. ती त्या वेळेपुरती तरी कशी बशी निभावेल अशी आशा होती, पण व्यर्थ !

ताईनें विचारलें, “ मग काय, आपल्या राणीसाहेबांना आपण पहिल्या दिवसापासून चूल फुंकायला लावणार कीं काय ? ”

मला माहीत होतें कीं, यावर होय हें उत्तर ठरल्यासारखें येणार. तें जाणूनच मी आपणहोऊन बोलून सारलें, “ मी सैंपाक करीन; आनंदानें करीन. पण आजमात्र मला भाताचें आधणहि ठेवतां येत नाहीं. ”

मी तिकडच्या मनांतली गोष्ट ओळखली, याचें ताईला व दोघांनाहि कौतुक वाटलें. तिकडच्या अर्धवट हंसऱ्या चेहऱ्याकडे पहातां पहातां तर वरवर— आकाशाच्याहि वर स्वर्गांत भराऱ्या मारण्यासाठीं मला विमानांत बसवून कोणी नेत आहेसें वाटलें. रागाचें उसनें अवसान आणून ताईला विचारणें झालें, “मामी, तुम्ही सभासंमेलनांत जाऊन समानहक्क व मताधिकार मागतां, आणि तुमच्या घरच्या नवऱ्यामुलींना हीचना अक्कल शिकवतां ? ही तुमची बहीण उद्यां पाहिजे तर समान हक्कांवर एखादें सुश्राव्य व्याख्यान देईल. पण घरांत सैंपाक करायला मात्र तिच्या नवऱ्याला निराळी बाई बाळगावी लागेल.

ती बाई त्यानें कुठची आणावी ? अशा गरीब नवऱ्यांना त्यांच्या बायका डोईजड होणें, म्हणजेच समान हक्कांचें वाण त्यांच्या पदरीं पडणें काय ? ”

मी उत्तरल्यें, “ पण मी सांगितलें ना, मी सैंपाक करीन म्हणून ? मला कुणीतरी पहिल्यापहिल्यानें शिकवलें मात्र पाहिजे, तें सासूबाई शिकवतील. ”

सासूबाईंचें नांव घेतल्यावर सासूबाई दत्त म्हणून पुढ्यांत उभ्या ! ताई त्यांना म्हणाली, “ वन्सं, तुम्हांला शंभर वर्षें आयुष्य आहे. आतांच तुमच्या ह्या सूनबाईनें तुमची आठवण काढली, तोंच तुम्ही हजर. ”

“ माझी आठवण कशाला काढली ? ” सासूबाईंनीं विचारलें.

“ तुमची सूनबाई आजपासून तुमच्यापाशीं सैंपाक करायला शिकणार आहे. ” ताई म्हणाली.

सासूबाई तिरस्कारानेंच म्हणाल्या, “ वैनी, मी तुला एकदां ब्रह्मदेवाचें लिखित सांगून ठेवत्यें, मनोरमा माझी गरिबाची सून होत नाहीं. अन् झाली तरी माझी त्याला कबुली नाहीं. ”

“ याचा अर्थ काय ? आई, तुझे हे कान कुणी भरवून दिले ? ” तिकडून आश्चर्यचकित होऊन विचारणें झालें, “ सरस्वतीबाई व गुणवंतराव यांच्या कळसूत्रीपणाचा धागादोरा एथपर्यंत येऊन पोंचला कीं काय ? ”

सासूबांईना तिकडच्या बोलण्याचा जास्तच राग आला. त्या म्हणाल्या, “ वयांत आलेल्या मुली बायका मिळूं लागल्या, कीं मुलगे आयांना विसरून त्यांच्या भजनीं लागतात हें मला माहीत आहे. त्याला तूं तरी अपवाद कसा निपजशील ! पण आतां काय त्याचें ? आतां अनायासें वैनी, हरिहरपंत व शारदाबाई चार दिवसांनीं इथें यायचींच आहेत. मुलगी त्यांची आहे; मला काय बोलायचें तें मी त्यांच्याशीं बोलेन. ” असें म्हणून सासूबाई निघून गेल्या.

कधीं नव्हत्याचे आज आपल्या मातृतुल्य भावी सासूबाईंशीं दोन शब्द बोलून आजपर्यंत त्यांचा माझ्याकडून जो उपमर्द झाला, त्याबद्दल त्यांची क्षमा मागावी, असा माझा इरादा होता. पण त्यांच्या जळफळाटानें माझ्या मनांतले मांडे मनांतच जिरले. मग मला खेद कां बरें होणार नाहीं !

ताईनें मला विचारलें, “ वैनी तुझ्यावर इतक्या रागावल्या तें तूं त्यांचें काय घोडें मारलेंस ? ”

पण मी खरोखरच कांहीं केलें नव्हतें. कांहीं अपराध न करतां न सवरतां

असें शासन भोगायची पाळी आली, तर कुणाच्या अंतःकरणाला पीळ पडल्याशिवाय राहील बरें ? मी ताईला म्हणाल्यें, " ताई, कांहीं असलें तरी त्या वडीलमाणूस आहेत. मी जाऊन त्यांच्या पायांवर डोकी ठेवून क्षमा मागत्यें. "

पण तिकडून सांगणें झालें, " मामी, सरस्वतीबाई व गुणवंतराव या दोन पिशाच्चांची बाधा आईला झालेली आहे. तिला यावेळीं मनोरमेसारख्या देवमाणसाची दयेची याचना कशी रुचेल !—मनोरमे, थांब. तूं आईकडे यावेळीं जाऊं नकोस. "

मीं ताईला भीतभीत विचारलें, " ताई, बाबाआई आल्यावर तीं ह्या लग्नांत कांहीं बिघाड आणतील का ? अन् त्या विघ्नाला सासूबाई पाठिंबा देतील का ? "

ताई चिंतामग्न स्वरानें उत्तरली, " देव जाणे काय होईल तें ! म्हाताऱ्या माणसांचा असाच हा लहरी स्वभाव—खरें ना निळकंठ ! "

मी म्हणाल्यें, " देव करोन् सासूबाईच्या शब्दांचा गुण न येवो. "

तिकडून मला व ताईलाहि धीर देऊन सांगणें झालें, " तुम्ही दोघेंहि शांत रहा. मनोरमे, तूं— मामी, तुम्ही— कुणीहि या कामीं घाबरण्याचें कारण नाहीं. आई माझी आहे, तिची समजूत मी घालीन. मी तिच्या पोटचा मुलगा झालों, तर तीनात्रिकाळ तिच्या पायांवर डोकी ठेवीन व तिनें दाखवून दिलेला सत्याचा मार्ग निरंतर अवलंबन करीन. पण तिच्या पोटचा मी मुलगा म्हणून ती कसल्या तरी गैरसमजानें बेभान होऊन कांहीं कारण नसतां माझ्या ओंठाला विषाचा पेला लावीत असली, तर तो मात्र मी कधींच पिणार नाहीं. कारण, मला भविष्यकाळाचा विचार आहे. आजच्या तिच्या चुकांना मत देऊन मी आत्मघात करून घेतला तर उद्यां ती शुद्धीवर आल्यावर आपल्या पोटच्या अर्भकाचा घात झाला म्हणून टाहो फोडूं लागेल, तो मातेचा शोक मी कसा सहन करूं ? "

" अन् बाबाच या लग्नाविरुद्ध आतां बोलूं लागले तर ? " मीं विचारलें.

ताई यावर उत्तरली, " भाऊंना वचनाला न फिरूं देण्याचें काम मी माझ्या शिरावर घेत्यें. त्यांनीं आमच्यावर एवढी जबाबदारी टाकली, ते आतां आमचा शब्द कवडीमोल ठरवतील कीं काय ? "

" कांहींही कर; पण ताई, एकदां आमच्या मस्तकावर तुम्हां सर्वांच्या हातच्या मंगलाक्षता पडेपर्यंत तरी तूं आमच्यावर कृपाछत्र उघडून धर. " मी ताईला हात जोडून विनवलें.

ताई म्हणाली, " आतां हा विषयच पुन्हां काढायचा नाहीं. "

मी म्हटलें, " बरें; मला नवे देशी कपडे घ्यायचे आहेत, ते नाना मला आणून देतील का ? तसेंच आजपासून मी हे विलायती काय किंवा देशी काय, भारी किंमतीचे कपडे वापरायचें सोडून दिलें आहे. "

ताईला ही थट्टाच वाटली. पण मीं सांगितलें, " ही थट्टा नव्हे, खरोखरच मला आज नवे देशी कपडे घ्यायचे आहेत. "

" मग तिकडे जाऊन विचार जा. " ताई म्हणाली.

" बरें " म्हणून मी खालीं कारखान्यांत गेल्यें, तों तो मेला राक्षस–गुणवंतराव–समोरच बसला होता. नाना आंत गेले होते. मला त्या मेल्याचें तोंड पहावेना, म्हणून मी बाहेरच दरवाजाला टेंकून रस्त्याकडे पहात उभी राहिल्यें. इतक्यांत नाना आले, ते मला बाहेर उभी पाहून विचारूं लागले, " मनू, तूं बाहेर उभी कां ? "

मी म्हणाल्यें, " जरा बाहेर या; तुमच्यापाशीं थोडें काम आहे. "

नाना बाहेर आले; पण त्यांच्यापाशीं हलक्या किंमतीचे कपडे विकत घेऊन मागायला मला लाज वाटली. मागें एकदां आम्ही सारीं ' स्वयंवर ' पहायला गेलों होतों तेव्हां बालगंधर्व नेसला होता त्या पेठेचें जरतारी लुगडें मला आवडलें, ताईलाहि आवडलें, आम्ही नानांपाशीं तसलीं लुगडीं मागितलीं व त्यांनीं तीं आम्हांला आणवून दिलींहि. ती हौसेची बाब होती. पण मी आतां सुताडे घेणार, यांत कसली आली आहे हौस असें मामा विचारतील, म्हणून मी त्यांना म्हटलें, " वर चला म्हणजे ताई काय तें बोलेल. "

नाना मुकाट्यानें वर आले. ताईनें त्यांना माझा उद्देश समजावून सांगितला व सांगतां सांगतां आमची मनमुराद थट्टाहि करून घेतली. नाना हंसून म्हणाले, " ताजें रक्त आहे म्हणून स्वदेश व स्वदेशी या गप्पा आठवतात. असले भिकारी कपडे आमच्याच्यानें कांहीं तुला देववणार नाहींत; तूं आपली निळकंठाबरोबरच जाऊन घे. "

मनांत म्हटलें, देवच पावला ! लगेच मी तिकडे बरोबर घेऊन कापडखरेदीला निघाल्यें. आम्हां दोघांना जातांना पाहून सासूबाई तिरस्कारानें तिकडे म्हणाल्या, "निळू, कितीहि बाईलवेडा बनलास तरी माझ्या जिवांत जीव आहे तोंवर मी मनोरमेशीं तुझें लग्न होऊं द्यायची नाहीं. "

मला या वेळीं आपल्या गळ्याची शपथ घालणें झाल्यानें कांहीं न बोलतां मी वाटेला लागल्यें.

*　　*　　*　　*

गिरगांवांतील एका महिला-वस्त्रभांडागारांतूनच आम्ही नेहमीं कापड घेत असूं. तें दुकान आमच्या पूर्ण ओळखीचें झालें होतें. त्या दुकानीं मी हलकीं लुगडीं व चोळ्यांचें हलकें कापड मागतांच नेहमींच्या रिवाजाप्रमाणें दुकानदारानें उंचींतलीं उंची इरकली, महेश्वरी लुगडीं व पांच रुपये वाराचें पोलक्याचें रेशमी कापड काढून माझ्यासमोर ठेवलें. मला आतां लाज वाटूं लागली कीं, गरिबीचे सुती कपडे मी ह्या दुकानीं कशी विकत घेऊं! शेवटीं मनाचा धडा करून स्वस्तांतलीं स्वस्त लुगडीं मागतांच आठ आठ रुपयांचे सोलापुरी सुताडे एकदांचे मिळाले. पोलक्यांचें हलक्या दराचें स्वदेशी कापड मागतांच दुकान-दार उत्तरला, " पांढरपेशांच्या बायका दणकट स्वदेशी मालाकडे डाव्या डोळ्यानें ढुंकूनहि पहात नाहींत, यामुळें स्वदेशी माल आम्ही दुकानांत ठेवीत नाहीं. "

होय नाहीं म्हणतां म्हणतां खादीचाच; पण सफाईदार असा पांढरा कपडा पोलक्यासाठीं आठ आणे वार दरानें मी विकत घेतला. ही आमची खरेदी दुकानाचे मालक कृष्णराव दुरून पहात होते. ते आमच्याशीं घरोब्यानें वागत. त्यांनीं मला विचारलें, " मनूताई, महागाई झाली म्हणून नोकरांचाकरांच्या कपडयालत्त्यांतहि काटकसर करायला शिकलां वाटतें ! "

कृष्णरावांना काय माहीत कीं, हे कपडे मोलकरणीसाठीं नसून धनिणीसाठीं आहेत म्हणून ! मी त्यांना म्हणाल्यें, " नोकरांचाकरांसाठीं नाहीं; माझ्या-साठींच हे कपडे आहेत ! "

तिकडच्या विक्षिप्त व कट्टा स्वदेशी स्वभाव कृष्णरावांना यापूर्वींच कर्णोपकर्णीं कळला होता. ते म्हणाले, " अस्सें अस्सें ! एकूण वृक्षाच्या सांवलीखालीं वेलीचा रंग इतक्या लौकर पालटला म्हणायचा ! "

कृष्णरावांना कांहीं उत्तर न देतांना मी कपडयांचे पैसे चुकते करून झाल्या-वर तिकडे हळूच म्हणाल्यें, " कपडे घ्यायला दुकानचा माणूस तरी घ्यावा, किंवा चार पैसे देऊन एक हेलकरी तरी करावा. "

" कां ? कपड्यांचें ओझें झालें का ? " मला विचारणें झालें.

"होय" मी उत्तरल्यें. खरोखरच मला हातांतला कपड्यांचा बोजा जड झाला होता. आजपर्यंत मी व ताई घरच्या गाडींतून येत असूं, व गाडींत कपडे टाकून घरीं नेत असूं. किंवा घरचा गडी बरोबर येत असे. निदान दुकानचा गडी तर कुठें गेला नाहीं! पण आज मी झाल्यें गरीब! मला ना गाडी; ना घोडा!

माझ्या ह्या श्रीमंती थाटाचा तिकडे राग आला. माझ्या हातांतले कपडे मुद्दाम आपल्या हातीं घेऊन मला वर टोमणा हाणण्यांत आला, "आजपर्यंत तुम्ही बाईसाहेबांच्या थाटानें घरच्या सत्तेच्या गड्याला बरोबर राबवलें; पण उद्यां माझीआपली जन्माची लग्नगांठ पडल्यावर माझें रंकाचें वैभव आपल्या ह्या श्रीमंतीला कसें पुरें पडेल? तेव्हां अर्थातच आपण तरी श्रीमंती सोडली पाहिजे एक, किंवा मला तरी आपला गुलाम बनलें पाहिजे एक! पण आपण तर श्रीमंती सोडायला तयार नाहीं; मग काय करणार! कपाळीं आलेली बायकोची गुलामगिरी आजपासूनच भोगतों झालें!"

हा रागाचा अवतार पाहून मी मेल्यापेक्षांहि मेली झाल्यें. कुठची झक् मारली व गड्याची गोष्ट काढलीसें मला होऊन गेलें. मी हातीं बोजा घेतल्यावर लोक हंसले नसते, इतके तिकडच्या हातीं बोजा पाहून हंसूं लागले. इतकेंच काय; पण 'हे शिष्ट लोकांना बाईलवेडे म्हणून हंसतात, सुधारकांच्या स्त्रैणपणाला नांवें ठेवतात व स्वतां मात्र बायकोचीं लुगडीं डोकीवर घेऊन हिंडतात' अशी खरमरीत टीकाहि रस्त्यानें जातांयेतां एकदोनदां ऐकण्याचें आमच्या कपाळीं आलें.

अंमळशानें गंभीर वृत्तीनें मला सुचवणें झालें, "गरिबांनीं श्रीमंतांच्या मुलींशीं लग्न केलें किंवा करण्याचा घाट घातला म्हणजे त्यांचें कसें हंसें होतें पहा."

त्या दिवसापासून कानाला खडा लावून घेतला. तो कपड्यांचा बोजा परत मागितला, तेव्हां तो मोठ्या मिनतवारीनें पुन्हां माझ्या हातीं मिळाला.

रस्त्यानें जातांना एक अठरा वर्षें वयाची ब्राह्मणाची स्त्री फाटक्या तुटक्या जुन्हेरानिशीं पिठाच्या गिरणींत दळण दळायला नेतांना आम्हीं पाहिली. तिकडे पहातांच ती लाजेनें अर्धमेली होऊन पदर सांवरूं लागली; पण जुन्हेराची चोहींकडून चाळण झाली असल्याकारणानें आंगावरच्या पदरा-आड तिची अब्रू सामावेना.

आम्हांला पाहून ती बिचारी गरीब स्त्री लाजेनें अर्धमेली झालेली पाहून

आम्ही मुद्दाम तिच्याकडे पाहिल्या न पाहिल्यासारखें करून रस्त्याच्या दुसऱ्या बाजूनें चालूं लागलों. चालतां चालतां मला विचारणें झालें, " ही बाई कोण तें तुला माहीत आहे का ? "

" नाहीं. कोण ती ? " मीं विचारलें.

" आपल्याकडे महाशब्दे मास्तर येतात ना, त्यांची ही बायको. ते आर्य-शिक्षण-मंडळाच्या पांगारवाडींतील इंग्रजी शाळेंत मास्तर असतात. "

" मग त्यांची बायको इतकी कंगाल कां ? " मीं विचारलें.

मला सांगणें झालें, " कंगाल नसेल तर काय करील बिचारी ? नवऱ्याला दरमहा सारा पस्तीस रुपये पगार मिळतो. ह्या पगारांत एकोणीसशें सत्रा सालापर्यंत त्यांना आंगभर जाडेंभरडें वस्त्र व दोन वेळां जाडेंभरडें अन्न मिळत असे. पण त्यानंतर लढाईमुळें सर्वच जिनसांची भयंकर महागाई झाली, तेव्हांपासून तीं नवराबायको एकवेळ जेवून सायंकाळीं उपास करतात. हें कुणाला सांगून खरेंहि वाटणार नाहीं. तरी नशीब त्यांचें कीं, देवानें त्यांना अजून एखादें मूलबाळ दिलें नाहीं. मनोरमे, असल्या गरीब अडल्यानडल्यांना प्रसंगीं हात-भार लावण्यांत जें सुख आहे, तें स्वतः चैन भोगण्यांत आहे का ? "

मी उत्तरल्यें, " नाहीं.—आज आपण कपडे घेतांना बरीच काटकसर केली आहे; त्या पैशांचें एक लुगडें व एक खण घ्यावा, व तो त्या बाईला द्यावा. "

" पण अशी उघड उघड मदत केली तर ती घ्यायला त्यांना लाज वाटेल ना ? " मला विचारणें झालें.

मी म्हणाल्यें, " खरेंच ! त्यापेक्षां आपल्या लग्नाच्या दिवशींच लग्नाच्या निमित्तानें त्यांना चोळीलुगडें द्यावें. "

" त्यापेक्षां तुझ्या लग्नाच्या दिवशींच तूं दे ! " हंसत हंसत मला उत्तर मिळालें.

मला पावलोपावलीं लाजवण्याची ही कला किती जन्मांची तिकडच्या आंगीं मुरली होती, परमेश्वर जाणे !

* * * *

म्हातारपण झाल्यामुळें सासूबाई पिकलें पान झाल्या होत्या. त्या ज्या एकदां तापाचें निमित्त होऊन आंथरुणाला खिळल्या, त्या दिवसेंदिवस जमि-नींतच चालल्या. त्या म्हणजे या दुखण्यांतून बऱ्या होतील, अशी कुणालाहि फारशी आशा नव्हती. त्यांच्या डोळ्यांदेखत तिकडच्या मस्तकावर अक्षता

पडाव्या, अशी सर्वांची इच्छा होती. त्यांचीहि इच्छा तशीच होती खरी; पण त्यांना यमुना सून पाहिजे होती. रोज सरस्वतीबाई याव्या, गुणवंतराव यावे, त्यांच्या बिछान्याशीं बसून त्यांनीं कांहीं खलबतें करावीं व जावें, असा प्रकार चालला होता. अशा स्थितींत नानांनीं आमच्या घरीं पत्रांवर पत्रें पाठवून बाबांची परवानगी मिळवली कीं, लग्न उरकून घ्या; रजा मिळत नसल्यामुळें मला येतां येत नाहीं.—बाबांच्या जबाबानें एक झालें; सरस्वतीबाई व गुणवंतराव यांचे चाळे थांबले. सासूबाईनाहि बोलायला तोंड नाहींसें झालें.

जांवईहि घरचाच व नवरीहि घरचीच, यामुळें विशेष गडबड न होतां लग्न-घरची तयारी झाली. चौघडा तासेवाजंत्रें बोलावायचीं नाहींत, आप्तेष्टांची गर्दी नको, असला तिकडचा चमत्कारिक हट्टाग्रह असल्याकारणानें आमचीं आम्हीच वऱ्हाडी व आमचीं आम्हीच वधूवरें होतों. नाइलाजास्तव आम्हां दोघांपैकीं कुणातरी एकाचें पुण्याहवाचन ठेवायला कोणी वडीलधारें माणूस पाहिजे होतें, यासाठींच केवळ माझ्या मामांना मुद्दाम पुण्याहून ताईनें बोलावलें. ते माझे मामाच खरे; पण ते मला माझ्या बाबांसारखे वाटत. मी त्यांची भाचीच खरी; पण माझ्या लग्नाच्या बाबतींत सख्खा बाप घेणार नाहीं, इतकी काळजी ते प्रारंभापासून घेत असत. मामींनींहि माझ्या जन्मदात्या आईची उणीव भरून काढली होती. त्या कधींकधीं वेळीं ताईवर रागावत; पण माझ्यावर कधींच रागावल्या नाहींत. तीं दोघें पुण्याहून आल्यावर आठवड्यानें लग्न ठरलें.

आतां पुण्याहवाचन कुणी कुणाचें ठेवावें, हा वाद निघाला. मी म्हणें, मी नानाताईंची मुलगी शोभणार, व तिकडचा हट्ट कीं, आपण मामामामींचा मुलगा म्हणून मिरवणार! नानांचा ओढा माझ्याकडे असला तरी ताईला वरमाय म्हणून मिरवायचें होतें. मी तर ताईला अगोदरच सांगून चुकल्यें होत्यें कीं, तूं माझी सासू म्हणून तुझ्या पायांशीं मी कधींच मस्तक नमवायची नाहीं. यावर ताईचा पण होता कीं, ती वरमाय होऊन मला नाक घांशीत आपल्या पायांशीं नमवणार!

मी ताईला विचारलें, "माझें पुण्याहवाचन मामामामींनीं ठेवलें व कन्यादानाच्या वेळीं तुला हात जोडायची पाळी त्यांच्यावर आली, तर ती तुला आवडेल ना?"

ताई तोऱ्यानें उत्तरली, "तें आवडेल कीं नाहीं, हा प्रश्न अगदीं निराळा; पण सून म्हणून माझ्या पुढ्यांत नाक घासतां घांसतां तुझ्या नाकाचा शेंडा झिजलेला पहाणें मात्र मला खास आवडेल."

" शेवटीं मी तोंड काढली कीं, देवाच्या नांवानें चिठ्या टांकाव्या. लगेच चिठ्या टांकून त्या लहानग्या कुंतलेनें उचलल्या, तों देवाच्या वाणीनेंहि मामीच वरमाय शोभली !

ह्या पुरुषांचा देव मुद्दाम पुरुषांच्या बाजूचा कौल देतो, म्हणून मी देवी जगदंबेच्या नांवाच्या चिठ्या घातल्या, तरीसुद्धां आपली ताईच वरमाय! मनांत म्हटलें कीं, ह्या देवदेवीहि प्रसंगीं चांगल्या माणसाच्या बाजूनें पक्षपात करतात!

हा कुंतलेचा हातगुण म्हणून मला तिचा संताप आला. पण असल्या शुभ प्रसंगीं संतापून उपयोगी नाहीं, म्हणून मी शांत झाल्यें. मामांनीं सर्वांना बजावून सांगितलें, " येत्या रविवारच्या मुहूर्तावर लग्न ठरलें बरें ! "

इतक्यांत कुंतला समोर येऊन थाड्कन् शिंकली. ती शिंक ऐकून माझें काळीज चर्रर झालें. डावी तारी उजवी मारी समोर करी घात,–आणि कुंतलाहि समोरच शिंकली !

इडा पिडा टळो, व अमंगळ दूर पळो! शकुन अपशकुन ह्या साऱ्या परमेश्वरी घटनेच्या छाया असतात. कुंतलेच्या शिंकेच्या रूपानें देवांनीं स्वर्गांतून आमच्या भविष्यकाळच्या संसारसुखावर अशक्यतेचा डोंगर तर कोसळून पाडला नसेल! कांहीं असलें तरी देवाचें अशुभ देवाच्या चरणीं वहावें या भावनेनें मी देवघरांत जाऊन तुपाचा दिवा लावला, व प्रार्थना केली, " हे आई जगदंबे ! माझ्या दैवीं कुठें अपयश असलें तर तें ह्या दिव्यावातीनें शोधून काढून त्याचा नायनाट कर, व आम्हां उभयतांचें जीवन मंगलमय होईल असा मला आशीर्वाद दे. "

आमच्या लग्नाचा दिवस नक्की ठरला ही बातमी सरस्वतीबाईंना दुसऱ्या दिवशीं कळली, तेव्हां त्या आमच्या घरीं सायंकाळच्या वेळीं येऊन मोठेपणानें सांगूं लागल्या , " हरिहरपंतांच्या सांगण्यावरून आम्ही मनोरमेला एक स्थळ पाहिलें आहे, व तें पसंत करण्यासाठीं त्यांना तारेनें बोलावलें आहे. "

मी मनांत चूर होऊन भवितव्यतेला विचारलें, 'भवितव्यते, कुंतलेच्या शिंकेचा अपशकून सरस्वतीबाईंच्या वाणीनेंच माझ्या पाठीला लागणार कीं काय ? "



# आठवी झुळुक

## लीला (२)

मनोरमा, लीला, यमुना, अनंत, नीळकंठ–जो उठला तो माझ्या हिताचा माणूस मला म्हणतो, लीले, तूं गुणवंतरावांच्या फेऱ्यांत सांपडलीस, हाच तुझा अधःपात झाला.

लोकांप्रमाणें माझें मलाहि दिवसेंदिवस असेंच वाटूं लागलें कीं, गुणवंतरावांच्या संगतींत माझा अधःपात होत आहे. जसा पारा सोनें खाऊन टाकतो, तसें माझें शील गुणवंतरावांनीं खाऊन टाकलें होतें. पण हंसणारीं सगळीं असलीं तरी पोसणारे एकटे गुणवंतरावच ना!

एकदां शारदाबाईंचा–गुणवंतरावांच्या बायकोचा श्यामसुंदर आपल्या आईवर रागावून माझ्यापाशीं आला व मला म्हणूं लागला, "माई, आजपासून मी तुला आई म्हणेन बरें! मात्र तुझा बिंबाधर माझ्या बाबांच्या मांडीवर बसतां उपयोगी नाहीं. मी मग रुसेन!–मी तुला आई म्हणेन; पण बाबा तुला काय म्हणतील ग? बाबांची तूं कोण ग? आईची तूं कोण ग?"

मीं मनांत म्हटलें, किती बोलका आहे गुलाम! जिभेवर नक्षत्र पडलें आहे जसें कांहीं! मी कांहीं बोलत नाहीं असें पाहून त्या लबाडानें मला पुन्हां विचारलें, "बाबांची तूं कोण ग? आई तुझी कोण ग? सांग ना?"

यावर मी उत्तर काय देणार! मी श्यामसुंदराच्या श्यामसुंदर तोंडाचा गोडसा एक पापा घेतला व त्याला खेळायला लावून दिलें. लहान मुलांच्या वाणीनें परमेश्वर बोलत असतो, त्यांच्याशीं हंसत खिदळत असतो, तीं एकटीं नाचतात, बागडतात, तेव्हां त्यांच्याशीं नाचत बागडत असतो, असें म्हणतात. श्यामसुंदराच्या मुखानेंहि हा परमेश्वरच बोलत असेल का! तो मला 'आई आई' म्हणून हांका मारतो, हें त्याला परमेश्वरच शिकवीत असेल का! 'बिंबाधराला आपल्या बाबांच्या मांडीवर बसूं द्यायचा नाहीं बरें!' ही श्यामसुंदराची भाऊबंदकी म्हणजे परमेश्वरी घटनासूत्राला भविष्यकाळीं दिली जाणारी एखादी खरीखुरी ब्रह्मगांठ तर नसेल! मला वाटतें, हा श्यामसुंदर जन्माला येण्यापूर्वी वायुरूप दिव्य देहानें ब्रह्मलोकीं वास करीत होता, तेव्हां त्यानें ब्रह्मदेवाच्या घरीं

माझ्या जन्माची चाललेली वाटाघाट ऐकली असली पाहिजे; तीच तो आतां ह्या बालस्वरूपांत तोंडपाठ म्हणून दाखवतो. तो मला आई म्हणतो, 'तूं बाबांची कोण ग ?' हा नाजुक पण हृदयाला घरें पाडणारा प्रश्न त्यानें मला विचारला, हा त्याच्या तोंडून परमेश्वरच बोलला. ह्या वाणीच्या गुंतागुंतींत माझ्या दैवाची दोरी गुणवंतरावांच्या दैवाच्या दोरीशीं कुठें तरी, कशी तरी, केव्हां तरी गांटली गेली असली पाहिजे खास ! ती गांठ शोधून काढावी, त्या सुताच्या आधारानें गुणवंतरावांच्या नांवानें तरी सौभाग्याचा स्वर्ग गांठत आला तर पहावा, असें मला वाटूं लागलें. शारदा आंथरुणाला खिळलेली होती, ती एकदांचीं निजधामाला जावी व आमच्या पुनर्विवाहाच्या वाटेंत तिच्या लग्नाचा आंधारीआंधार मुसमुसून राहिला आहे तो दूर व्हावा, अशी देवाला मी नित्य हात जोडून विनवीत होत्यें. मग मी प्रेमाच्या तेलवातीनें गुणवंतराव व शारदा ह्यांच्या दैवाची गुंतागुंत शोधीन, त्या गुंतवळ्यांत आमची लग्नगांठ वसली असली तर ती पाहीन, बसली नसली तर ती मारीन. मग गुणवंतराव, मी तुमची कोण होईन बरें ? बाळ बिंबाधर, मग तुझे बाबा कोण होतील बरें ? श्यामसुंदर, माझा बिंबाधर मग त्यांच्या मांडीवर हक्कानें खेळूं लागला तर तूं रुसून बसशील का ? तूं रुसलास तरी मी तुझी आई होईन, तुला हंसवीन, तुला खेळवीन, तूं सवतीचा म्हणून कांहीं तुला पाण्यांत पाह्यची नाहीं, असे विचार श्यामसुंदराचे बोबडे बोल ऐकून माझ्या मनांत घोळूं लागले.

आज जी मी शारदेचीं मुलें खेळवीत बसल्यें होत्यें, तीच—देवदया होऊन मला गुणवंतरावांनीं पदरांत घेतली, व त्यांच्या संगतींत लाभणारें संसारसुख भोगतां भोगतां माझ्या उदरीं जन्माला येणारीं मुलें खेळवीत बसल्यें, तर मी लेंकुरवाळी किती छान दिसेन ! गुणवंतरावांनाहि मी आवडत होत्यें. आतांशा माझ्याशीं ते कांहीं तितक्या सज्जनतेनें वागत नव्हते. मीच माझें शील आपलें कसें-बसें सांभाळीत होत्यें झालें. अशा स्थितींत माझें शील व त्यांची सज्जनता टिकायला एकच उपाय होता; तो हाच कीं, आम्हीं पुनर्विवाह करावा.

*  *  *  *

गुणवंतराव ह्या गोष्टीला कबूल होते. पण सरस्वतीबाई आतांशा माझा दुष्टावा करूं लागल्या होत्या. त्यांची इच्छा होती कीं, शारदा तर मरावी; पण माझा तर गुणवंतरावांशीं पुनर्विवाह होऊं नये. मग खुशाल तिकडे गांवीं एक

कुंकवाचा आधार बसला आहे, त्याच्या नांवावर इकडे मन मानेल तसे धिंगाणे घालतां येतील. पण असला सैतानी अभिमान देवाला कधीं सहन होत नसतो. असा अभिमान सरस्वतीबाईंना झाला मात्र; तों लगेच त्यांच्या अभिमानाचा मनोरा देवानें एका लाथेसरसा कोसळून पाडला.

आज पंधरा दिवस एकसारख्या आजारी म्हणून सरस्वतीबाई आंथरुणाला खिळल्या होत्या. तोंडानें तर सांगत, कीं, रोग झाला; पण तोंडावर तर इतक टवटवी दिसे कीं, त्यामुळें त्यांचा चेहरा उलटा खुलून दिसे. असला तजेल गरभारशा बायकांच्या गालांवर मात्र उजळतो असें म्हणतात. तेंच शेवटीं खरें ठरलें, व सरस्वतीबाईंची प्रकृति तपासायला आलेल्या एका डॉक्टरीणबाईंनीं आम्हांला सांगितलें कीं, हा रोगबीग कांहीं नव्हे; ह्या बाई गरभारशा आहेत. लेंकुरवाळ्या बायकोला गरभारपण कधीं तरी नकोसें होईल ! पण सरस्वतीबाईंना मात्र तें नकोसें झालें. कां तें त्यांचें त्यांना माहीत !

सरस्वतीबाई गरभारशा आहेत, ही गोष्ट कळतां कळतां त्यांच्या गांवीं दिनकररावांनाहि कळली. इकडून गुणवंतरावांनींहि त्यांना पत्र पाठवलें कीं, ती. सौ. सरस्वती वैनींना बाळंतपणाला तिकडे पाठवून देतों. पण दुर्दैव बिचाऱ्यांचें ! त्यांना दिनकररावांचें उलट टपालीं पत्र आलें, त्यांत त्यांनीं स्पष्ट लिहून सोडलें कीं, " आपलें पत्र पोंचलें. सौभाग्यवतीशीं गेलीं तीन वर्षें माझा ब्रह्मचाऱ्याच्या नात्याचा संबंध आहे, हें आपल्याला व तिलाहि माहीत आहे. असें असतांहि आमची अब्रू आम्हांला सांभाळणें आहे. यास्तव आपल्या पापांवर पांघरूण घालणें आपल्याला इष्ट वाटत असेल तर आपल्या कारखान्यांतलें विष देऊन तिला खुशाल ठार मारून टाकवी. मी त्याविषयीं मुळींच वाचाविटाळ करणार नाहीं. "

ह्या पत्राचा बभ्रा झाला नाहीं, तरी आम्हांला तेवढेंच वर्म सांपडलें. अशा कात्रींत सरस्वतीबाई सांपडल्या, तेव्हां त्यांना मी मुद्दाम विचारलें, " सरस्वतीबाई, मी गुणवंतरावांशीं पुनर्विवाह करूं किंवा नको ? "

" करा. " सरस्वतीबाई उत्तरल्या.

" तुम्हीं गुणवंतरावांना तशी संमति द्याल ? " मीं विचारलें.

" हो ! देईन. " त्या म्हणाल्या. त्या संमति न देतील तर काय करतील ! अब्रूनिशीं त्यांचें बाळंतपण आतां मलाच पार पाडायचें होतें !

आतां आमच्या पुनर्विवाहाच्या बाबतींत जर कोणती मुख्य अडचण असेल तर ती शारदा. कारण, मनांत कांहीं असलें तरी जनलज्जेसाठीं गुणवंतरावांना पहिली बायको जिवंत असतां पुनर्विवाह करतां येत नव्हता. पण दुखण्यांतच शारदा एकदांची मरती, म्हणजे तीहि सुटली असती आणि मीहि सुटल्यें असत्यें.

मनोरमेवर गुणवंतरावांचा डोळा होता; पण त्यांत कांहीं अर्थ नव्हता. मनोरमा व निळकंठ यांचें लग्न केव्हांचें ठरलेलें होतें, तें आणखी आठां दिवशीं व्हायचेंहि होतें. सरस्वतीबाई तर आपल्या मतें मनोरमेचें लग्न मोडण्याची शिकस्त करीत होत्या, अशा वारेवातम्या रोज माझ्या कानीं येत. त्यांचा उद्देश हा कीं, मग आपली यमुना निळकंठांना देतां येईल. याला आधार काय, तर म्हणे राधाबाईनीं–निळकंठरावांच्या आईनें त्यांना तसें वचन दिलें होतें! पण केवळ आईच्या लहरीप्रमाणें अनुरूप वधूला लाथाडून दुसऱ्या एखाद्या मुलीशीं लग्न करायला निळकंठ बोंडल्यानेंच दूध पीत होते जसें कांहीं! मी सरस्वती-बाईंना एकदोन वेळां स्पष्ट सांगितलेंसुद्धां कीं, तुम्ही म्हणतां तसले या फुला-वरून त्या फुलावर उडणाऱ्या फुलपांखरासारखे निळकंठ नाहींत, आणि मनोरमाहि त्यांच्या सहवासानें अलीकडे थेट त्यांच्यासारखी बनली आहे. त्या दोघांची तर म्हणे अशी प्रतिज्ञाहि होती कीं, एकपत्नीव्रत व एकपतिव्रत याचा धडा आपण रामसीतेपेक्षांहि विशेष उज्ज्वलतेनें समाजाला घालून देणार.

खरोखरच निळकंठ-मनोरमेचें एकमेकांवर तसें अकृत्रिम प्रेम होतें. त्यांच्या मित्रमैत्रिणींत नेहमीं त्यांची प्रशंसा होई व आदर्श वधूवरें म्हणून त्या दोघांचा गौरव करण्यांत सर्वांना धन्यता वाटे.

माझ्या पापांवर पांघरूण घालण्यासाठीं म्हणून मधून मधून मला निळकंठराव, मनोरमा, अनंत यांच्याविरुद्ध वागावें लागे. पण माझें काय! मी आतां एक जन्मां-तून उठलेली कपाळकरंटी बाई आहें, असेंच मनाशीं समजें. नर्कांतल्या किड्यांना जसा नर्काचा कंटाळा येत नाहीं, तसा आम्हां पापी माणसांनाहि हळूहळू पापाचा कंटाळा येईनासा होतो. ही स्वतांच्या पापांची पुरी इमारत बांधण्या-साठीं पुण्यवंत जीवांच्या दैवाचे खडक फोडून दगड गोळा करायचे, हा आसुरी न्याय मला मान्य नव्हता, म्हणूनच मी गुणवंतरावांना परोपरीनें हात जोडून विनवीत असें कीं, कांहींहि करा; पण निळकंठ-मनोरमा ह्या लक्ष्मीनारायणाच्या जोड्याला किंवा अनंतांसारख्या तरुण योगिराजांना एका शब्दानेंहि दुखवूं नका.

पण ते कसले माझ्या शब्दाला मान देतात! त्यांनीं उलट माझ्यापासून वचन घेतलें कीं, तसाच प्रसंग पडला तर त्यांच्या कृष्ण कारस्थानांत मला भाग घ्यावा लागेल व मी तो घेईन !

पापाचरणाच्या डोकीवर हा आणखी एक नव्या पापाचा डोंगर! पण करणार काय ! एकवार बदलौकिक झालेल्या माझ्यासारख्या फुटक्या कपाळाच्या विधवेला बेअब्रूंतून अब्रूची वाट शोधायची झाली तर ती अशीच वांकड्या चालीनें शोधावी लागते. याचें पाप व पुण्य मेल्यागेल्यावर पुढच्या जन्मीं पाहतां येईल, असा विचार करून मीं गुणवंतरावांना होकार दिला.



# नववी झुळुक

## राधा (२)

माझ्या उशाजवळ काळोखांत कोणीतरी येऊन बसल्याचा मला भास झाला. मीं विचारलें, " कोण आहे तें ? "

वैनी उत्तरली, " वन्सें, हरिहरपंत–मनोरमेचे वडील आले आहेत. "

हरिहरपंतांचें नांव घेतल्याबरोबर माझ्या आंगाचा तिळपापड झाला. मीं रागाच्या भरांत कण्हत कण्हत हरिहरपंतांना विचारलें, " हरिहरपंत, माझ्या मुलावर तुम्ही इतके उदार कसे हो झालां ? का जांवयाला ठार मारायचें वेड कऱ्हाड्यांत आहे असा कऱ्हाड्यांच्या नांवाला डाग आहे, तो खरोखरीच तुमच्या वंशाला शोभणारा आहे ? "

हरिहरपंतांनीं आश्चर्यचकित होऊन विचारलें, " काकू, याचा अर्थ काय ? "

" त्याचा अर्थ तोच. तुमच्या मुलीला मंगळ असतांना तिची पत्रिका लपवून तुम्ही ती मुलगी माझ्या मुलाला देऊं केलीत, तो माझ्या मुलाला ठार मारायचा तुमचा विचार होता कीं काय ? अशानें माझें कपाळ फुटलें असतें हें तर खरेंच; पण तुमची मुलगी विधवा झालेली तुमच्या डोळ्यांनातरी सुखासुखीं पाहवली असती का ? "

हरिहरपंतांनीं विचारलें, " पण माझ्या मुलीला मंगळ आहे, हें तुम्हांला कोणीं सांगितलें ? वीणे, तूं का ? "

" नाहीं. आमच्याकडे मुळीं मनूची पत्रिकाच नाहीं; मग आम्ही मंगळ आहे कीं नाहीं तें काय सांगणार ? " वैनी म्हणाली.

मी सरस्वतीबाईचें नांव घेणार होत्यें, इतक्यांत सरस्वतीबाईच यमुनेला घेऊन त्या ठिकाणीं आल्या. मी त्यांना सर्वांसमक्ष विचारलें, " सरस्वतीबाई, मनोरमेला मंगळ आहे ना ? "

" होय. असें आमचे गुणवंतभावजी म्हणतात. " सरस्वतीबाई उत्तरल्या.

वैनीनें विचारलें, " ते कशावरून म्हणताल ? "

सरस्वतीबाई म्हणाल्या, " थोड्या दिवसांपूर्वीं गुणवंतभावजींसाठीं आम्ही मनोरमेची चौकशी यांच्यापाशीं केली होती–खरें ना हो हरिहरपंत ? "

" होय. " हरिहरपंत उत्तरले.

" त्या वेळीं यांनीं तिची जन्मतारीख आम्हांला कळवली. त्या तारखेवरून त्या सालचें पंचांग पाहून आम्ही तिची पत्रिका तयार करून पाहिली, तों तिला मंगळ आहे व भावजींनाहि मंगळ आहे. " असें दिसून आलें.

हरिहरपंत जरा रागानेंच सरस्वतीबाईंना म्हणाले, " सरस्वतीबाई, ती कांहीं मनोरमेची खरी जन्मतारीख नव्हती. ती ठोकळ मानाची सुमार महिनातारीख फक्त मुलीचें वय कळावें म्हणून मीं कळवली होती. मनोरमेचें टिपण माझ्यापाशीं होतें, तें कुठें हरवलें. पण मला पक्कें माहीत आहे कीं, माझ्या मुलीला मंगळ नाहीं. "

" होय का ! मग आमचीच चूक झाली तर ! " सरस्वतीबाई म्हणाल्या.

यमुना म्हणाली, " आणि असला परता मनोरमेला मंगळ, तरी हरिहरपंत, निळकंठांच्या जन्माशीं तिची जन्मगांठ पडणार ! पुण्यवंत ते, त्यांना हो कसली आली आहे मंगळाची बाधा ? ज्यांच्या सान्निध्यांत मातीचें सोनें व अमंगळाचें मंगळ होण्यासारखें आहे, त्यांच्या छायेखालीं त्यांच्या सहचारिणीचे अशुभ पापी ग्रहहि पुण्यवंतच बनतील. "

" तो प्रश्न तुझा नाहीं बरें यमू, तूं गप्प रहा. " सरस्वतीबाईंनीं यमुनेला दटावलें. यमुनेच्या ह्या शब्दांवरून मला एक लाखांतली गोष्ट कळली ती हीच कीं, मनोरमेचें निळूवर प्रेम आहे, तसेंच यमूचेंहि आहे.

वैनींच्या मागोमाग मामा, मामी व वैनीची आई येऊन उभीं राहिलीं. हें मंगळाचें गूढ उकललेलें पाहून त्यांच्याहि जिवाला समाधान वाटलें. कारण मनोरमा आमच्याच घरीं पडावी, अशी त्यांची मनापासूनची इच्छा होती. पण मला ती सून नको होती. मामांनीं हरिहरपंतांना विचारलें, " आतां तरी पंत, एकदां निश्चित काय तें सांगा. तुमची मुलगी तुम्ही निळकंठालाच देणार ना ? "

मी मनांत म्हणाल्यें, माझ्या मुलाच्या लग्नाची यांना कां इतकी उठाठेव ? वैनीसुद्धां जी इतकी निळकंठाला मनोरमा द्यायला झटत होती, याचें कारण घरांत ती एकटी होती. तशांत ती पुऱ्या महिन्यांची गरभार होती. तिला तरी हाताखालीं हातधोंडा म्हणून कोणी कळवळ्याचें माणूस पाहिजेच होतें. तिला आशा होती कीं, मनोरमा माझी सून झाली कीं, अनायासें घरांतली घरांत राहील. तीच ती दुसऱ्याची बायको झाली असती, म्हणजे वैनीकडे कांहीं राहिली नसती.

पण मला मात्र श्रीमंताची मुलगी माझ्या मुलाला करायचीच नव्हती. मीं साफ सांगितलें, " हरिहरपंत, नवऱ्यामुलाच्या जन्मदात्या आईच्या शब्दाला कांहीं मान द्यायचा असेल, तर माझ्या मुलाला जांवई करून घेण्याच्या भानगडींत तुम्ही पडूं नका. "

निळकंठ माझ्या उशागत बसून हें सारें ऐकत होता. यमुना त्याच्यासमोरच उभी होती. त्या दोघांचाहि चेहरा गोरामोरा झालेला मला दिसला.

हरिहरपंत उत्तरले, " राधाकाकू, माझेंहि तसेंच मत आहे. एकंदर परिस्थितीचा विचार करतां माझी मुलगी तुमच्या घरीं पडणें श्रेयस्कर नाहीं, असेंच माझें ठाम मत आहे. मी आजपर्यंत वीणेला, मामांना व नानासाहेबांना किती तरी पत्रें पाठवून हेंच सांगत आलों कीं, तुमचा नवरामुलगा निळकंठ लाख माणूस असला तरी त्याच्या एकंदर वागणुकीवरून तो एकलकोंडा, बिनहौशी व निर्विलासी मुलगा दिसतो. मला स्वतांला ह्या गोष्टींचा मनापासून तिट्कारा आहे व माझी मुलगीहि माझ्याच स्वभावाची आहे.—"

वैनी मध्येंच म्हणाली, " पण हरिहरपंत, तुमची मुलगी आतां पुरी निळकंठाच्या वृत्तीची बनत चालली आहे. "

" असली तरी एव्हांपासूनच तिच्या मनावर निळकंठरावांसारख्या तत्वप्रधान पतीच्या वेडगळ तात्विक विचारांचा पगडा बसतां उपयोगी नाहीं. तीहि कदाचित् आपल्या नवऱ्याप्रमाणेंच तत्त्वांनीं वागतां वागतां क्रमाक्रमानें निराशावादी बनत जाईल. मी तर स्वतां आशावादी आहें. अशा स्थितींत माझ्या मुलीचा संसार सुखाचा कसा होईल, याची काळजी मला घेतली पाहिजे. निळकंठराव, मला क्षमा करा, मी तुमच्या मतांवर टीका करतों असें नाहीं; मला वाटतें तें मी बोलतों. "

वैनी म्हणाली, " सुदैवानें मनू बाहेर गेली आहे. ती असती तर हा प्रकार ऐकून घेरी येऊन पडली असती. "

निळकंठाला काय वाटलें कोण जाणे, तो एक-दोन-तीन दीर्घ उसासे सोडून बाहेर निघून गेला. मी हरिहरपंतांना स्पष्ट सांगितलें, " हरिहरपंत, तुमचा इंग्रजीचा बोलबाला व प्रवृत्ति-निवृत्तीचा गलबला मला कांहीं समजत नाहीं. —आणि हा वाद पाहिजे कशाला पण ? तुम्हांला तुमची मुलगी माझ्या मुलाला द्यायची नाहीं व मलाहि ती सून करायची नाहीं. "

वैनी हरिहरपंतांना म्हणाली, " भाऊ, माझें ऐका व मनोरमा निळकंठालाच द्या. ह्या मतांच्या अडचणीशिवाय दुसरी कांहीं अडचण तुम्हांला असली तर मात्र मला सांगा. "

हरिहरपंत म्हणाले, " दुसरी अडचण तूं विचारतेस म्हणून स्पष्टच सांगतों, वीणे, माझ्या मुलीला जो तूं इतका अठरा विश्वे दारिद्र्याचा धनी नवरा शोधून काढलास, तो तिचा कुणी पहाणारा नाहीं, म्हणून कीं काय ? "

मामा म्हणाले, " वीणे, मुलगी आपली नाहीं; मुलगी त्यांची आहे. तिच्या जन्माची पाहिजे तशी वाट लावायला ते मुखत्यार आहेत. आम्हांला केलेल्या मेहेनतीबद्दल शेलापागोटें मिळालें एवढें पुष्कळ झालें, तूं आंत चल. "

" कांहींहि करा; पण सोन्यासारख्या पोरींच्या जन्माचें मातेरें करूं नका. " असें सांगून वैनी, मामा व काकू आंत गेल्या.

सरस्वतीबाईनीं हरिहरपंतांना विचारलें, " तुमच्या मनोरमेसाठीं मी एक स्थळ पाहिलें आहे. देणार तर आमच्या भावजींना द्या, किंवा दुसराहि एक मुलगा आहे. तें स्थळ पाह्यला आज येणार का ? "

" नको. " हरिहरपंत उत्तरले, " मी येतां येतां पुण्यांतच एक मुलगा पाहिला आहे, त्या ठिकाणीं बहुधा जमेलसें वाटतें. मुलगा आमच्या पहाण्यांतलाच आहे. "

मी म्हणाल्यें, " देव पावला. तुमच्या मुलींचें सोन्याहून पिवळें होवो. "

हरिहरपंत निघून गेल्यावर मी सरस्वतीबाईना विचारलें, " सरस्वतीबाई, तुमच्या डोळ्यांदेखतच मनोरमेचें लग्न मोडलें. आतां तुमच्या मनाप्रमाणें लग्नाचा योग कधीं जुळवून आणणार ? "

" तुम्ही सांगाल त्यावेळीं. " सरस्वतीबाई उत्तरल्या.

मी म्हणाल्यें, " ह्या दुखण्यांतून माझे आतां जास्त दिवस निभतील असें कांहीं मला वाटत नाहीं. पण माझ्या हातून माझ्या सुनेच्या कपाळावर अक्षता पडाव्या, असा तर माझा मानस आहे. यासाठीं ठरलेल्या मुहूर्तावरच एकदांचें कार्य उरकून घ्या ना ? "

" मी आजहि पाहिजे तर तयार आहें. पण निळकंठ तयार झाले पाहिजेत ना ? " सरस्वतीबाईनीं विचारलें.

मी म्हणाल्यें, " नीळकंठ माझा सत्तेचा मुलगा आहे. तो काय, लग्नाला

उभा रहा म्हटल्याबरोबर उभा राहील. त्याच्यासारखा आज्ञाधारक व प्रेमळ मुलगा तुम्हांला साऱ्या त्रिखंडांत दुसरा सांपडायचा नाहीं."

"बरें; वीणा, नानासाहेब यांच्या मताचें काय ?"

"त्यांच्या मताचें काय ? माझा मुलगा; मी त्याचें लग्न करणार. तीं मानलें तर मानून घेतील, नाहीं तर गप्प बसतील." मी म्हणाल्यें.

"बरें तर. मग येत्या–परवांच्या मुहूर्तावरच कार्य आटोपून घ्यायचें." असें म्हणून सरस्वतीबाईनीं यमुनेला सांगितलें, "यमू, आपल्या सासूबाईच्या पायां पड."

यमुनेनें लाजत लाजत मला नमस्कार केला, व मी तिला 'जन्मसावित्री हो' असा आशीर्वाद दिला.



# झुळुक दहावी

## यमुना (२)

पुन्हां पुन्हां दोन्ही कोंपरांपासून हात जोडून माझी सर्वांना विनंति आहे कीं, माझ्या पापी आईच्या नांवावरून मला कुणी ओळखूं नका. आईच्या सांगण्याप्रमाणें मी राधाबाईंना नमस्कार केला; पण तो त्या माझ्या भावी सासूबाई म्हणून केला असें कोणी म्हणेल, तर तसें मात्र नाहीं हो ! मनोरमा माझी जिव्हाळ्याची मैत्रीण आहे, व निळकंठ जीवाभावानें तिला वाहिलेले आहेत. त्यांचे पाय त्यांची अर्धांगी या नात्यानें चुरतां यावे, अशी इच्छा मला करावीशी वाटे, तोंच माझी सदसद्विवेक बुद्धि मला विचारी, तूं मनोरमेची सवत होऊन तिच्या जन्माचें वाटोळें करणार कीं काय ?—नको, नको ग बाई ! त्या लक्ष्मीनारायणाच्या जोडप्यावरून मी माझ्या पंचप्राणांची ओंवाळणी काढीन; पण त्यांच्यांत बिघाड कधींच आणायची नाहीं.

राधाबाई हें जग सोडून जाण्यापूर्वी एकदां मनोरमा माझ्याकडे आली, व तिनें अनंतरावांचा नकार भीतभीत माझ्या कानीं सांगितला. त्या वेळीं खरेंच सांगत्यें, जितकें मनोरमेला वाईट वाटलें, तितकें कांहीं मला वाईट वाटलें नाहीं. निळकंठांनीं मला एक गुरुमंत्र शिकवला होता कीं, सत्याला नेहमीं परमेश्वराचा पाठिंबा असतो. ह्या त्यांच्या अमोल संजीवनीमंत्रावर माझा सोळा आणे विश्वास असल्यानें अपयशाची प्रत्येक गोष्ट मी प्रथम या कसोटीला उतरतेशी पाहीं, व ती हटकून असत्य ठरे. अनंतांनीं मला पदरांत घेण्याचें नाकबूल केलें, अर्थात् माझ्या–पायांखालींच असत्य किंवा दुजाभाव (Insincerity) याचें पाणी मुरत असलें पाहिजे, अशी माझी खात्री झाली. आणि पुण्यमय नव्या विचारांच्या नव्या पुण्यप्रकाशांत मी माझें मन शोधूं लागल्यें तों खरेंच !— अनंतांना मी आत्मार्पण करायला निघाल्यें खरी; पण ह्या माझ्या विचाराला सत्याचें पाठबळ नव्हतें. माझ्या आईनें माझ्याच अंतःकरणांत निळकंठांविषयीं पतिभाव जागृत करून दिल्या दिवसापासून माझें मन त्या सार्वभौम सम्राटांचें साम्राज्य बनलें होतें. माझ्या मनाची मी राणी असल्यें तरी सम्राट्-सत्ता मोडून माझ्या मनाच्या सरहद्दींत मी परदेशच्या पाहुण्याला संसाराच्या फौज-

फांव्यानिशीं कसा रिघाव देऊं ! मी पुन्हां पुन्हां विचार करून पाहिला, निळकंठांइतकें अकृत्रिम प्रेम अनंतांवर मला करतां येईल का ! —नाहीं. मग अशा पुरुषाला संसाराचा सांगाती करणें, हा देखत भुलीचा व्यभिचारच नव्हे का ? —म्हणूनच अनंतांनीं मला नकार दिला असावा !

आणि अनंत कदाचित् माझा स्वीकार करायला तयार झाले असते, तरी आतां मी त्यांना नाहीं म्हणून साफ सांगितलें असतें. कां नाहीं याचा अर्थ काय ? बस्स ! आम्हांला तुम्ही नाहीं आवडत ! आम्हांला निळकंठच आवडतात ! हा मनाचा हट्ट आहे; त्याला विरोध कोण करणार !

अनंतांनीं मला नकार दिला याचें कारण, तेहि निळकंठांचे शिष्य होते. सत्याला परमेश्वरी साह्याचा पाठिंबा असतो, हा गुरुमंत्र त्यांनाहि मिळाला होता. त्या सत्याला स्मरून ते आपल्या अंतःकरणांत मला वाव आहेसा शोधून पाहूं लागले असतील, व त्यांना मनोरमेची आठवण झाली असेल. अनंतराव एकवार आपल्या अंतःकरणाचें उदक मनोरमेच्या नांवानें सोडून बसले होते. त्या वचनाला ते जागले, म्हणूनच त्यांना माझा स्वीकार करतां आला नाहीं. शाबास ! असावीं तर अशीं सत्यवचनी माणसें जगांत असावीं. नाहीं तर आहे आपली तेहतीस कोटि लोकसंख्या !

निळकंठ ही मनोरमेची सौभाग्यदेवता असतांना निळकंठांना मीं माझे सौभाग्यदेव मानणें, हें जनदृष्ट्या गौण व मनोरमेलाहि न रुचणारें होतें. यासाठीं या गहन गूढाचा उलगडा न होऊं देण्याची जबाबदारी माझ्या शिरावर होती. या वेळीं जग मला विचारील, दुर्लभ वस्तूचा लाभ होत नाहीं म्हणून तेवढ्यासाठीं जन्मभर संसार व सौभाग्य यांच्यावर पाणी सोडणें ही गोष्ट कशीशीच नाहीं का ! पण मी असें विचारत्यें, यांत विचित्र तें काय झालें ! एखादें जागृत दैवत असलें, कीं कैक भाविक लोक त्या दैवतावर ओंजळी ओंजळी फुलें उधळून त्याला नमस्कार करून प्रार्थीत असतात कीं, देवा, नवसाला पाव ! त्या भाविकांच्या ओंजळींतलीं कांहीं फुलें देवाच्या डोक्यावर पडतात, कांहीं पायांवर पडतात व कांहीं देवाचा स्पर्श न होतां जमिनीवरच पडतात. ज्या फुलांना देवाचा स्पर्श होतो, त्याचें सार्थक–सोनें होतें, व जीं जमिनीवर पडतात तीं निर्माल्यवत् होऊन लोकांच्या पायांखालीं तुडवलीं जातात. म्हणून काय भाविकांनीं देवावर फुलें उधळूंच नयेत ! निळकंठ हें माझें जागतें दैवत

आहे, त्या दैवताची पूजा करण्यासाठीं मी माझें हृदयकमल त्यांच्या चरणीं उधळलें. तें त्यांच्या चरणीं न पडतां जमिनीवर पडून फुकट गेलें तर त्यांत त्यांचा तरी काय दोष, किंवा माझा तरी काय दोष !

* * * *

ज्या दिवशीं हरिहरपंतांनीं राधाकाकूंच्या समोर निळकंठांना मनोरमा द्यायचें नाकबूल केलें, त्या दिवशीं मनोरमा आमच्याच शेजारीं आपल्या चुलत-आतेच्या घरीं हळदीकुंकवाला गेली होती. माझ्या आईच्या विजवट्या स्वभावामुळें मनोरमेची आत्या व तिची मुलगीहि आमच्याशीं बोलत नसे. हें आईचें पाप पाळायचें, म्हणून मी त्या दिवशीं हळदीकुंकवाला गेल्यें नाहीं. वीणाताई अगोदरच हळदीकुंकु घेऊन गेल्या. त्यांच्या मागोमाग आम्हीं गेलों, तों आम्हांला समजलें कीं, मनोरमेचें लग्न मोडलें.—पुन्हां हात जोडल्यें, हें लग्न मोडण्यांत माझ्या आईनें पुढाकार घेतला, त्याबद्दल देवा, मला क्षमा कर. मी तेव्हां देवाचे आभार एवढ्याचसाठीं मानले कीं, आपल्या बापाच्या तोंडची ती विषवार्ता ऐकायला मनोरमा तेव्हां तिथें नव्हती.

त्या दिवशीं मनोरमेला घरीं येऊंच देऊं नये, म्हणजे बिचारीच्या आयुष्यांतला एक दिवस तरी सुखानें जाईल, या इच्छेनें मी घाईघाईनें घरीं गेल्यें व तिला माझ्या खोलींत बोलावून मुद्दाम इकडच्या तिकडच्या गोष्टी काढल्या. मनोरमा अनंतरावांच्या बाबतींत माझें पुन्हां पुन्हां समाधान करूं लागली. पण मनांत म्हटलें, वेडे, आतां तुझ्या लग्नाचा नकार तुला कळेल तेव्हां तुझी कोण समजूत घालणार !

मनोरमा मला म्हणाली, ‘ आमच्या कारखान्याच्या बागेंत चल; तिथें जाईजुईच्या कळ्या तोडून पात्या तयार करून माळूंया.’ या तिच्या इच्छेला मीं मान दिला. संध्याकाळची वेळ असल्यानें कारखाना बंद झाला होता. नोकरमाणसें कोणीहि त्या ठिकाणीं नव्हतीं. त्यामुळें आम्हांला चांगला एकांत मिळाला.

ओंजळभर जाईच्या कळ्या मनोरमेनें तोडल्या व ओंजळभर मीं तोडल्या. दोघींनींहि पात्या गुंफल्या, मनोरमेला चांगलीशी पाती गुंफतां येईना म्हणून मीं तिला गुंफून दिली व मनोरमेनें सांगितली म्हणून आज गुरुवारीं दत्तासाठीं एक माळ गुंफून मनोरमेसाठीं जाईच्या ताटव्याला टांगून ठेऊन दिली. मनोरमा



हरिहरपंत अकस्मात् बागेचें फाटक उघडून आंत आले.

( पृष्ठ १२७ )

अडवून म्हणाली, " थांबा. मी आपली दासी ना ? माझ्या चरणांना स्पर्श करून आपण माझ्या मस्तकावर पापाचे डोंगर कां वाढवतां ? ह्या पापाच्या चिखलांत मी रुतल्यें तर आपली दासी म्हणून आपले पाय मला कसे चुरतां येतील ? आपल्या पायांवर माझी सारी पुण्याई वाहिलेली आहे " असें म्हणून मनोरमेनें निळकंठांना नमस्कार केला.

या वेळीं निळकंठ कदाचित् पाय मागें घेते असते; पण मनोरमेनें दोन्ही हातांनीं ते घट्ट धरून ठेवले होते. ते गद्गद स्वरानें म्हणाले, "सोड ! मनोरमे, माझे पाय सोड ! सोड ! हें प्रेमाचें वेड आतां तरी सोड ! "

मनोरमेनें धरल्या पायींच केविलवाण्या स्वरानें विचारलें, " एकदां जडलेलें हें प्रेमाचें वेड मी आतां कशी सोडूं ? प्रेमाच्या मंगल धामीं या आपल्या चरणीं इतके दिवस चित्ताचा लय लावून आज प्रेमाचा आस्वाद मला घेतां आला नाहीं, तर माझ्यासारखी हतभागी मीच ! हें प्रेमाचें वेड सोडण्यासाठीं मीं माझ्या आंगाला चिकटवून घेतलें नाहीं, तर तें घेऊन साऱ्या जगाला सात्विक प्रेमवेडाची दीक्षा द्यायला मी निघाल्यें आहें. आपण माझ्यासाठीं प्रेम-वेडे बनलां व मला प्रेमवेडी बनवली. आपल्या प्रेमाच्या नाजुक भारानें मला आपल्या चरणीं लीन केली. इतक्या सायासांनीं मला लागलेलें आपलें वेड अखंड टिकावें, आपल्या प्रेमांत मी जन्मोजन्मीं वेडीवेडी म्हणून रंगून राहावी, आपलें भजन, आपलें पूजन, आपलें चिंतन करण्यांतच माझी अक्षयसमाधि लागून राहावी, म्हणून देवासाठीं गुंफलेली माळा ही आपल्याला अर्पण करत्यें. आपण माझे जीव, आपण माझे शिव, आपण माझा विसावा—ह्या बोलत्या चालत्या सौभाग्यदेवतेला भजायचें सोडून आम्ही पतिव्रतांनीं पाषाणाच्या किंवा सोन्या-चांदीच्या देवता कां म्हणून पुजाव्या ? "

मनोरमेनें मनोभावानें जवळच्या जाईच्या ताटव्याला टांगून ठेवलेली फुल-माळ निळकंठांच्या गळ्यांत घातली, तोंच हरिहरपंत अकस्मात् बागेचें फाटक उघडून तिथें आले. त्यांना पहातांच मनोरमा मुकाट्यानें वाटेला लागली. तिच्याबरोबर मीहि गेल्यें. निळकंठहि आमच्या मागोमाग बाहेर पडले.

जातां जातां हरिहरपंतांनीं रागारागानें उद्गार काढले, " चांगले धंदे चाल-वले आहेस बरें मनू ! तूं आमचे बेचाळीस पूर्वज खासे नरकांत घालवते आहेस! "

*  *  *  *

मनोरमा व निळकंठ यांच्या वांट्याला ह्या यातना आणण्यांत माझे काका, माझी आई व लीला या तिघांनीं कोणता प्रयत्न शिल्लक ठेवायचा नाहीं, अशी जणूं काय प्रतिज्ञाच केली होती. त्यांच्या राक्षसी करणीची लाज मला कां नाहीं वाटणार! असल्या हलक्या शीलाच्या मातेच्या पोटीं मला जन्माला घालणाऱ्या दैवाला दोष देत मी बिऱ्हाडीं गेल्यें, तों जिना चढतां चढतां टपालवाल्यानें एक पत्र आणून माझ्या हातीं दिलें. पत्र काकांच्या नांवाचें होतें. काकांचीं सारीं पत्रें त्यांच्या गैरहजेरींत मी फोडीत असें. तशांत हें पत्र बाबांचें असल्यामुळें तर मी जास्तच उत्कंठेनें तें फोडलें, व जिन्यांतल्या दिव्याखालीं वाचलें:—

' अनेक आशीर्वाद, विशेष.—

आपल्याला मागें एक पत्र पाठविलें आहेच. पण पुन्हां लिहिण्याचें कारण, आपणां उभयतांचीं पापें माझ्या नांवावर अलीकडे विकलीं जाऊं लागलीं आहेत. तरी सौभाग्यवती बाळंत होऊन त्या मुलाचा जन्मदाता म्हणवून घेण्याचें माझ्या कपाळीं आल्यास मी ती गोष्ट उघड उघड नाकबूल करीन. हे माझ्या नांवावर होणारे चाळे मला बाधक होऊं नयेत, म्हणून मी लौकरच सौभाग्यवतीचा घटस्फोट करणार आहें. अब्रू ही कांचेच्या भांड्यासारखी आहे; ती एकदां गेली, कीं परत यावयाची नाहीं, म्हणून मी आपल्याला आगाऊ कळवीत आहें. कळावें.

आपला,

**दिनकर.'**

एकूण आमच्या अब्रूचें कांचेचें भांडें फुटलें!—फुटलेंच नाहीं तर काय! ह्या आईच्या पापाच्या राशी ज्या अर्थी बाबांसमोर जाऊन कुणींतरी रचल्या, त्या अर्थी या गोष्टी जगभर झाल्याच असल्या पाहिजेत! असल्या ज्या माणसा-पासून एका कुळाचें तोंड काळें होतें, व समाजांत अनीतिमत्ता वाढते, त्या माणसाला कारखान्यांतलें एखादें विष घालून मी ठार मारलें, तर मातृहत्त्येचें पातक लागेल का, याचा विचार करीत मीं मागील दारच्या वाटेनें बिऱ्हाडीं गेल्यें, तों दरवाजाला कडी! पुढून पाहिलें तरी कडी! आंत मात्र शारदाकाकू, आई, लीला, श्यामसुंदर यांचीं तोंडें वाजत होतीं.

इतकीं भांडणें कसलीं चाललीं आहेत, तीं ऐकावीं तरी, म्हणून मी दरवाजा न वाजवतां कान देऊन उभी राहिल्यें. तेव्हां मला पुढील संवाद ऐकूं आला:—



इतकीं भांडणें कसलीं चाललीं आहेत, तीं एकावीं तरी, म्हणून मी दरवाजा न वाजवतां कान देऊन उभी राहिल्यें.

( पृष्ठ १२८ )

श्यामसुंदरानें बापुडवाण्या स्वरानें विचारलें, " काकू, तुम्ही व लीलाताई, दोघी मिळून माझ्या आईला जेव्हांतेव्हां अशा फडाफडा बोलतां कां हो ? "

आई श्यामला दटावून म्हणाली, " गप्प राहा रे ! "

श्यामनें विचारलें, " कां म्हणून गप्प राहूं ?–गप्प राहूं का ग आइ ? "

काकू उत्तरल्या, " तर काय करणार बाळ ! आपल्याला आतां या घरांत बोलायला सत्तेचें तोंड आहे कुठें ! जाऊबाई, लीलाबाई, तुम्हीं दोघीहि माझ्या सवतींसारख्या–दुखणेकरीण मी–माझा छळ कां करतां हो ? "

श्यामनें आई व लीला या दोघींनाहि विचारलें, " तुम्ही आईच्या सवती का ग ?–आई, सवत म्हणजे काय ग ? "

लगेच श्यामच्या पाठींत धाब्‌दिशीं एक सपाटा बसला; त्यासरशी काकू कळवळ्याला येऊन म्हणाली, " जाऊबाई, मी तुम्हांला हात जोडत्यें. पाहिजे तर मला मारा; पण माझ्या ह्या प्राणाच्याहि प्राणाला–ह्या माझ्या लाडक्याला–ह्या जीवाभावाच्या लेण्याला पांचां बोटांनीं दुखवूं नका हो !–उगी बाळ, उगी हं ! माझें सोनें तें "

यावरून मीं ओळखलें कीं, आईनेंच श्यामवर हात टाकला होता. लीला काकूवर चवताळून विचारूं लागली, " शिस्तीसाठीं तुमच्या मुलाला त्यांनीं पांच बोटें लावलीं तर तेवढ्यानें त्याचा प्राणच गेला जसा कांहीं ! "

काकू कळवळ्याला येऊन म्हणाल्या, " नका हो असल्या अमंगळ शब्दांनीं माझ्या बाळाला शापूं ! देवा, हे शाप माझ्या राजसाच्या दैवीं बसूं देऊं नकोस. त्यांचीं फुलें होऊन त्या फुलांची पखरण तुझ्या चरणीं पडूं दे !–बाळ श्याम, माझा सोना तो ! उगा राहा बाळ, रडूं नकोस ! "

आई म्हणाली, " मेला–मेला ! तुमचा श्याम मेला बरें ! तो मेला म्हणून रडा त्याच्या नांवानें–अन् तुम्हींहि मरा त्याच्याबरोबर ! "

श्याम रागानें उत्तरला, " तूंच मरेनास ! बाबांना मी सांगेन, माझ्या आईला मर म्हणतेस ती !-सांगूं ना ग आई ? बाबा माझें ऐकतात, त्यांना मी आवडतों; पण आई, आतांशा तूं कां ग त्यांना आवडत नाहींस ? "

काकू उत्तरल्या, " ह्या दुरंगी दुनियेंतील पापाच्या वाऱ्यापासून वाऱ्या-सारखा अलिप्त असणाऱ्या माझ्या राजसा, तुला याचें काय उत्तर देऊं मी ? एका काळीं तूंहि त्यांचा आवडता होतास, मीहि त्यांची आवडती होत्यें, तेव्हां

तूं आम्हांला यापेक्षांहि बोबड्या भाषेंत असेच प्रश्न विचारावेस अन् तुझी तरतरी पाहून तुझ्या जन्मदात्यांनीं वात्सल्यप्रेमाच्या भरांत तुझ्या गालाचे असेच–मटामट मुके घेऊन तुला हंसवून हंसवून तुझा जीव अर्धा करावा–"

मध्येंच श्याम म्हणाला, "तेव्हां मला व बाबांना हंसतांना पाहून तूंहि हंसावेंस, नाहीं ग आई?–तुम्ही आमचें ऐकूं नका ग!" आई व लीला यांना उद्देशून श्याम हें बोलला असावा.

"बरें आहे कार्ट्या!" हा आईचाच शब्द!

काकू म्हणाल्या, "बाळ, ते आपल्या आयुष्यांतले हंसण्याचे दिवस संपून आतां आपल्या कपाळीं रडण्याचे दिवस आले आहेत. आपल्या सुखाच्या सूर्यबिंबाला हें ग्रहण लागल्या घटकेपासून ही दुःखाची काळरात्र आपल्या वांट्याला आली आहे. ह्या रात्रीच्या घोर आंधारांत आतां आपली दाद कोण घेणार बाळ! तुझा टाहो या आंधारांतून वाट शोधून त्यांच्या कानीं कसा जाणार! उगा! बाळ, उगा! ह्या आंधाऱ्या रात्रींतच परमेश्वरानें आपल्या आयुष्याच्या अंताची योजना केली असेल, तर तिला मान देण्यासाठीं आपण डोळे पुसून मन घट्ट केलें पाहिजे. उगा बाळ, रडूं नकोस, उगा!"

श्यामनें रडव्या स्वरानें विचारलें, "मग आई, तूं कां ग रडतेस?"

काकू म्हणाल्या, "मी रडत्यें; पण तूं रडूं नकोस. उगा बाळ! आपल्याला रडवणाऱ्या दुर्दैवाचा हा नुसता ओझरता घाला आहे. या वेळीं आपण धीर सोडला तर उद्यां नव्यानव्या दुर्दैवांनीं आपल्यावर झडप घातल्यावर आपल्याला रडतां रडतां उसंत मिळणार नाहीं.–उगा बाळ, उगा! कांहीं दिवसांपूर्वी आपल्या मस्तकावर सुखाची संततधार वाहात होती; पण आज आपल्या दैवानें आपल्याकडे पाठ केली आहे. आपल्या दारीं वाहणारा परमेश्वरी कृपेचा झरा आतां आटून अगदीं कोरडा पडला आहे. आतां ह्या ग्रहदशेच्या रखरखीत मैदानांत सुखाची बाळभूक आठवूं नकोस बाळ! आपल्या वांट्याला आलेल्या भोगांना असें कंटाळून कसें चालेल! उगा बाळ, उगा!"

श्याम म्हणाला, "मी बाबांना आवडत होतों, तूं बाबांना आवडत होतीस, पण काकू आमच्याशीं भांडूं लागल्या,–आणि ही लीलाताई आपल्याकडे आल्यापासून तर तूं त्यांना मुळींच आवडेनाशी झाली आहेस. लीलाताई अगदीं वाईट आहे–नाहीं ग आई?"

" मेल्या, जळ्ळें तुझें तोंड तें ! मी वाईट ?–मी वाईट ?–मी वाईट ?" धाब् धाब् धाब् तीन लाथा श्यामच्या कंबरेंत बसलेल्या मीं ऐकल्या, तेव्हां मात्र माझ्याच्यानें राहावेना. मी जोरानें दरवांजा लोटून म्हणाल्यें, "आई, दार उघड!"

आईनें दार उघडलें; तों काकू रडव्या डोळ्यांनीं दरवाजाकडे पहात श्यामला समजावीत होत्या. मीं विचारलें, " काय झालें हो काकू ? "

आई मला म्हणाली, " यमू, तुला मध्यें तिऱ्हाइती करायची जरूर नाहीं. तूं आपल्या खोलींत जाऊन बैस जा. "

मी कांहीं न बोलतां समोर उभी राहिल्यें. काकू मला विनवून सांगूं लागल्या, " यमू, पहा ग ह्या दोघी मिळून माझ्या छळाला लागल्या आहेत ! लीलाताईनीं आतां या माझ्या कोंवळ्या कळीला लाथांखालीं तुडविलें.–लीलाताई, तुमच्या बिंबाधराला कुणीं असें लाथांखालीं तुडवलें तर तुमचा जीव तिळतिळ तुटेल किंवा नाहीं ? त्याला कुणीं मेला म्हटलें, तर तें तुम्हांला मेल्यापेक्षांहि मेल्यासारखें होईल कीं नाहीं ? देवा, जगांतल्या साऱ्याच विधवा अशा उरफाट्या काळजाच्या मांगिणी असतात कारे ?–चल बाळ, माझ्या डोळ्यांदेखत तुझ्या ह्या गोजिरवाण्या देहाचा यांच्या पायाखालीं चोळामोळा व्हावयाला नको. चल यमूताईच्या खोलींत ! उगा–रडूं नकोस ! "

लगेच श्यामनें माझा हात धरला व काकूहि माझ्या मागोमाग माझ्या खोलींत यायला निघाल्या. पण त्यांच्या पायांना शक्ति नसल्यामुळें ते लटलट कांपूं लागले. त्यांचा हात धरून एका हातीं त्या व एका हातीं श्याम अशी दोघांना मी खोलींत नेऊं लागल्यें, तेव्हां लीलेनें मला टोमणा मारला, " पुतणी मोठी कळकळीची आलीस, ती काकूला डोकीवर घेऊन बैस म्हणावें. "

इतक्यांत काका घरांत आले. त्यांनीं आईला विचारलें, " काय वैनी, ती काय म्हणते ? "

आई व लीला एकाच सुरांत उत्तरल्या, " ती आम्हांला विचारते, तुम्ही माझ्या सवती का ? "

काका स्वभावतांच तापट होते. तशांत कारखान्यांतून कंटाळून आल्यावर घरीं कलह आढळला, कीं त्यांच्या आंगाला आग लागे. त्यांनीं रागाच्या भरांत काकूंचे केंस धरले, व त्यांना फरफरां ओढून विचारलें, "काय–काय विचारतेस त्यांना ? विचार, पुन्हां विचार ! ढालगज शेंबडी रांड ! "

" राम राम ! " काकू काकांच्या पायां पडून विनवूं लागल्या, " तो अमंगळ काळा डाग माझ्या–सौभाग्यवतीच्या तोंडाला लावूं नये ! "

पण काकांना दया आली नाहीं. ते काकूंच्या गालांचे चिचकुरे घेत म्हणाले, " तर तर ! तूं किती गोऱ्या तोंडाची लागून गेली आहेस तरी ! हें तुझें काळें तोंड–हें जळ्ळें तोंड–ह्याच तोंडानें वैनीला, लीलेला सवती म्हणतेस ना ? विचार–त्यांना ! पुन्हां विचार त्या तुझ्या कोण तें ! "

काकूंना सोडवण्यासाठीं मी मध्यें पडल्यें, तों काकांनीं रागाच्या भरांत माझ्या एक थोबाडींत दिली, व सांगितलें, " चालती हो बाजूला. या वेळीं मध्यें कोणी पडेल तर त्याचा प्राण घेईन. "

आईनें मला बाजूला ओढून घेतलें. काकूंचे हाल पाहून मला रडूं आलें. श्यामहि रडूं लागून काकूंच्या आंगाला बिलगून ओरडूं लागला, " बाबा, आईला मारूं नका हो ! माझी आई ती ! तिला मारूं नका हो ! "

मी मनांत म्हणाल्यें कीं, ह्या पोराचीं शंभर वर्षे आतां भरलीं. लीला मध्येंच सांगूं लागली, " अन् त्या श्यामसुंदरला शिकवतात, आम्हांला सवती सवती म्हणायला. "

या लीलेच्या शब्दांनीं काकांच्या भडकलेल्या रागाच्या आगींत तेलाचा शिडकाव झाला. त्यांनीं श्यामचा कान धरून त्याला विचारलें, " काय शिकवते रे तुला ही ? बोल ! "

काकू श्यामला सोडवीत म्हणाल्या, "आपल्या पायांसाक्ष, मी त्याला कांहीं शिकवीन तर माझी जीभ आंत ओढेल. "

काका पुन्हां काकूंच्या केसांना हिसडा देऊन म्हणाले, "ती आंत ओढण्यापूर्वीच मी तिला बाहेर ओढतों. सांग त्याला काय शिकवतेस ? "

आई व लीला एकदम म्हणाल्या, " तोहि तसेंच म्हणतो,–सवत; त्याहि तसेंच म्हणतात. "

काकांनीं काकूंच्या कंबरेंत एक–दोन–तीन लाथा घातल्या, त्या दुःखासरशा कासावीस होऊन म्हणाल्या, " हाय रे देवा ! जाऊबाई, लीले, मागच्या जन्मीं मीं तुमचा सवतीमत्सर केला होता, म्हणून या जन्मीं तुम्ही माझा असा सूड घेतां का हो ? "

" ऐका—म्हटलें, ऐका. " आई म्हणाली.

काकांनीं काकूंना पुन्हां लाथांनीं बदडण्याला सुरवात केली, "पुन्हां सवत? सवतीचें नांव काढशील पुन्हां? —काढशील पुन्हां?"

"नाहीं काढायची—चुकल्यें मी! देवा, परमेश्वरा, धांवरे माझ्या साह्याला! माझा असा अंत पाहूं नकोस!" असें म्हणून दीर्घ उसासे टाकीत काकू धरणीवर पडल्या.

काकांनीं पुन्हां काकूंच्या कमरेंत लाथा हाणीत म्हटलें, "हा धांवला—हा धांवला—हा धांवला परमेश्वर तुझ्या साह्याला! मार आतां त्यांच्या नांवानें हांका!"

"देवा रे!" अशी एकच किंचाळी फोडून काकू बेशुद्ध झाल्या, तेव्हां मात्र सर्वांचें धाबें दणाणलें. कारण, ही आतां ठार मेली तर पंचाईत! लगेच लीलेनें पाण्याचा तांब्या भरून आणला व आईनें काकूंच्या डोक्यावर पाणी शिंपडलें. थोड्या वेळानें त्या सावध झाल्या तेव्हां मी त्यांना हाताशीं धरून माझ्या खोलींत नेऊन झोंपवलें, व श्यामहि त्यांच्याच शेजारीं झोंपला.

मीं काकांना म्हटलें, "काका, असा काय तुमचा राक्षसी राग हा! आजारी आहे ती, तशांत चार महिन्यांची गरभार! मरणार नाहीं का ती अशा हालांनीं?"

काका यावर मला उत्तरले, "मरेना कां मेली तर? असल्या निकामी बायकांना निकामी जनावरांप्रमाणें गोळ्या घालून ठार केल्या पाहिजेत."

कुठची काकूंचा कैवार घ्यायला गेल्येंसें मला झालें. इतक्या परींनीं सर्वांकडून शापून घेण्यापेक्षां त्या एकदांच्या मरत्या तरी सुटल्या असत्या!

* * * *

रात्रौ आमचीं जेवणखाणें आटोपल्यावर बाबांचें पत्र आलें होतें, तें मी काकांना दिलें. पत्र वाचून तें फोडल्याबद्दल काका रागावतील, याचें मला स्वप्नच पडलें होतें. पण आज मीं मनाचा धडाच केला होता कीं, ह्या गोष्टीचा एकदां सोक्षमोक्ष काय तो करून घ्यावा.

कल्पना केल्याप्रमाणें काका माझ्यावर रागावले. पण त्यांच्या रागाला न भितां मीं त्यांना स्पष्ट विचारलें, "आतां आईची काय व्यवस्था करणार ती मला सांगा."

आईनें मला नेटानें विचारलें, "तुम्हां पोरांना ह्या गोष्टी कशाला ग हव्यात?"

मी उत्तरल्यें, “ तुमचीं थोरांचीं पापें आम्हांला नडतात, म्हणून ह्या गोष्टी आम्हांला हव्यात.—काका, माझी लहानाची गोष्ट ऐकायची असेल तर आईला मुकाट्यानें पंढरपूरला पाठवा. ”

“ बरें आहे, त्याचा विचार मी पहातों. ” काका उत्तरले.

मीं सांगितलें, “ पहाणेंबिहाणें कांहीं नाहीं. जर का ही गोष्ट ह्या चाळीं-तल्या लोकांना कळून त्यांचीं उणीं बोलणीं माझ्या कानांवर आलीं, तर मी अश्शी जाऊन जीव देईन. ”

इतक्यांत विमला–माझी धाकटी बहीण–शेजारीं लिहीत बसली होती ती धांवत आली व सांगायला लागली, “ यमूअक्का, शेजारच्या घरीं आतां आईच्या गरभारपणाच्या कसल्याशा गोष्टी चालल्या होत्या. ”

मी विमलेवर डोळे वटारून तिला गप्प केलें; पण काकांचा व आईचा चेहरा मात्र विमलेचे बोल ऐकून काळवंडला.



# झुलुक अकरावी

## निळकंठ (३)

मनोरमा माझी नाहीं, हा वज्राघात माझ्या मस्तकाचें पुरतें चूर्णविचूर्ण करणार नाहीं, म्हणूनच कीं काय, माझ्या आईच्या गळ्याला यमफांस लागला! मरतांना सुद्धां तिची जर कोणती उत्कट इच्छा असेल तर ती हीच कीं, माझें लग्न व्हावें व संसार थाटावा. पण देवाचें त्या इच्छेला पाठबळ नव्हतें. मामा-मामींनीं आईच्या अंतकाळीं तिला वचन दिलें होतें कीं, आम्हीं पोटच्या मुलाप्रमाणें निळकंठाचें पालन पोषण करीत आलों, तसेंच पुढेंहि करूं. ह्या वचनानें मलाहि धीर आला व आईलाहि धीर आला. जगांत मी पोरका झालों, म्हणून मला रडूं आलें; पण मनाचा धडा करून मी यापुढें मामांच्या अंतःकरणांत पितृमूर्ति व मामींच्या अंतःकरणांत मातृमूर्ति यांचें अधिष्ठान कल्पून त्यांच्याशीं जीवाभावाच्या ओढ्यानें वागण्याचा निश्चय केला.

आमचें लग्न मोडलें, ही अशुभ वार्ता मनोरमेच्या कानीं घालण्याचें माझ्याच कपाळीं आलें, त्या क्षणापासून तिच्या अंतःकरणाला धक्का बसल्यासारखा झाला. माझ्या आईची स्मशानक्रिया आटोपून तिसऱ्या दिवशीं मी निराश हृदयानें माझ्या खोलींत बसलों असतां मनोरमा तिथें आली. आमचें लग्न मोडलें, असें कळल्यापासून तर तिची एखाद्या वेडीसारखी अवस्था झाली होती. ती बापुडवाण्या चर्येनें माझ्या शेजारीं बसलेली पहातांच मी तिला म्हणालों, " मनोरमे, आमच्या प्रेमसंबंधाला परमेश्वरी इच्छेचें पाठबळ नाहीं, ही गोष्ट पूर्वी आपल्याला कोणीं सांगितली असती, तर आपण त्याला वेडा ठरवला असता. पण भवितव्यतेनें आम्हां उभयतांच्या प्रेमाभिमानाचा डोल्हारा कोसळून रसातळाला नेण्यासाठीं आमचींच बोटें आमच्या डोळ्यांत घातलीं, व जग वेडें नाहीं, आम्हीं वेडीं आहों, हें आमचें वेडेपण आमच्या निदर्शनाला आणून दिलें. हे भवितव्यतेचे नानारूपी खेळ प्रत्यहीं आपल्या डोळ्यांसमोर सुरू असतां त्यांच्यावर जय मिळवण्याचा आपण कितीतरी अट्टहास केला; पण शेवटीं काय! —हाय! मनोरमे, शेवटीं ह्या वेडेपणाचा शिक्का आपल्या माथीं मारला जाऊन जग शहाणें तें शहाणेंच राहिलें. आपण वर्तमानकाळीं

आपल्या मनोरथांचे मनोरे रचतांना आपल्या मतानें फारच शहाणपणा दाखवतों; पण भविष्यकाळांतील आपत्तींचा झंझावात सोसाट्यानें वाहात येऊन त्या मनोऱ्यांचा चक्काचूर करतो, तेव्हां अवकाशाच्या पोकळ पायावर कल्पनेचे असले पोकळ मनोरे बांधणारीं आम्हींच परिणामीं वेडीं ठरतों."

मनोरमा उद्गारली, "आपल्या जीवनयात्रेंत तरी आपण भवितव्यतेचे हेच भेसूर देखावे प्रत्यहीं पहात नाहीं का? आपण रोजच्या रोज आजच्या वर्तमानकाळीं शहाणपणाच्या, दूरदर्शीपणाच्या दिमाखानें संसाराचे, सुखाचे, समाजसेवेचे, देशसेवेचे जे कल्पनेचे मनोरे बांधीत यावे, ते उद्यांच्या भविष्यकाळानें उगवत्या दिवसाला साक्षी ठेऊन वाऱ्याच्या एका लाटेसरसे कोसळून पाडावे व आजच्या वर्तमानकाळीं शहाणे गणले जाणारे जीव उद्यांच्या भविष्यकाळीं वेडे ठरावे, ही भवितव्यतेची घटना तरी आपल्याला जगाच्या रितीचा एक धडाच शिकवीत नाहीं काय? भविष्यकाळाच्या घटनेची जाणीव जर जीवाला वर्तमानकाळीं असेल, तर आजच्या शहाणपणांत यशस्वी झालों म्हणून पोट धरधरून हंसतां हंसतां उद्यांच्या वेडेपणांत ठार बुडालों म्हणून धाय मोकलून रडण्याचा प्रसंग कोणाहि जीवावर कधींच ओढवणार नाहीं."

मी म्हणालों, "पण मनोरमे, आमचें भोक्तृत्व एवढ्यावरच संपलें नाहीं; तें आपल्या जीवनाच्या अंतापर्यंत हात धुवून आपल्या पाठीला लागलें आहे. आपण कालच्या वेडेपणाचें प्रायश्चित्त घेतां घेतां आज वेडीं ठरलों, म्हणूनच कीं काय, हीं भूतकाळच्या आपल्या रमणीय कल्पनांचीं भयाण भुतें आम्हांला आठवणींच्या स्मशानांत एकटीं कोंडून परोपरीनें आमचा छळ करायला उभीं आहेत. तीं पहा! तीं पहा! मनोरमे, प्रेमाचे दिव्य अंतश्चक्षु उघडून तीं पहा! आपण कालपरवांपर्यंत प्रेमानें हंसलों खेळलों, त्या प्रेमलीलांचीं पिशाच्चें आमच्या हंसण्याखेळण्याच्या सुयाटांचण्या आमच्या आंगांत बोचूं पहात आहेत; आपण निर्व्याज प्रेमाच्या भरांत चुकून कधीं एकमेकांशीं हस्तांदोलन केलें असेल, त्या हस्तांदोलनाच्या बळकट दोरखंडांनीं आम्हांला परस्परांपासून दूरदूर अशा नाथलाडके ह्या कालच्या कल्पवृक्षांना, पण आजच्या कांटेरी झाडांना बांधून ठेवीत आहेत. ह्या अचेतन वृक्षांचा संयोग जसा या जन्मीं पुन्हां होणार नाहीं, तसा मनोरमे, त्यांच्या कांटेरी बुंध्यांशीं बांधलेल्या आमच्या जीवांचा संगमहि या

जन्मीं होणें शक्य नाहीं, हें सुचविण्याकरतां विधात्यानें आमच्या स्मृतिपटला-वर ही ताटातुटीची फुली मारली आहे."

मनोरमा एकाएकीं दचकल्यासारखी होऊन म्हणाली, "निळकंठ, मी आपल्या दृष्टीला दृष्टि भिडवून आपली रमणीय मूर्ति डोळांभर पहात्यें, तसेच आपण माझ्या डोळ्यांना डोळा भिडवून टक लावून पाहातां, हें आपण उभयतां पाप करतों, असें कोणीतरी माझ्या कानीं गुणगुणतें आहेसें मला वाटतें. कालपर्वा-पर्यंत आपण नाहीं का एकमेकांच्या डोळ्याला डोळा भिडवून एकमेकांकडे अशींच पहात होतों ? तेव्हां कुठें कोण तें नाहीं गुणगुणलें माझ्या कानीं; मग आजच असें कां हें ? आपण एकमेकांकडे टक लावून पाहातों ना ? त्या नेत्रकटाक्षांचे भाले हातीं घेऊन त्या भाल्यांच्या टोंकांनीं माझे डोळे फोडूं पहाणारें कोण हें भयंकर पिशाच्च माझ्यासमोर उभें आहे ? पहा–पहा ! त्याच्या हातच्या भाल्यांचीं टोकें माझ्या डोळ्यांजवळ आलीं. अगदीं जवळ आलीं–अगदीं बुबु-ळांना भिडायला आलीं. डोळे मिटून घेतले तरी मिटतां येत नाहींत. आतां हें पिशाच्च माझे डोळे काढणार–रे देवा ! निळकंठ, मला सांभाळा ! "

सांभाळा म्हणतां म्हणतां मनोरमा मूर्च्छित झाली. तिला मी माझ्या बाहूंत सांवरून धरली. उपवर तरुणीला अशा चमत्कारिक रीतीनें कंवटाळण्याचा माझ्या आयुष्यांतील हा पहिलाच प्रसंग असल्यानें माझ्या सर्वांगाला कांपरें भरलें. मी हें पाप करीत आहें का, असेंहि क्षणभर मनाला वाटलें. पण ती वेळा एका जीवाच्या आयुष्याच्या मोलाची होती, त्यामुळें पापपुण्याचा विचार न करतां मीं मनोरमेला माझ्या बिछान्यावर झोंपवली. मी जन्मापासून गादीला कधींच स्पर्श केला नसल्याकारणानें माझी नेहमींची काळी सतरंजी, हाच माझा बिछाना होता. तिच्यावर मनोरमेला झोंपवून तिच्या डोकीवर शिंपडण्यासाठीं पाणी आणायला म्हणून मी बाहेर जाऊं लागलों; पण मनोरमा मला अडवून म्हणाली, " बाहेर जाऊं नका ! आपण बाहेर गेलां व त्या भुतानें माझे डोळे फोडले तर ? मला ठार केली तर ? "

हे शब्द कानीं पडल्यावर मी बाहेर कसला जातों ! मी बसल्या जाग्या-वरूनच मामींना हांक मारून एक तांब्याभर गार पाणी आणायला सांगितलें. मामींनीं पाणी आणून मनोरमेच्या कपाळावर शिंपडल्यावर ती जरा जोरानें श्वासोच्छ्वास घेऊं लागली. मामी विचारूं लागल्या, " मनू, तुला कशानें

घेरी आली बाळ ? —कुठची दुर्बुद्धि भाऊंना आठवली नकळे, यांचें लग्न मोडायची ! ”

मनोरमा उद्गारली, “ ताई, आमचें लग्न मोडलें, ह्या शब्दांचा सुरुंग लावून बाबांनीं आमच्या प्रेमाचा—जीवाभावाचा कैलास फोडला, तेव्हांपासून तूं आमच्या केलेल्या लाडांचीं, कोडकौतुकाचीं पिशाच्चें माझ्यासमोर उभीं राहून मला भेडसावतात-माझा बळी घेऊं पहातात-माझे डोळे फोडूं पहातात ! ”

मामींनीं मामांना गड्याकरवीं निरोप पाठवला. थोड्या वेळानें मामा वर आले. मनोरमेची दुर्दशा पाहून त्यांनाहि वाईट वाटलें. ते म्हणाले, “ मी हरिहरपंतांना अगोदरच लिहिलें होतें, निळकंठाला मनोरमा द्यायची असेल, तरच आम्ही त्याच्यापाशीं शब्द काढतों. त्यावेळीं ते हो म्हणाले, व आतां असे वचनाला फिरले ! ”

मी म्हणालों, “ मामा, त्या झाल्यागेल्या गोष्टींची आठवण करून देणारा कालचा भूतकाळ, व त्या भूतकाळचीं भेसूर भुतें आमच्या डोळ्यांसमोर नाचवून आमच्या भिभ्या जीवांना भेडसावण्यासाठीं कालपर्यंत भविष्यकाळच्या बुरख्याखालीं लपून बसलेला हा आजचा वर्तमानकाळ,—हे काळ जर परमेश्वरानें निर्माण केले नसते, तर काल-आज-उद्यांच्या त्रिकोणी चबुऱ्यावर उभारलेल्या भूत-वर्तमान-भविष्य ह्या तिधारी सुळावर शोक-दुःख-निराशेच्या भर दोनप्रहरच्या कडक उन्हांत सुळीं जायचा प्रसंग आमच्या वांटणीला कधींच येता ना. ”

मामांना आमच्या लग्नाच्या बाबतींत झाला हा प्रकार मुळींच आवडला नाहीं. पण ते पराकाष्ठेचे शांत, सहनशील व समवृत्तीचे होते. ते पूर्वींपासूनच आमच्या भानगडींत फार कमी पडत असत. ते मनोरमेची समजूत घालूं लागले, “ मनू , तूं जर माझी सत्तेची मुलगी असतीस, तर तुझ्या लग्नाच्या बाबतींत मीं असा निष्ठुरपणा कधींच केला नसता. ”

“ पण नाना, बाबांपाशीं तुम्ही तुमचा एक शब्द खर्च करा ना ! तुमची मी लेंक ना ? नाना-ताई, माझ्यावर तुमची माया नाहीं का ? ” मनोरमेनें काकुळतीला येऊन विचारलें.

मनोरमा मामांच्या पुढ्यांत हात जोडून त्यांची विनवणी करीत आहे, तोंच हरिहरपंत अकस्मात् बाहेरून आंत आले व विचारूं लागले, “ मघांपासून मी

सारा प्रकार ऐकतों आहें. वीणे, मला स्पष्ट कळून चुकलें कीं, तूंच मनोरमेला नादीं लावून ठेवली आहेस. पण लक्षांत ठेवा, मुलगी माझी सत्तेची आहे."

मामा म्हणाले, "होय. तुमची सत्तेची मुलगी आहे, तिची मनाला मानेल तशी वाट लावायला तुम्ही मुखत्यार आहां."

"म्हणूनच म्हणतों, माझ्या मुलीची मी वाटेल तशी वाट लावीन." हरिहरपंत म्हणाले. हा त्यांचा आपसांतला तंटा पाहून मला बाजूला सरण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें.

* * * *

आमचें लग्न मोडलें व माझी आई वारली, या दोन्ही गोष्टी माधव, अनंत व नलिनी या तिघांनाहि एकदमच कळल्या. अनंत मधून मधून आईला पाहून जाई, व नलिनी तर स्वतांच तिला औषध देई. पण आई वारली, यामुळें सर्वांना दुःख झालें नाहीं, इतकें आमचें लग्न मोडलें हें ऐकून झालें.

आई वारली म्हणून मला दुःख झालें.–नाहीं कसें? पण एकतर तिचें वय झालें होतें, यामुळें माझ्या मनाला झोंबेल इतका शोक झाला नाहीं. आई जगती तर मला आणखी शंभर वर्षें जगली पाहिजे होती, किंवा अमर झाली असती तरी सोन्याहून पिंवळें झालें असतें. पण तें होणें विश्वाच्या रहाटीला धरून नाहीं, इतका जाणतेपणा मला असल्यानें मी शोक करीत बसलों नाहीं. पण मनोरमेची व माझी जन्माची ताटातूट झाली, हा अनावर शोक–हरे राम! त्याची मात्र आठवणहि करवत नाहीं!

माधव, नलिनी व अनंत एकत्र जमल्यावर माधव मला म्हणाला, "पाहिलेंस निळकंठ, मी तुला सांगत होतों कीं, ह्या विवाहाच्या भानगडींत तूं पडूं नकोस. कारण, मला तुझी मनोवृत्ति माहीत होती. संसार हा भासमान सुखांचा व खऱ्याखुऱ्या दुःखांचा नुसता बजबजाट आहे, तसाच खंद्या मनाचा, दुरंगी दुनियेशीं टक्कर देणारा पुरुष असेल, तरच त्यानें या गोष्टीचा विचार करावा."

अनंत म्हणाला, "माधव, तूं मागें याला शाप दिला होतास ना–लग्न मोडेल म्हणून, त्या शापाचा हा गुण!"

माधव म्हणाला, "होय. मीं शाप दिला होता खरा; पण मला आतां कळून आलें कीं, माझ्या फुलाबोलाला गांठ पडली ती अस्थानीं पडली."

मी उत्तरलों, " खरोखरच अस्थानीं पडली. माधव, तूं निश्चयाचा व आत्म-संयमनाचा थोर माणूस आहेस. तुझा शाप जर तुझ्यासारख्याच एखाद्या थोराच्या माथीं बसता, तर तो आपल्या उपजत थोरपणाच्या जोरावर सारीं दुःखें गिळून तुझ्यासारखा ब्रह्मचारी राहून देशसेवा व समाजसेवा या कामीं आपला देह झिजवता. पण तसला मानधन पुरुष मी नाहीं, म्हणूनच तुझ्या शापांचा भार सहन करण्याचें त्राण माझ्या आंगीं नाहीं. "

" हें मला माहीत आहे, म्हणूनच मी म्हणतों कीं, मनोरमेशींच तुझें लग्न झालें पाहिजे होतें. " माधव म्हणाला.

नलिनीनें विचारलें, " एकूण तुमच्या मतानेंहि लग्न ही आयुष्यांतली महत्त्वाची गोष्ट ठरली तर ! "

" होय. पण ती कुणाच्या आयुष्यांत, हा मात्र एक नाजुक प्रश्न आहे. " माधव म्हणाला.

" कुणाच्याहि कां असेना ? सामान्य लोकांच्या—" नलिनी म्हणाली.

मध्येंच नलिनीला अडवून माधव म्हणाला, " सामान्य लोकांच्या नव्हे; पण निळकंठ किंवा मनोरमा, यांच्यासारख्या विशेष्ट लोकांच्या जीवितकर्तव्यांत लग्न हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे खरा. देशांत समर्थ जीवांपेक्षां असमर्थ जीवांचीच बहुसंख्या आहे. शिवाय निळकंठ व मनोरमा यांच्यासारख्या समर्थ जीवांच्या आयुष्यांतील विशेष हा आहे कीं, हे जीव कुणा एखाद्या व्यक्तीचे व पंथाचे अनुयायी बनण्यासाठीं जन्माला आलेले नसून यांचा जन्म बहुजनसमाजाचा नेतेपणा पतकरण्यासाठीं बहुधा झालेला असतो. त्यांची चंचलता व नीतिमत्तेच्या मर्यादेंत वावरणारी विषयलोलुपता हे जरी सद्गुण नव्हेत, तरी त्यांना दुर्गुण म्हणतां यावयाचें नाहीं. फार काय, अविवाहितपणा हें जसें माझें कार्यक्षेत्र आहे, तसेंच संसार हें त्यांचें कार्यक्षेत्र असूं शकेल. ज्यांचें क्षेत्र त्यांना लाभलें, तरच त्यांच्या हातून स्वतांचें व राष्ट्राचें कांहीं कल्याण होणें शक्य होतें, व तें लाभलें नाहीं, म्हणजे त्यांच्या आंगच्या बाकीच्या साऱ्या सामर्थ्यावर विरजण पडतें. याचें ढळढळीत उदाहरण पाहावयाचें असेल तर हे आपले अनंतराव पहा ! होय ना अनंत ? "

नलिनीनें विचारलें, " अनंत अलीकडे फार निवृत्तिवादी बनत चालले आहेत, याचें कारण काय ? या वर्षी त्यांना परीक्षेलाहि बसतां आलें नाही. "

यावर अनंत कांहीं बोलला नाहीं, व बोलण्यासारखें त्यांत कांहीं नव्हतेंहि. परीक्षा म्हणजे कांहीं नाहीं, संसार म्हणजे कांहीं नाहीं, लोकसेवा म्हणजे कांहीं नाहीं, हा ब्रह्मांडाचा पसारा हें सारें थोतांड आहे, अशी ग्वाही देणारा निराशावाद अनंताच्या सर्वांगांत अलीकडे खेळूं लागला होता. यालाहि कारण मनोरमाच होती. मनोरमेनें त्याला भाऊबिजेचें आमंत्रण दिल्या दिवसापासून त्याच्या लोकोपकारी आशांना जी उतरती कळा लागली, ती लागली. त्याला साऱ्या गोष्टी जशाकांहीं मनोरमेसाठींच करायच्या होत्या !

अनंत म्हणाला, " या अनंताला कुणी कांहींहि म्हणा, तात्विक वेडा पीर म्हणा किंवा निराशावादी म्हणा, तुम्हां सर्वांसमक्ष मला एक गोष्ट कबूल केल्याशिवाय गत्यंतर नाहीं— "

" ती कोणती ? " नलिनीनें मध्येंच विचारलें.

अनंत उत्तरला, "या जगांत कुणासाठीं कांहीं करावें, असें मला वाटतच नाहीं. कारण, मीं कोणतीहि गोष्ट करायला हातीं घेतली, कीं ती कुणासाठीं करावी, हा प्रश्न डोळ्यांसमोर उभा राहातो. ज्यांच्यासाठीं कांहीं करावेंसें वाटतें त्यांच्यावर माझी सत्ता नाहीं, व इतरांसाठीं कांहीं करावेंसेंच मला वाटत नाहीं. "

माधव म्हणाला, " एकूण तुला कोणतीहि गोष्ट करायची होती ती व्यक्तीसाठीं करायची होती तर ? "

" अर्थात् ! कोणा एका व्यक्तीच्या चित्ताचें समाधान म्हणजे साऱ्या राष्ट्राचें समाधान नव्हे, हें मला माहीत असूनहि मी राष्ट्राच्या भवितव्यतेच्या गोष्टी सोडून व्यक्तीच्या भवितव्यतेंतच चित्ताला रंगवून ठेवलें, याबद्दल मला कुणी दोष देणार असाल तर खुशाल द्या. तुमच्यासमोर माझें मस्तक लीन आहे. मी लीनतेनें तुम्हांला एवढेंच सांगेन कीं, व्यक्तिमात्राला-साऱ्या जिवंत राष्ट्राला-सुखी करण्यासाठीं-माझ्या आवडत्या व्यक्तीकडे मीं कधींच काणाडोळा केला नसता; तर त्या व्यक्तीच्या सुखासाठीं, तिचें चोज पुरवण्यासाठीं म्हणून राष्ट्राच्या सुखाचा शोध मीं केला असता. "

इतका उघड्या मनाचा मित्र भेटल्यावर त्याच्याविषयीं माझ्या मनांत सहानुभूति कां दृढमूल होणार नाहीं ! मला क्षणभर असेंहि वाटलें कीं, मनोरमा मला नाहीं तर नाहीं; पण तिच्या पायीं झुरणीला लागलेल्या ह्या माझ्या जिवलग मित्राला-अनंताला तरी द्या, अशी विनंति आपण हरिहरपंतांना करावी.

पण विधीची भविष्यकालीन योजना माझ्या मनांत आमच्या भविष्यकालीन आयुष्यांतील घटनांचें गाणें गाऊं लागली कीं, तुम्हां सर्वांच्याच जन्माची एकजात माती व्हावी, असा योगायोग आहे.

माधवाला मीं सांगितलें कीं, अनंताच्या ध्यानीं मनीं आतां मनोरमेचे विचार न येतील तेवढे चांगले. माधवाला तें पटलेंहि. नंतर मला त्यानें विचारलें, "पण तुझें पुढें काय?"

मी उत्तरलों, "माझें दैव आणि मी!"

अनंत म्हणाला, "माधव, निळकंठाच्या बाबतींत हरिहरपंतांना दोन समजुतीचे शब्द सांगावे, असें मला वाटतें."

नलिनी म्हणाली, "पण ही तिऱ्हाइती तुमच्या हातीं सोंपवली म्हणजे तुमच्या आवडत्या मनोरमेच्या लग्नाची तिऱ्हाइती आहे ती!—चोराच्या हातीं जामदारखान्याच्या किल्ल्या दिल्यासारखें नाहींना व्हायचें?"

रडत्यालाहि हंसवणारी ही नलिनीची शंका होती. माधव तिला म्हणाला, "नलिनी, तुला काळवेळ कांहींच कळत नाहीं."

नलिनी उत्तरली, "या वेळीं आम्हीं सारींच समदुःखी आहों. इथें काळवेळेचें कसलें महत्त्व? ज्याला जें पाहिजे, तें द्यायची परमेश्वराची इच्छाच नाहीं."

आतां नलिनी पुन्हां आपल्या लग्नाच्या पूर्वपदावर येणार असें मला वाटलें, म्हणून मी म्हणालों, "नलिनी, कोळसा उगाळावा तितका काळाच."

माधव अनंताला म्हणाला, "मग अनंत, हरिहरपंतांशीं एकवार रदबदली करण्याचें काम तूं पत्करतोस?"

"हो!" अनंतानें होकार दिला.

माधवानें मला विचारलें, "ही गोष्ट मनासारखी घडून आल्यावर तरी तूं आपल्या पूर्वीच्या योजनेप्रमाणें आपल्या देशीं जाऊन उद्योगाला लागणार ना?"

"होय." मी उत्तरलों.

"आणि अनंतराव, आपली योजना?" माधवानें विचारलें.

"मनोरमेच्या शाश्वत कल्याणांतच माझ्या मनःकामनांचें बहुतांशीं साफल्य आहे." अनंत उत्तरला.

नंतर माधवानें नलिनीला विचारलें, "बरें; नलिनी, तुझा विचार काय? एखाद्या संस्थानांत नोकरी धरून पैसे मिळवायचा विचार आहे कीं कसें?"

" प्रतिज्ञा करण्यापेक्षां प्रतिज्ञा पाळण्यांत मी जास्त महत्त्व मानत्यें. मी कांहीं भुंगा नाहीं, ती ध्येयाच्या या फुलावरून त्या फुलावर गुंगुं करीत उडून जाईन ! मी नलिनी आहें. " नलिनी उत्तरली.

परमेश्वर अनंताच्या तरी मुखीं उभा राहावा, व मनोरमा माझी मला मिळावी, असें मनोमय तप मी त्यावेळीं स्वीकारलें.

माधव म्हणाला, " आमच्या जोडींतून लीलाच काय ती एकटी शीलाच्या कसोटीवर हिणकस ठरली ! "

अनंत कपाळाला आंठ्या घालून म्हणाला, " लीलेचें नांव आतां विसरा. तिच्या पापाचरणाच्या आठवणीची सुद्धां आमच्या मनाला शिवाशीव होईल. "

* * * *

आईच्या सुतकांतून मोकळा झाल्यावर असाच एकदां माधव, अनंत व नलिनी यांच्याशीं मी अशाच कर्माच्या गोष्टी बोलत बसलों असतांना मनोरमा, नीरजाकाकू—मनोरमेची आई, मामी, हरिहरपंत वगैरे मंडळी आमच्यांत येऊन मिळाली. मनोरमा आजारी आहे, असें हरिहरपंतांनीं तारेनें कळवल्या-बरोबर नीरजाकाकू आपल्या कन्येवर मायेची पांखर घालण्यासाठीं सोलापूराहून मुद्दाम धांवून आल्या होत्या.

ही मंडळी आलेली पाहून आज अनंत त्यांच्यापाशीं ती गोष्ट काढणार, व थोडीफार बोलाचाली होणार, अशी माझी खात्री होती. या वेळीं आपण चार पावलें दूर असलेलेंच बरें, असा विचार करून मीं काढता पाय घेतला. इतक्यांत नीरजाकाकूंनीं हरिहरपंतांना सुचवलें, " निळकंठांना बसवून घ्यावें. "

हरिहरपंतांनीं मला बसायला सांगितलें, तेव्हां त्यांचा शब्द अर्थातूच मला मोडतां येण्यासारखा नव्हता. मी खालीं बसलों.

मामींना इरेला घालून नीरजाकाकूंनीं मला विचारलें, " वीणे, त्यांना सांग कीं, त्यांच्याशीं लग्न करायची यमुनेची फार इच्छा आहे. "

मामींना माझा स्वभाव पुरा माहीत होता. त्या उत्तरल्या, " आत्या, मी खरेंच सांगत्यें, लग्नाच्या या बाबतींत वाचाविटाळ करायची मला आतां जरूरहि नाहीं, व इच्छाहि नाहीं. केल्या तेवढ्या गोष्टी पुरे झाल्या. "

हरिहरपंतांनीं मला विचारलें, " निळकंठ, तुमचा विचार काय आहे ? "

बोलूं नये अशी माझी इच्छा असतांहि हरिहरपंत मला मुद्दाम बोलवीत

होते. मी उत्तरलों, “तुमच्या मुलीला एकदां नालायक ठरलेला नवरामुलगा दुसऱ्यांच्या मुलीला तरी लायक कसा ठरेल? तुम्ही जसें तुमच्या मुलीचें कल्याण पाहिलें, तसेंच दुसऱ्यांच्याहि मुलींचें पहा.”

माधवानें विचारलें, “हरिहरपंत, हा तुम्ही निळकंठाचा धडधडीत अपमान करीत नाहीं का? तुम्हीच म्हणतां कीं, नवरेमुलगे मुलींना पाह्यला आले व नाकारून गेले, म्हणजे मुलींच्या आंगचें पावशेर पावशेर रक्त आटतें. या भयंकर रूढीचें खापर आपण समाजाच्या डोक्यावर सहज फोडूं शकतों. ती दुष्ट रूढि असली तरी हिंदु मुलींच्या मनावर तिचा थोडा फार संस्कार झालेला असल्याकारणानें अपमानाची तीव्रता वधूच्या मनाला तितकी जाणवत नाहीं. पण निळकंठ हिंदु वर आहे, त्याला एकामागून एक मुली नाकारून मुलींच्या बापांच्या डोळ्यांतून टिपें गाळवण्याचा अरेरावी अधिकार समाजानें जन्मतःच दिला आहे. हा अधिकार इतर हिंदु वर गाजवतात; पण निळकंठानें अशी एकाहि वधूची विटंबना केलेली नाहीं. इतकेंच काय; पण ह्या लग्नाच्या सौदेबाजी पद्धतीचा त्याला तिटकारा आहे. अशा वरावर वरपरीक्षेच्या नांवाखालीं कोणा मुलींच्या बापांनीं ‘नालायक’ ठरण्याचा प्रसंग आणला, तर त्यामुळें त्याच्या आंगचें किती शेर रक्त आटेल, किंवा आटलें असेल, याची तुम्हांला कल्पना तरी आहे का? अमकातमका मुलगा मुलगी पाह्यला आला व मुलीला नांवें ठेऊन परत गेला, तर ही समाजाची रीत असूनहि त्या मुलीला ‘मी नालायक कां ठरल्यें’ याचा विचार करून रडतां रडतां बरोबरीच्या मैत्रिणींपाशीं शरमिंदें व्हावें लागतें; मग नेहमींच आपल्या समाजांत श्रेष्ठ ठरून गेलेल्या वराला तुम्ही प्रथम लायक ठरवून मागाहून नालायक ठरवतां, ह्या नालायकीचा काळा डाग आपल्या तोंडाला लावून घेऊन समाजांतील मित्रमंडळींत वागतांना त्या वराला आनंद होत असेल नाहीं! हरिहरपंत, तुम्ही निळकंठाच्या आंगावर तरवारीचे वार केले असते, तरी ते नाना तऱ्हेच्या औषधींनीं बरे झाले असते. पण ह्या अपमानाच्या सुरीनें त्याच्या पंचप्राणांच्या छातींतून दुःखाचीं पांच रक्तरंजित कारंजीं तुम्हीं वहातीं केलीं, त्या जखमा आतां कशा भरून निघतील बरें?”

हरिहरपंत म्हणाले, “तें कांहीं असलें तरी माझ्या मुलीच्या कल्याणाचा रस्ता लोकांपेक्षां मला अगोदर दिसतो.—”

" होय ना, मग मनोरमेच्या लग्नाची जबाबदारी तुम्ही केव्हांहि वीणाताई व नानासाहेब यांच्यावर संपवायची नव्हती. सारे सोहाळे स्वतांच पार पाडायचे होते. " अनंत उद्गारला.

" पण वीणेला-नानासाहेबांना मुलगा पाह्यला सांगितला; मीहि स्वतां मुलाच्या शोधांत होतों. त्यांनीं एक पाहिला, मी एक पाहिला. त्यांच्या योजनेपेक्षां मला माझी योजना पसंत पडली. त्या योजनेप्रमाणें मी माझ्या मुलीचें लग्न करणार, यांत चूक ती काय झाली? " हरिहरपंतांनीं विचारलें.

अनंत उत्तरला, " चूक ती काय झाली म्हणून विचारतां? हरिहरपंत, वीणाताई व नानासाहेब, यांनीं तुमच्या मुलीसाठीं नियोजित केलेल्या वराचा हा धडधडीत अपमान नाहीं का? त्यांच्या मानापमानाची गोष्ट क्षणभर बाजूला ठेवली, तरी तुमच्या प्रत्यक्ष मुलीचें अंतःकरण यांत दुखवतें किंवा नाहीं, याचा तरी तुम्हीं विचार करायला नको काय? "

" आमच्या मुलीचें कल्याण आम्हांला कळतें. तिचें कल्याण व्हावें, म्हणूनच आम्हीं तिला योग्य असा नवरा शोधून काढला आहे." नीरजाकाकू म्हणाल्या.

मनोरमेच्या मनावर ह्या संभाषणाचा फारच तीव्र परिणाम होत होता. ती सहसा वडील माणसांच्या शब्दावर बोलत नसे; पण आज तिला तो उमाळा आवरेनाच! ती म्हणाली, " आई, तुम्हांला खरोखरच माझें कल्याण करायचें आहे ना? मग मला सांगा, मला आवडते, ती माझ्या आवडीची सौभाग्याची जोड मला मिळवून देणें रास्त, का तुम्हांला वाटते, ती देणें रास्त? तुम्ही मला अज्ञान म्हणतां; पण आतां थोडीशी भीड सोडून बोलत्यें, बाबा, पंधरा वर्षांच्या वयाची न्हातीधुती मुलगी स्वतांच्या आवडीनिवडीचा नवरा शोधून काढायला अज्ञान का? खरेंच, मीं या माझ्या लग्नाच्या बाबतींत माझ्या मनांत भविष्यकालीन सुखसोहळ्यांचे किती ऊंचऊंच मनोरे रचले आहेत! आई, बाबा, तुम्ही दोघेंहि अपत्यसुखाचीं भोक्तीं आहां. तुम्हांला नातवंडांची भारी हौस आहे. लग्नानंतर वर्षाचे आंत माझ्या पोटीं देवानें एका राजबिंड्या बाळाचा पाळणा बांधावा, तो सुखरूपपणें जन्माला यावा, त्याच्या बाललीलांनीं माझें माहेर व माझें सासर हीं नंदनवनें बनावीं, त्या नंदनवनांत बसून आपल्या नातवाला खेळवीत 'हीच काशी; हाच रामेश्वर' मानून सुखासमाधानानें भाग्यवंतासारखी आपली जीवनयात्रा पुरी व्हावी, असे किती तरी नवस तुम्ही

देवाला केले आहेत. ही तुमची पवित्र इच्छा पूर्ण करण्याला तेहतीस कोटि देव तयार असतां, संसाराच्या मंदिरांत बसून आम्ही उभयतां तुम्हां वडील माणसांच्या आशीर्वादानें व तेहतीस कोटि देवांच्या कृपेनें तुमचें मातृऋण पितृऋण फेडणार,-त्या आमच्या संसाराच्या मनोगतांची तुम्हीं अशी होळी केली, तर त्यांत आमचीं आम्ही व आमच्या उदरीं जन्माला येणारीं तुमचीं नातवंडें जळून खाक होणार नाहींत का ?"

हरिहरपंत एक दीर्घ उसासा सोडून म्हणाले, "आतां मात्र मनू बदलला खरा !"

अनंत म्हणाला, "मनू कांहीं बदलला नाहीं; पण हरिहरपंत, तुम्हां आई-बापांची बुद्धि मात्र विसाव्या शतकांत बदलत चालली आहे खरी. तुम्ही घरंदाज म्हणवतां, व आपल्या घरंदाज मुलींचे असले सौदे ठरवतां. तुम्ही आम्हां आर्यांची परंपरेनें चालत आलेली विवाहपरंपरा पायांखालीं तुडवून एकाच वेळीं अनेक वरांना आपली मुलगी देऊं करतां, व श्रीमंतीच्या वैभवाच्या मोलानें बायको विकत घेणारा एखादा वर सांपडेल, त्या गिऱ्हाइकाला आपली मुलगी देतां.—असा पोटच्या मुलींचा उघड उघड व्यापार तुम्ही करतां. ह्या तुमच्या बदललेल्या हीन बुद्धीनें विसाव्या शतकांतील बदललेल्या मनूलाहि खालीं पाहायला लावलें आहे."

"मी तरी तेंच म्हणत्यें बाबा, आपण मला तिकडे देऊं केली, सर्व कांहीं ठरलें. आम्हां दोघांचेंहि वय कांहीं लहान नव्हे. त्यांच्या मायेच्या शेल्याशीं माझ्या प्रेमाच्या शालीची गांठ तुमच्या साक्षीनेंच मारली गेली, मग आतां असें कां ?" मनोरमा म्हणाली. या वेळीं नीरजाकाकूंनीं जणूं काय मनोरमेला अलग गिळण्यासाठीं आपले डोळे वटारले.

हरिहरपंतांनीं विचारलें, "मग तुमचें म्हणणें तरी काय? जो भेटेल त्या मुलाला त्याच्या परिस्थितीचा विचार न करतां एकदम मुलगी द्यावी ?"

अनंत उत्तरला, "नाहीं. माझें तसें म्हणणें नाहीं; पण ज्यांना नवराबायकोचें नातें व व्यवहार कळतात, अशा निळकंठ-मनोरमेसारख्या जाणत्या मुलांमुलींच्या जन्माची सोबत पहातांना वरपरीक्षेला किंवा वधूपरीक्षेला व्यापाराचें स्वरूप येऊं नये, ह्याविषयीं तुम्ही पालकांनीं पहिल्यापासून खबरदारी घेतली पाहिजे. एकाच मुलाच्या किंवा मुलीच्या मनांत अनेक मुलींविषयीं

किंवा मुलांविषयीं बायकोपणाची किंवा नवरेपणाची जाणीव वरपरीक्षेच्या किंवा वधूपरीक्षेच्या नांवाखालीं उत्पन्न करून देतांना तुम्ही आईबापच आपल्या मुलांमुलींना जबरीनें एकपत्नीव्रत व एकपतिव्रत यांचा भंग करायला शिकवतां. ह्या वधूवरांच्या सट्टेबाजींत बहुधा आईबापांच्या मर्जीविरुद्ध वधूवरांचे प्रेमसंबंध जुळणें संभवनीय असतें, व तें वडील माणसांच्या नापसंतीनें आंधारांत राहून त्या मुलांमुलींचीं लग्नें परक्या मुलांमुलींशीं झाल्यावर ते आंधारांतील प्रेमसंबंध मुळांतला पवित्रपणा सोडून व्यभिचाराच्या हिडीस स्वरूपानें उजेडांत येतात. असलें हें पाप त्या मुलांमुलींच्या बापांच्याच माथीं मारणें योग्य नाहीं काय ? ”

मनोरमा म्हणाली, “ बाबा, सुधारकांची प्रौढ वयांत लग्नें करण्याची चाल तेवढी मात्र तुम्ही उचलली व मला प्रौढ होऊं दिली. माझ्या आवडीनिवडी ठरविण्यालाहि तुम्ही मदत केली. बरें; इतकेंहि करून मीं माझ्या वराची निवड केली, तीहि तुम्हां वडील माणसांच्या संमतीनेंच केली ना ? तुम्ही क्षणभर अशी कल्पना करा कीं, ते वर तुम्ही पसंत केले असते व मीं नापसंत केले असते, तर अमकातमका जांवई केवळ आपल्या मुलीच्या हेक्यानें आपल्याला मिळाला नाहीं, म्हणून तुम्हांला किती बरें वाईट वाटलें असतें ? इतकी तुम्हांला तुमच्या मुलीची कळकळ ! मग ज्यांच्या सेवेंत माझा हा देह झिजायचा आहे, ती सौभाग्यदेवता माझ्या आवडी–निवडीप्रमाणें मला मिळाली नाहीं, तर त्या बद्दल मीं किती बरें दुःखी व्हावें ? बाबा, तुम्ही मला एखादा श्रीमान् वर पाहिला असेल; यांत माझें कल्याण व्हावें, हाच तुमचा हेतु असेल. तुम्ही म्हणतां, त्याप्रमाणें तो छत्तिसगुणी आहे, असें गृहीत धरून चाललें, तरी त्याच्याकडे पाहाण्यासाठीं भावी वधूची दृष्टि मी आतां कुठची आणूं ? प्रौढ मुली जर नेहमीं रूप, संपत्ति, पदव्या यांच्या प्रमाणांत रोज रोज नव्यानव्या पुरुषांवर प्रेम करूं लागल्या, तर त्यांच्या अंतःकरणांत पतिश्रद्धेला वाव कुठचा मिळेल ? तुम्ही क्षणभर अशी कल्पना करा कीं, माझें लग्न माझ्या आवडत्या सौभाग्यदेवतेशीं एकवार झालें आहे. त्या नंतर आम्ही तुमच्या पुण्यांत जाऊन तुम्ही सांगतां त्या मुलाच्या घराशेजारींच घर घेऊन संसार करूं लागलों, त्या मुलाची संपदा, विद्वत्ता व सौंदर्यहि माझ्या सौभाग्यदेवतेपेक्षां कांकणभर सरस असलें व तो मला जास्त आवडूं लागला, तर तुम्ही त्या माझ्या आवडीला पाप

म्हणाल ना ? तशीच कल्पना आतां करा कीं, तिकडच्याशिवाय सारे पुरुष मला पतिपत्नीप्रेमाच्या नात्यांत तरी बापभावांइतके परके आहेत. ते कितीहि वैभवशाली असले तरी मला काय त्याचें ? तें वैभव माझ्यासाठीं नाहीं व मला तें नकोहि. त्या परक्या पुरुषांची बायको होण्याचें पाप मी करावें, अशी अधम इच्छा तुम्ही तरी आपल्या हृदयाशीं कां उगाच बाळगतां ? ”

मनोरमेचे हे बोल ऐकून मात्र नीरजाकाकूंचा क्रोधाग्नि भडकला. त्या मनोरमेवर दांत ओंठ खात म्हणाल्या, “ ही कार्टी असली जहांबाज निपजणार हें मला पूर्वी कळलें असतें तर हिचें नाळ कापण्यापूर्वीच मी हिच्या गळ्याला नख लावलें असतें. ”

मनोरमा यावर न डगमगतां उत्तरली, “ मग ती वेळा अद्यापिहि गेली नाहीं आई ! माझी मान अद्यापि पूर्वीसारखीच कोंवळी लुसलुशीत आहे. माझ्या जीवनावरचीं ही मानेची माती तुला तुझ्या नखांनीं सहज कुरतडतां येईल. ये–आई, ये. पाहिजे तर या क्षणाला माझ्या मानेला नख लाव ये. हें माझें शरीर तुझ्याच रक्तामांसाचें आहे. बाबा, आई, तुम्हीं मानवी देह धारण करून ही माती या देहाच्या स्वरूपाला आणली, ती पुन्हां मातींत मिसळून टाकण्याचा तुम्हां दोघांनाहि पूर्ण अधिकार पोंचतो. ये आई, ये ! माझ्या मानेला नख लाव ये ! ”

“ कार्टे ! ” असें म्हणून संतापानें आंधळ्या होऊन नीरजाकाकू मनोरमेला मारायला धांवल्या, पण मामी त्यांना अडवून म्हणाल्या, “ खबरदार आत्या, मनूच्या आंगाला हात लावशील तर ! मग मात्र मी त्या गांवची नव्हे. ”

नीरजाकाकू मामींसमोर येऊन उभ्या राहिल्या व विचारूं लागल्या, “ तूं कायग करणार ? आमचीं डोकीं मारणार ? ये पाहूं मार कशी मारतेस ती ! ”

अनंत व माधव, हें प्रकरण हातघाईवर आलेलें पाहून मध्यें पडले व सर्वांची समजूत करूं लागले. ह्या साऱ्या भांडणाचें मूळ माझ्या पायांशीं आहे, हें मला दुःखाला कारण झालें. मी हरिहरपंत व नीरजाकाकू यांच्या पायां पडून विनवणी केली, “ माझ्यासाठीं तरी तुम्ही अशा भांडूं नका. एवढी मला भीक घाला. अर्थाअर्थी तुमचा माझा कांहीं संबंध नाहीं; मामामामींनीं मनावर घेतलें होतें, म्हणून ! नाहीं तर कुठचा मी; कुठची मनोरमा ! ही काशीची कावड रामेश्वराला पावती करण्याचें श्रेय मामामामींच्या प्रयत्नांना मिळालें नाहीं, तर ती देवाची इच्छा ! त्यासाठीं आप्तमंडळींत निष्कारण वितुष्ट कशाला ? ”

कसा नकळे; पण माझ्या बोलण्याचा वचक सर्वांना क्षणभर बसला. नीरजाकाकू मला म्हणाल्या, " निळकंठ, हें वितुष्ट वाढवणें किंवा वितळवणें आतां सर्वस्वी तुमच्या हातीं आहे. "

" तें कसें काय? " मीं विचारलें.

" तुम्ही यमुनेला पदरांत घेतली—"

यापुढचे निरजाकाकूंचे शब्द ऐकण्याला माझे कान तयार नव्हते. मी उत्तरलों, " माझ्या आयांबहिणींकडे पतीच्या दृष्टीनें पाहाण्याची माझी तयारी नाहीं. "

यावर उत्तराला प्रत्युत्तर वाढूं नये, अशी माझी इच्छा असल्यानें मीच त्या बैठकींतून काढता पाय घेतला. जातां जातां माझ्या कानांवर नीरजाकाकूंचे पुढील शब्द मात्र ओझरते येऊन आदळले, " मनोरमेला पुण्याला घेऊन जाऊं व एकदां ठरलेलें लग्न उरकून घेऊं, त्याशिवाय हें वितुष्ट वितळावयाचें नाहीं. "

* * * *

तरी मामींनीं मला प्रथमच सांगितलें होतें कीं, हरिहरपंत—नीरजाकाकू ही मंडळी शहरांत वागलेली असली, तरी आपल्यासारखी उदारमतवादी नाहीं; त्याचा प्रत्यय हा असा आला. मामींनीं वाङ्‌निश्चयाच्या वेळीं उपस्थित केलेला प्रश्न केवळ लग्नापुरता होता, म्हणून मीं तो त्या वेळीं मनावर घेतला नाहीं. मीं मामांना, मामींना स्पष्ट सांगितलें कीं, मी हुंड्याला माळ घालणार नाहीं, मी हरिहरपंतांच्या संपत्तीलाहि माळ घालणार नाहीं, तर मनोरमेला माळ घालणार आहें. ती पृथ्वीच्या मोलाची जिवंत ठेव हुंड्याच्या सोनेरी वर्खाखालीं झांकूनच माझ्या घरीं माझ्या सासूसासऱ्यांनीं आणून पोंचती केली पाहिजे; असला खेडवळ हट्ट धरून बसणारा हलक्या प्रतीचा जांवई मी नव्हे. मी—हरिहरपंत व नीरजाकाकू यांच्या एकुलत्या एका मुलीला नुसत्या एका पिंवळ्या वरणी-चोळीनिशीं तिच्या माहेरून माझ्या घरीं आणीन आणि केवळ निढळच्या घामानें संपादन केलेलें मणिमंगळसूत्र तिच्या गळीं बांधून मांडवपरतणीच्या वेळीं ती श्रीमंताची लेंक, तशी विद्यावंताची व शीलवंताची सहचारिणी शोभवीन, असलीं रमणीय चित्रें मीं रोजच्या रोज प्रेमाच्या रंगांत कल्पनेचा कुंचला बुडवून त्या कुंचल्यानें मनाच्या रंगपटावर रंगवीत आलों; पण हरिहरपंतांनीं त्या चित्रांवर नकाराचा बोळा फिरवून त्यांची अशी दुर्दशा करावी ना! संसार!

संसार! संसार! हा संसाराचा हव्यास मला आजपर्यंत केवळ मनोरमेच्या प्राप्तीच्या आशेनें लागून राहिला होता; ती मनोरमा आतां मला सोडून जाणार– माझ्या डोळ्यांआड होणार! मग माझा संसार कसा थाटणार! माझ्या दारीं दिवा लावणारी माझी देवता मनोरमा––त्या गरीब गाईच्या मानेला दुराग्रहाची दोरी लावून तिचे आईबाप तिला माहेरीं हांकून नेऊं लागले; आतां माझ्या दारीं दिवा लावून माझ्या संसारांतील आंधार कोण दूर करणार!

ह्या माझ्या दुःखावर डागण्या देण्यासाठींच कीं काय, हरिहरपंतांनीं मनोरमेसाठीं पुण्याचा जो वर नियोजित केला होता, त्यानें केलेल्या दुर्वर्तनाचे पुरावे मामींनीं माझ्या हितासाठीं म्हणून हरिहरपंतांसमोर मांडले. रोज मामींनीं हरिहरपतांच्या भावी जांवयाची एक ना एक कागाळी हरिहरपंतांना व नीरजाकाकूंना सांगावी, ती मनोरमेनें ऐकावी, व डोळ्यांवाटे अश्रु गाळतां गाळतां लुगड्याचा पदर भिजवून ओला चिंब करावा! मनोरमेच्या डोळ्यांना पाणी आणि तें मीं माझ्या डोळ्यांनीं पहावें, त्यापेक्षां माझेच डोळे मिटले तर बरे, असें मला वाटूं लागलें.

असा प्रकार चालला असतां आमचा ठरलेला लग्नदिवस निघून गेला. त्यांत आणखी कांहीं नव्या दिवसांची भर पडली, व हरिहरपंतांच्या सत्तेच्या मुलीचा लग्नदिवस उजाडण्याची वेळा एका पंधरवड्यावर येऊन थडकली. हरिहरपंत मनोरमेला घेऊन जाणार, याविषयीं आतां कांहीं शंका उरली नाहीं. या त्रासांत आणखी त्रास म्हणून रोजच्यारोज कोणत्या ना कोणत्यातरी कारणावरून मामांच्या कारखान्यांत माझ्याशीं गुणवंतरावांचा खटका उडूं लागला. कारखान्यांतून घरीं यावें तों मनोरमा नव्या नव्या घरगुती चहाड्या सांगण्यासाठीं टपूनच बसलेली असे. तिनें आपल्या आईच्या, बापाच्या, मामांच्या, मामींच्या, सर्वांच्या चहाड्या मला सांगाव्या. जसा कांहीं मी तिचा परमेश्वरच होतों. मी तिला वेळोवेळीं सांगत असें,––" वेडे, उद्यां तूं दुसऱ्याची अर्धांगी होऊन पुणेकरीण बनल्यावर जर अशीच आपल्या नवऱ्याला चहाड्या सांगूं लागलीस, तर तुझा पक्षा कसा येईल?"

बाबा स्वर्गी गेले; आई स्वर्गी गेली. आतां मामामामी हींच माझीं मातापितरें होतीं. आपले आईबाप जन्मभर जगावे, व—त्यांना पुत्रशोक होईल, हा प्रश्न विचारांत घेतला नाहीं तर–आपण त्यांची अनन्यभावनेनें सेवा करून

त्यांच्या डोळ्यांदेखत इहलोकच्या जीवनव्यापाराचा पसारा आटोपता घ्यावा, असें मला नेहमीं वाटत असे. पण ! –त्यांच्या पश्चात् त्यांची उणीव भरून काढणारीं जीं माणसें मला आढळलीं, तीं मामामामी ! त्यांच्यावर जन्मदात्या मातापितरांसारखें प्रेम करावें, असें पहिल्यापासून मला वाटे, व मी स्वतां तसा वागेंहि. पण खरेंच सांगायचें तर मी इच्छीत होतों, तितका मामींना किंवा मामांना माझा लळा लागला नाहीं. मामांना तर मी दिवसेंदिवस थोडथोडा नावडताच होत चाललों होतों. मात्र, ते विचारी थोर व खोल मनाचे असल्यानें त्यांनीं आपली नावड चवाठ्यावर येऊं दिली नव्हती. मी त्यांच्यावर जीवाभावापलीकडे प्रेम करावें, व त्यांनीं मात्र माझ्याशीं परकेपणा ठेवावा, हें मला कसेंसेंच वाटे. मामांच्या निरुपद्रवी स्वभावाला जरी हें भूषण असलें, तरी माझ्यासारख्या सडेतोड माणसाला असला भिडस्थपणा कसा आवडावा ! मी मनांतून इच्छित होतों कीं, माझ्या मातापितरांचे अधिकार मामीमामांनीं आपल्या हातीं घ्यावे, मी चुकलों तर त्यांनींच मला सत्तेनें शासन करावें, व एखादी नांवाजण्यासारखी गोष्ट केली, तर त्यांनींच माझी वाखाणणी करावी. द्वाड स्वभावाचीं मुलें अनेकदां चुकतात, तसा मीहि अनेकदां चुकें. चुकीबद्दल त्यांच्या मातापितरांनीं त्यांना रागें भरावें, त्यांच्यावर त्यांनीं रुसावें, व घटकेभरानें पुन्हां ‘ आई–बाबा ’ अशी ममतेची हांक मारीत त्यांच्यापाशीं जावें, हे मानापमानाचे खेळ मला मामामामींपाशीं खेळतां येतील अशी आशा होती व हौसहि होती. पण ती फुकट ! कधीं मी चुकलों तर तीं चुकलास म्हणत नसत; अर्थातच एखादें कौतुकास्पद कार्य माझ्या हातून झालें तर त्याचें कौतुकहि करीत नसत ! याला परकेपणा नाहीं तर काय म्हणायचें !

होतां होतां हा मुग्धपणा आम्हां सर्वांना जाचक होऊं लागला. मामामामींपाशीं माझ्या विरुद्ध कुणीं चार कागाळ्या सांगितल्या तर त्यांनीं त्या माझ्यापाशीं बोलूं नयेत, व माझ्यापाशीं त्यांच्याविषयीं कुणी कांहीं बोललें तरी मी त्यांच्यापाशीं बोलूं नये. हा आमचा कायम ठशाचा स्वभाव पाहून आमच्या ऋणानुबंधांत बिब्बा घालणाऱ्या पुष्कळ चुगलखोरांचें नेहमीं फावे. मामामामींना कुणीं वाईट म्हटल्यावर त्यांचा कैवार घेऊन तसें बोलणाराबरोबर भांडण करून त्याला चीत करावें, असें मला वाटे ! पण प्रतिकूल परिस्थिति मला तसें करूं देत नसे.

या संधीचा फायदा सरस्वतीबाई, गुणवंतराव व त्यांच्या हातचें बाहुलें बनलेली लीला पुरेपूर घेत आहेत, याची मला दादहि नव्हती. या कामीं मनोरमा मात्र फारच चाणाक्ष होती. तिला कशा नकळे, पण शत्रुपक्षाच्या साऱ्या हालचाली बिनतोड कळत असत. एकदां मनोरमेनें मला सांगितलें, सरस्वतीबाईच्या तोंडावर मामी आपल्याला–मला कमीपणा आणीत होत्या. दुसऱ्या दिवशीं मला भेटूनहि त्या तसेंच म्हणाल्या. इतकेंच काय, पण मनोरमेला हरिहरपंतांनीं मला द्यायचें नाकारलें, यांतहि आंतून मामींचें बरेंच आंग आहे, असेंहि मला ह्या शत्रुपक्षामार्फत कळलें.

याच्या उलट, माझ्या वर्तनाविषयीं खोट्यानाट्या कंड्या मामामामींना येऊन सांगण्याचा सरस्वतीबाईचा आपल्या सारथ्यांसह उद्योग चाललाच होता. त्या मला नकळत मामामामींच्या मनांत माझ्याविषयीं व माझ्या मनांत मामामामींविषयीं विष कालवीत होत्या. याचा परिणाम होतां होतां असा झाला कीं, मला मामामामींशीं उघड्या मनानें वागतां येईनासें झालें. याच वेळीं मी माझें कर्म समजून चुकलों कीं, ज्या अर्थी या ठिकाणीं मनाचा उघडेपणा नाहीं, त्या अर्थी आपले जास्त दिवस या ठिकाणीं निघणें शक्य नाहीं.

*　　*　　*　　*

शेवटीं एके दिवशीं मनोरमेनें मला पुन्हां बजावलें कीं, गुणवंतरावांचीं कांहीं कारस्थानें चाललीं आहेत व आज दोनप्रहरीं लीला आमच्याकडे यायची आहे.

मनोरमेनें सांगितल्याप्रमाणें खरोखरच आज लीला दोनप्रहरीं माझ्याकडे आली व रडकुंडीला परतून माझी क्षमा मागूं लागली. बायकोची जात, तशांत विधवा. तिच्या हातून अन्याय घडला तर घडला; पण वेळींच तिचें मन पश्चात्तापानें पावन झालें, याविषयीं मला आनंद वाटला. स्वतांच्या अनुतापाबरोबर तिनें यमुनेचें वकीलपत्रहि आणलें होतें. ती म्हणाली, “यमू जरा आजारी आहे. आपल्या आईच्या पापांत आपल्याला वांटेकरीण धरूं नका असा तिचा निरोप आहे व लग्नाच्या बाबतींत जिव्हाळ्याचे दोन शब्द आपणासमक्ष बोलावे, अशी तिची इच्छा आहे. यासाठीं आपण तिकडे चला.”

यमुनेची आई किंवा गुणवंतराव माझ्या सत्यनाशाचे उपाय योजीत होतीं, यांत यमुनेचा बिचारीचा काय अन्याय! तिच्याविषयीं माझ्या मनांत राग किंवा रोष मुळींच नव्हता. तिच्या शब्दाला मान देणें हें माझें काम होतें.

यमुनेच्या घरीं गेल्यावर पाहिलें, तों यमुनेला झोंप लागली होती. सरस्वतीबाई कुठें बाहेर गेल्या होत्या व गुणवंतराव आपल्याच खोलींत वाचीत बसले होते. गुणवंतरावांना पाहून लीला लाजली व मला आपल्या निजण्याबसण्याच्या खोलींत घेऊन गेली. मी आंत गेल्याबरोबर तिनें एकदम दरवाजाला आंतून कडी लावून घेतली.

लीलेनेंच प्रथमतः बोलायला प्रारंभ केला, " निळकंठ, पूर्वीच्या देशसेवा व लोकसेवा यांच्या कल्पना आपल्या डोक्यांतून गेल्या काय? "

मी उत्तरलों, " नाहीं. त्या कल्पना कांहीं लयाला गेल्या नाहींत; पण त्यांचीं पुरस्कर्ती आम्ही आमच्या कर्मकथेचें वाचन करण्यांत गढून गेल्यामुळें त्यांना मूर्त स्वरूप येण्याची मात्र सध्यां तरी आशा नाहीं. "

" मी आपली संगत सोडून सरस्वतीबाई व गुणवंतराव यांच्या नादीं लागल्यें, याविषयीं आपल्याला, माधवांना, अनंतांना, नलिनीला–सर्वांनाच वाईट वाटत असेल नाहीं? ही सारी मंडळी मनांतून मला दोषहि देत असतील. "

" तूं स्वतांच्या मनाला चोरून खरोखरच जर कांहीं पाप केलें नसशील, तर तुला जगाची भीती वाळगण्याचें काय प्रयोजन? बाकी, तूं कर्तव्याला चुकलीस म्हणून मात्र आम्हांला विषाद वाटतो. पण सध्यां तरी सर्वांच्याच कर्तव्याला चूड लागली आहे. अनंत त्या परीनें निराश झाला, माझी व मनोरमेची ही दशा, तूं हा रस्ता पत्करलास,–आतां एकटा माधव इतक्या साऱ्या मंडळीला चैतन्य देईल तर! नलिनी मात्र अद्याप निराश झालेली नाहीं. तिला आशा आहे कीं, आज ना उद्यां माधव तिचा स्वीकार करील. "

" नलिनीची ती आशा फुकट आहे. " लीला म्हणाली.

" कां बरें? " मीं विचारलें.

" तुमचें गोत्र कौशिक ना? "

" होय. "

" झालें तर! तुमचें व माधवरावांचें गोत्र एक. आज सरस्वतीबाई सहज गोत्रांची चौकशी करीत होत्या, तेव्हां हें सारें कळून आलें. सगोत्र मुलगा-मुलगी बहीणभावांसारखीं मानलीं जातात. त्यांचा विवाह धर्मनिषिद्ध आहे. "

आमचें व माधवरावांचें गोत्र एक ही गोष्ट हा वेळपर्यन्त आमच्या ध्यानीं-मनींहि आली नव्हती. आम्ही सुशिक्षित म्हणवतों, असें असतां लग्नघटके-

पर्यंत गोत्राची चौकशीहि आम्हीं केली नाहीं, याची मला लाज वाटली. पण याहि गोष्टीला एक उपाय मला आठवला. मीं लीलेला सांगितलें, " एवढी गोत्राचीच अडचण आली, तर ती नलिनीला किंवा माधवाला सहज दूर करतां येईल. लग्नापुरतें नलिनीला किंवा माधवाला कुणाच्या तरी मांडीवर दत्तक द्यावें व मग लग्न करावें. ज्या ज्या वेळीं एका गोत्राचा अडथळा येतो, त्या त्या वेळीं लोक ह्या वाममार्गाचा अवलंब करतात. "

" मग तसा प्रयत्न करून पहा तर. पण–आतां मीं काय करावें अशी आपली इच्छा आहे ? "

" तूं यापुढें तरी कधींहि लोकांच्या इच्छांना बळी न पडतां स्वतांच्या सदसद्विवेक बुद्धीला पटेल अशा रीतीनें वाग. " मी म्हणालों.

यावर लीला म्हणाली, " खरेंच सांगत्यें, निळकंठ, माझी सदसद्विवेकबुद्धि मला सोडून गेली आहे. मनोविकारांनीं मला आपली दासी बनवलें आहे—"

बोलतां बोलतां लीलेच्या चेहऱ्यावर निराळीच कसली तरी छटा उमटलेली दिसली. तरुण विधवांच्या अंतःकरणांत मुसमुसलेल्या तारुण्याचा वैधव्याच्या होमकुंडांत होम सुरू झाला, कीं त्याच्या ज्वाला थेट अशा त्या विधवांच्या गालांवरून तरळत असलेल्या मीं कितीतरी वेळां पाहिल्या होत्या. त्या ज्वालांनीं लीलेच्या गालांवर लाली चढलेली पाहून मी तिला म्हणालों, " लीले, तूं पुनर्विवाह करावास, असें मला वाटतें. "

" पण कुणाशीं करावा ? " लीलेनें विचारलें.

" तुझ्या आवडीच्या पतीशीं करावा. " मी उत्तरलों.

" मला तुम्हीं दोघे आवडतां, पैकीं अनंत तर पुनर्विवाहाच्या विरुद्ध बंड करणारे आहेत, त्यांचा प्रकार तुम्हांला माहीतच आहे. आतां एक वर रहातां बाकी राहिला.—आपलें व मनोरमेचें तर लग्नच होत नाहीं. यमुनेशीं लग्न करण्याची आपली इच्छा नाहीं.–आपण मला पदरांत घेणार नाहीं का ? "

लीलेनें हा प्रश्न मला विचारावा ! मी तर हे अनपेक्षित बोल ऐकून स्तंभितच झालों. तिला माझे आचारविचार वगैरे सारें कांहीं माहीत होतें. आतां तिच्याशीं बोलणार काय ! पण मी बोलत नाहीं, याचा अर्थ तिनें मौनसंमति असा घेतला व माझा हात धरून तिनें मला आपल्या बिछान्यावर नेऊन बसवलें. जवळच कांचेच्या कपाटांत कुंकवाचा करंडा होता, तो घेऊन तिनें आपल्या भालप्रदे-

शावर कुंकवाचा टिळा रेंखला व माझ्या मांडीला मांडी भिडवून माझ्या शेजारीं बसून ती एकदम मला विचारूं लागली, " मी आपली सेवा करूं का ? "

मी थरारलेल्या वृत्तीनें ताड्कन् उठून दूर उभा राहिलों व तिला म्हणालों, " मी तुझा भाऊ आहें; तूं माझी बहीण आहेस. समजलीस लीले ? "

" तें कांहीं असलें तरी या वेळीं आपण माझी सेवा घेतली पाहिजे, नाहीं तर माझ्या खोलींत येऊन आपण माझ्यावर बलात्कार करीत होतां, म्हणून आपल्या नांवानें मी ओरडत्यें. " लीला माझा हात धरून म्हणाली.

" खुशाल ओरड. " मी उत्तरलों, " ह्या ब्रह्मांडाचा निर्माणकर्ता सैतान नसून परमेश्वर आहे, त्याच्या राज्यांत परिणामीं तरी सत्याचाच जय होईल. "

मी वेगानें दरवाजाची कडी काढायला जातों, तों लीलेच्या अंतःकरणांत खरोखरच कोणी सैतान येऊन उभा राहिला. ती ' धांवा ! धांवा ! ' अशी मोठ्यानें ओरडली. त्या ओरडीसरसे गुणवंतराव व त्यांच्या मागोमाग चाळींतले इतर लोक धांवून आले. यमुनाहि त्या ओरडीबरोबर दचकून जागी होऊन लीलेच्या खोलींत येऊन घाबऱ्या घाबऱ्या विचारूं लागली, " लीलाताई, कायहो झालें ? "

कोणी कांहीं बोललें नाहीं. लीला कांहींच बोलेना; माझ्या तोंडावाटे तर शब्दच उमटेना. लोकांना कोणी बोलल्याशिवाय खरा प्रकार समजून चुकला. पण तो काय !—" बाहेरून सभ्यपणाचें सोंग पांघरून नीतिमत्तेच्या लंब्या बाता मारणाऱ्या निळकंठानें लीलेला भर दोनप्रहरीं एकटी गांठून तिची अब्रू घेण्याचा नीच प्रयत्न केला, तेव्हां लीला ' धांवा धांवा ! ' असें ओरडली म्हणून सुटली ! "

कितीएकांना वाटलें कीं, मला पोलिसांच्या ताब्यांत देऊन माझ्यावर फिर्याद करून मला डोंगरीवर खडी फोडायला पाठवावें. पण यांत लीलेची अब्रू जाते, म्हणून शेवटीं सर्वांनीं तो विचार रद्द केला.

याच क्षणाला बहुजनसमाजानें ह्या दुर्दैवी आनंदाच्या मस्तकावर अशीं काळीं अक्षरें लिहून ठेवलीं, " निळकंठ, तूं दुराचारी आहेस. तुझ्या दुराचारांना ही सारी चाळ साक्ष आहे. या साक्षीपुराव्यावर यापुढें जन्मभर जग तुला व्यभिचारी सैतान म्हणणार ! "

या भयंकर दिव्यांतून मोकळा झाल्यावर मी लाजेनें मेल्यापेक्षांहि मेला होऊन

घरीं निघालों, तेव्हां माझ्या ह्या खोट्या बदलौकिकाचा डंका आजपासूनच सर्वत्र वाजणार, याची तर मला खंत वाटलीच; पण लीलेच्या अस्थानीं धाडसानें व सैतानी वृत्तीनें स्त्रीचरित्राची अगाधता कशी अजरामर करून ठेवली, याचें विषादपूर्ण कौतुक मला तेव्हां हंसवूं लागलें !

कांहीं न करतां न सवरतां आंगाला पाप चिकटलें, यासाठीं मुक्या सुरानें रडत बसलेल्या माझ्या मनाला मीं समजावून सांगितलें, "वेड्या मना, रडूं नकोस. हीहि एक जगाची रीत आहे !"



# झुळुक बारावी

## मनोरमा (३)

लोक तरी किती चहाडखोर असतात! निळकंठांवर लीलेच्या नांवानें असा प्रसंग आला, ही गोष्ट दुसऱ्या दिवशींच्या वर्तमानपत्रांतून मोघम नांवांनीं फडकूं लागली, ती कुणीतरी चहाडी केल्याशिवाय थोडीच फडकणार! या लावालावीचें श्रेय अगदीं पहिल्याप्रथम कुणीं पदरांत पाडून घेतलें असेल, तर तें गुणवंतरावांनीं! ते मुद्दाम आमच्या घरीं आले, व 'तुमच्या निळकंठानें आतांशा तरण्याताठ्या विधवांची अशी विटंबना चालविली आहे, त्याचा कांहीं बंदोबस्त करा.' असा आम्हांला उपदेश करून निघून गेले. नानाताईंना ह्या गोष्टी खऱ्याच वाटल्या. त्यांना निळकंठांचा राग आला व माझ्या आईबाबांना तर त्यांची निंदा करायला हें एक सबळ कारण सांपडलें.

आतांपर्यंत ताईनें बाबांचे व आईचे कान किटवून सोडले होते कीं, मनोरमेसाठीं तुम्ही पुण्याचा जो मुलगा पाहिला आहे, त्याचें वर्तन कांहीं चांगलें नाहीं; तो अखेर तुम्हांला दगा देऊन तुमच्या डोळ्यांतून अश्रु वाहाते करील. तीं ताईचीं बोटें ताईच्याच डोळ्यांत घालण्यासाठीं आतां आईबाबा ताईला विचारूं लागलीं, " वीणे, आम्ही मनोरमेसाठीं शोधलेल्या वरानें कांहीं अन्याय केले असले, तरी त्याचा तो करणारा व त्याचा तो निभावणारा समर्थ आहे. पण तूं शोधून काढलेल्या वराची अब्रू ही अशी कशी गाड्या भरून वाहूं लागली? "

यावर ताईला मूग गिळून स्वस्थ बसावें लागलें. ती मनांत म्हणाली असेल, " आपलेंच नाणें खोटें, तिथें लोकांना काय दोष देणार! "

यानंतर जी उठली ती माझी मैत्रिण मला हिणवूं लागली, " तुझ्या माहितीचा कुणी तरुण अलीकडे लोकां घरच्या तरण्याताठ्या बायकांवर दिवसाढवळ्या दरोडा घालूं लागला आहे, हें खरें काय? "

या वेळीं मी निळकंठांचा कैवार घेई; पण त्यांत माझें मात्र हंसें होत असे. मलाहि मोठा अचंबा वाटूं लागला कीं, असें कसें झालें! मी घरांत उद्यां त्यांची सत्तेची बायको व्हायची होत्यें ना; पण सहज लडिवाळपणानें एखादवेळीं खांद्यावर हात ठेवला, तरी तो त्यांना खपत नसे. इतकेंच काय; पण माझ्या आंगाला

कधीं आंग लागलें तरी त्यांच्या आंगावर कांटा उठल्यासारखें होई. मी औपरोधिक इच्छेनें पागलपणाच्या भरांत त्यांना एकदोनदां तर असेंहि सुचवलें होतें कीं, आमच्या उज्ज्वल प्रेमाचें कल्पनामय छायाचित्र एकमेकांच्या ओंठावाटे एकमेकांच्या गालांवर एकवार उमटवून दाखवावें. अशा वेळीं आमचे गाल लाल लाल कसे होतात, हें पाहाण्याची माझी इच्छा होती. पण निळकंठांनीं मला स्पष्ट सांगितलें कीं, हें पाप आहे; हें मी करणार नाहीं. मागाहून माझें मलाहि कळून चुकलें कीं, हा माझा उथळपणा आहे. त्यांच्यासारख्या शीलवंत तरुणाची मी वाग्दत्ता—मी कामुक विचारांना बळी पडून—सत्तेच्या सौभाग्यदेवतेशीं असलें तरी माझ्या देहदानाचें उदक त्यांच्या हातावर सुटायच्या पूर्वी त्यांना शीलभ्रष्ट कशी बनवूं व मी तरी कशी बनूं!

ही खासगींतली खासगी गोष्ट इथें सांगायचें कारण, निळकंठांवर जे अनीतीचे आरोप करण्यांत आले होते, तें केवळ कुभांड होतें. तशींच—आजकालच्या इतर प्रौढ वधूवरांप्रमाणें 'रोमान्स' किंवा 'कोर्टिंग' च्या नांवाखालीं आम्हांला पापें करायचीं असतीं, तर आमचा हात कोण धरणार होतें! आणि मला माहीत होतें त्याप्रमाणें साऱ्या लोकांनाहि माहीत होतें कीं, निळकंठांच्या हातून ही किंवा अशीच दुसरी एखादी चूक घडलीच असती तर ती माझ्याच बाबतींत घडली असती. पण तें कांहीं नाहीं; केवळ शुकाचा अवतार! मग लीला म्हणते तसें पाप करण्याचें साहस तरी त्यांना कसें करवेल!

माझी पक्की खात्री होती कीं, या बाबतींत गुणवंतरावांचें बरेंच आंग असलें पाहिजे. त्यांनीं माझ्यावरचा सूड निळकंठांवर काढला असला पाहिजे. आतां लीला त्यांच्या मताप्रमाणें स्वतांची अब्रू धोक्यांत घालायला कशी तयार झाली हा एक प्रश्न आहे. पण विषयसुखाच्या नादीं लागलेल्या व फाजील लोकांच्या तालमेंत तयार झालेल्या ह्या थिल्लर विधवा काय करणार नाहींत! या विधवांच्या पतींची चिता ज्या वेळीं स्मशानांत पेटती होते, त्याच वेळीं त्या अब्रू, स्त्रीत्व, लाज, भूतदया व नीति ह्या देवतापंचकाला आपल्या पतीबरोबर सती पाठवून निःसंग बनून घराबाहेर पडतात. मग त्यांना कसलें आलें आहे पापपुण्य?

या वेळीं सरस्वतीबाईनीं निळकंठांच्या विरुद्ध अकांडतांडव केलें नाहीं याचें कारण, यमुनेच्या लग्नाचा मोह त्यांना होता. शिवाय त्यांच्या पायांखालीं तरी आज काय जळत होतें! यमुना मात्र निळकंठांना दोषी म्हणायला तयार नव्हती.

ती उलट ज्याच्यात्याच्यासमोर निळकंठांचा कैवार घेत असे. ह्यामुळें तर ती मला इतकी आवडती झाली कीं, आमचाच प्रेमसंबंध देवाला आवडला नाहीं ती गोष्ट निराळी; नाहींपेक्षां ती माझी सवत झाली असती तरी मला आवडली असती. मग आम्हीं दोघींनीं मिळून त्या आमच्या सौभाग्यदेवतेच्या मस्तकावर जीवाभावाच्या प्रेमाची पांखरछाया धरली असती.

कोणीं कांहींहि म्हटलेलें निळकंठांना खपत असे; पण अनीतिमान् हीं अमंगळ अक्षरें आपल्या नांवामागें लावून घेण्याची मात्र त्यांच्या मनाची तयारी नव्हती. पण ते भोग आज ओढवले. त्यामुळें त्यांच्या मनावर असा कांहीं चमत्कारिक परिणाम झाला कीं, कुणाला वाटेल, यांना वेडच लागलें आहे. कुणींहि विचारावें, हा अपराध तुम्हीं केला का? यावर एकच उत्तर,-जग काय ठरवील तें खरें! मीं त्यांना सांगितलें कीं, अपराध हातून घडला असो कीं नसो, आपण नानाताईची क्षमा मागावी.

यावर मला निळकंठ म्हणाले, "क्षमा मागणार नाहीं असा माझा अभिमान नाहीं, किंवा मामामामींच्या पायांवर डोकी ठेवण्याचीहि मला लाज वाटत नाहीं. पण अशा प्रसंगीं क्षमा मागणें म्हणजे मामामामींच्या गैरसमजुतीला पाठिंबा देऊन जाणूनबुजून आत्मवंचना करणें आहे. आतांपर्यंतच्या मामांच्या सहवासांत मी जें शिकलों तें हेंच शिकलों कीं, स्वतां सत्य सोडायचें नाहीं व आत्मवंचना करायची नाहीं. माझा सत्पक्ष असेल, तर माझा पाठीराखा परमेश्वर आहे.' "

सत्य राहिलें सत्ययुगांत व परमेश्वर राहिला स्वर्ग-मोक्ष-वैकुंठांत! पण नानाताईचीं मनें मात्र निळकंठांविषयीं एकदां जीं बिघडलीं, तीं बिघडलीं. ताईच्या तोंडून आल्यागेल्याजवळ त्यांच्याविषयीं निंदेचे उद्गार निघूं लागले. आतांपर्यंत गुणवंतरावांनीं व त्यांच्या स्त्रीपुरुष साथीदारांनीं निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या मिषानें त्यांची जी निंदा नानाताईच्या तोंडावर केली होती, तिचीं जिवंत भुतें ताईच्या स्मरणशक्तीचा आधार घेऊन नाचूं लागलीं व 'आतांपर्यंत लोकांत जी निळकंठाच्या वर्तनाविषयीं ओरड होती, तीहि खरीच असली पाहिजे व लीलेशीं त्याचा जो दाट परिचय होता, तोहि यामुळेंच असला पाहिजे' असा तर्क त्यांच्या विचारौघाबरोबर वाहूं लागला.

माधवराव व अनंतराव यांना मात्र या गोष्टींतलें रहस्य समजून चुकलें. नलिनीहि निळकठांना दोष द्यायला तयार नव्हती. माधवराव व अनंतराव यांनीं

तर लीलेच्या साऱ्या लीला पडताळून पाहिल्या होत्या. लीलेच्या अलीकडच्या बेफाम वागणुकीवरून एखादा लहान मुलगासुद्धां कल्पना करूं शकला असता कीं ही कशा तऱ्हेची विधवा आहे तें. असें असतां ताईला संशय आला याचें कारण ताई बरीच हलक्या कानांची होती, व नानांना संशय आला याचें कारण स्वतःच्या उद्योगधंद्याशिवाय बाहेरच्या जगाचें अस्तित्वहि त्यांना फारसें माहीत नसल्यानें त्यांना आजपर्यंत इकडची माहिती मिळावी तर ती गुणवंतरावांकडून व रात्रौ ताईनें एखादा लोकापवाद बोलावा तर!

शेवटीं माधवराव व अनंतराव नानांपाशीं गेले व निळकंठांच्या तर्फेनें रदबदली करूं लागले. पण नानांचें मन निळकंठांविषयीं इतकें विटलें होतें कीं, 'निळकंठ आतां आपल्यापासून दूर जाईल तर बरा!' असें त्यांनीं स्पष्ट बोलून दाखवलें व बिचाऱ्या त्या दोघांना हिरमुसलें होऊन माघारें जावें लागलें.

निळकंठांनींहि मला सांगून ठेवलें होतें कीं, "उद्यां तूं माहेरीं गेलीस म्हणजे मलासुद्धां माझ्या व मामामामींच्या–दोघांच्याहि अब्रूसाठीं या घराला रामराम ठोकावा लागणार. ज्या ठिकाणीं एकमेकांचीं मनें एकमेकांविषयीं खुलीं नाहींत, ती जागा इंद्राचें नंदनवन असली तरी ती मला स्मशानापेक्षांहि भयाण वाटते. ब्रह्मांडांतील सुंदरतेचा जन्म नेहमीं जीवमात्राच्या चित्तांतील प्रसन्नतेच्या उदरीं होत असतो. ती प्रसन्नता माझ्यापुरती तरी आज मामांच्या पायांशीं मरून पडली आहे. आतां या प्रेताशेजारीं माझ्याच्यानें बसवत नाहीं."

आणि देव तरी किती मेला पाषाणहृदयी, पक्षपाती आणि फाटक्या कानांचा आहे! त्याला वाटलें कीं, त्यांना खरोखरच मामामामींचा कंटाळा आला आहे. त्यानें तीच इच्छा जमेला धरली. तो मामांच्या मुखीं उभा राहिला, व त्याच दिवशीं सायंकाळीं मामांनीं त्यांना आपल्या घरांतून निघून जायला सांगितलें.

कांहीं कांकूं न करतां नानांची ही आज्ञा निळकंठांनीं शिरसावंद्य मानली. मात्र त्या कठोर आज्ञेचा स्वीकार करतां करतां आकाशांतून तुटून पडणाऱ्या ताऱ्याच्या ओझरत्या तेजाप्रमाणें त्यांचा शक्तिपात होऊं लागला. मी जवळच उभी होत्यें; पण मी त्यांना सांवरून धरायला जाईन तर दरवाजाच्या आंतून सारी मंडळी उभी राहून मजा पाहात होती, तीं मला फाजील म्हणतील कीं काय, याचें मला भय वाटलें. तरीपण माझ्या मनावर माझा ताबा चालेना. त्यानें मला रडूं आणलें. रडूं आम्हां बायकांच्या जातीच्या पांचवीलाच पुजलेलें असतें!

माझ्या डोळ्यांना पाणी आलेलें आईला सहन झालें नाहीं. ती मला म्हणाली, " मनू, घरांत ये. "

वीज पडते पडते म्हणतां म्हणतां पडून सुद्धां जाते व पुन्हां जिकडे तिकडे सामसूम; त्यांतली अवस्था ! मी आंत गेल्यें, तेवढ्यांत निळकंठांच्या शरिराचा तोल न सांभाळला जाऊन त्यांनीं बाजूच्या कोचावर धाड्कन् आंग टाकलें.

आईनें दरवाजा लावून घेतला, तरी दरवाजाच्या आडून मी ऐकत होत्यें. निळकंठांनीं कळवळ्यानें ताईनानांची विनवणी केली, " मामा, मामी, मी तुम्हींला नावडता झालों आहें, त्या अर्थी तुमचे पाय सोडणें माझ्या कपाळीं ओघानेंच आलें आहे. त्याप्रमाणें मी काळें करून इथून चालता होतों; पण जातांजातां तुम्हां दोघांच्या पायांची शपथ घेऊन सांगतों कीं,—"

ताईचेच शब्द ते,–" आमच्या पायांची शपथ घेऊं नकोस बाबा ! शपथांचा खोटेपणा आमच्या माथीं बसला तर त्याचें काय घ्या ? "

" बरें; माझ्या गळ्याची शपथ घेऊन सांगतों, ज्या संशयाच्या भोंवऱ्यांत सांपडून तुम्ही माझ्या वांट्याला वनवास आणीत आहां, तो संशय खोटा आहे. " हे निळकंठांचे शब्द होते.

" संशय खरा असो, कीं खोटा असो, तुझा पाल्हाळिक वेदांत ऐकत बसायला आम्हांला सवड नाहीं. " असें म्हणून ताई आंत येत आहे, असें तिच्या पावलांवरून मीं ओळखलें. नाना तर यापूर्वींच बाहेर निघून गेले होते.

" मामी, तुमच्या मी पायां पडतों; पण माझ्याविषयीं दुज्या भावाला आपल्या मनांत थारा देऊं नका. निर्दोषी म्हणून गोडीगुलाबीनें मला एकदां तुमच्या दारांतून दूर जाऊं द्या. " निळकंठांनीं विनंति केली.

" माझ्या नकोस पायां पडूं; परमेश्वराच्या पायां पड, त्याला चांगली बुद्धि द्यायची विनंति कर, व बाहेर तरी आतां असले चाळे करूं नकोस. आज तूं आमच्या नांवाला व आपल्या नांवाला देखील असा बट्टा आणलास, तेवढा पुरे. हो दूर–माझ्या पायां पडूं नकोस. " हे शब्द ताईच्या तोंडून निघतात व ताई दरवाजा लोटते, तों दिवाणखान्यांत एकदम खळ्ळ्ळ् असा कसलातरी आवाज झाला.

आम्ही सारी मंडळी बाहेर येऊन पहातों, तों दरवाजांत एक मोठा थोरला आरसा टांगलेला होता, त्याची कांच फुटून तो खालीं पडला. आम्हीं ओळखलें

कीं, निळकंठांचा धक्का लागून हा आरसा फुटला असला पाहिजे. पण त्यांच्या खोलीसमोर जाऊन पहात्यें तों दरवाजाला आंतून कडी लागलेली!

कांच लागलीबिगली कीं काय, लागली असली तर ती कितपत लागली असेल, हें पहाण्यासाठीं माझा जीव तळमळत होता. पण ताईला आपला आरशाचाच हव्यास लागला होता. ती म्हणाली, "अडमडत चालतो कसा तो पहा! सोन्यासारख्या आरशाची काय दशा झाली ही!"

ताईला निळकंठांच्या जिवापेक्षां आरशाची किंमत जास्त वाटली. मनांत म्हटलें, "ताई, तुझा आरसा फुटला तर दुसरा घेतां येईल; पण निळकंठांच्या जिवाला कांहीं धोका झाला असला तर!"

* * * *

एकंदरींत आमच्या घरचीं सारीं माणसें निष्ठुर खरीं. कांच लागून निळकंठांच्या कपाळाला एवढी इजा झाली; पण कुणीं त्यांची विचारपूसहि केली नाहीं. ताईला मीं सांगितलें, जा आणि पाहून ये!—यावर ताई तिन्ही सांजांनंतर गेली व पाहून येऊन म्हणाली, "त्यानें दरवाजा लावून घेतला आहे; उघड उघड म्हटलें तरी उघडीना! इथें आमचें तरी काय तटलें आहे कुणाच्या पायांवर कुत्रीं घालायचें! खुशाल बसूंदे हट्ट घेऊन."

निळकंठांचें वय म्हणजे कांहीं फार नव्हे; परवां परवांपर्यंत तर मी माझ्या डोळ्यांनीं पहात होत्यें कीं, त्यांनीं कोणत्यातरी क्षुल्लक कारणावरून हट्टाला येऊन आपल्या खोलींत जाऊन बसावें, उपाशीं राहावें व त्यांच्या आईनें जाऊन, बाबा-पुता करून, समजूत घालून, आंजारून गोंजारून, त्यांना आणून जेवायला पाटा-वर बसवावें. राग कसा तो त्यांच्या नाकावर होता. आपण हट्ट केला व त्याची आपल्या मायेच्या माणसाकडून अशी गोड समजावणी झाली, कीं मुलांच्या मनाला जो आनंद होतो, त्याच्या थोरवीची कल्पनाच करावी लागेल! पण आज त्यांची मायेची आई वारली, तेव्हां त्या हट्टाला किंमत नाहींशी झाली. 'राग म्हणजे नाकावर आहे,' 'स्वभाव तरवारीची धार आहे,' 'वीज हातीं धरवेल; पण याचा स्वभाव हातीं धरवायचा नाहीं,' असे उद्‌गार वेळो-वेळीं काढून त्यांची आई नेहमीं त्यांच्या हट्टी स्वभावाचें कौतुक करी, व खरेंच सांगत्यें, एकेक वेळां केवळ असें कौतुक करून घेण्यासाठींच रागाचा व हट्टाचा उसना आव लहानपणीं ते आणीत. पण त्यांच्या दुर्दैवानें मायेची माय सोडून

गेली !–पण जाईना कां गेली तर! ताईहि न कां करीना त्यांच्या हट्टाचें कौतुक! ‘ भोज्येषु माता, शयनेषु रंभा ’ म्हणतात, तशांतली मीच आज क्षणभर त्यांची माता व्हायचा विचार केला, व रात्रौ सर्व मंडळी झोंपून सामसूम झाल्यावर बारांवर तीन वाजतां हळूच कुणाला नकळत त्यांच्या खोलींत गेल्यें. दरवाजाला कडी होती खरी; पण एका विवक्षित पद्धतीनें दरवाजा लोटल्यावर ती कडी निघावी, अशा खुबीनें ती कितीतरी दिवसांपूर्वीपासून मी किलकिली करून ठेवली होती !

तें श्यामसुंदर गोजिरवाणें रूप मीं आज शेवटचें डोळांभर पाहून घेतलें ! उद्यां बाबांनीं मला माहेरीं नेल्यावर तर मी त्या देवदर्शनाला कायमचीच अंतरणार होत्यें. मनांत म्हटलें, देवा ! ह्या रूपाचें प्रतिबिंब माझ्या अंतःकरणावर असें कायम टशानें ठसवून ठेव कीं, कल्पांताच्या प्रचंड लाटा दुथडी धोः धोः वाहात येऊन त्या प्रतिबिंबावर आदळल्या तरी आमची ती पावन स्मृति त्या लाटांच्या पांगुळगाड्यावर बसून नव्या नव्या ब्रह्मांडांतील नव्या नव्या युगाला जाऊन भिडावी. त्या कल्पांतांत ही ब्रह्मांडाची बाग नव्यानें फुलली, कीं त्या फुलांच्या मधुर परिमलांतून आमच्या प्रेमाचा प्रसाद त्रिखंडांत वांटला जावा !– असा विचार करून मी निळकंठांच्या खोलीचा दरवाजा उघडून आंत जात्यें तोंच–अगबाई ! त्यांच्या डोकीखालची सतरंजी रक्तानें इतकी भिजून ओलींचिंब कशी झाली नकळे ! तें सभोंवारचें रक्ताचें रंकाळें मला पहावेना ! मीं त्यांना विचारलें, “ आपल्या मस्तकाला ही एवढी जखम कशी झाली ? ”

निळकंठांना कदाचित् उठून बसवणार नाहीं किंवा त्या रक्तवळ्यांत डोकें टेंकून टेंकून कंटाळा आला असेल, म्हणून मीं म्हटलें, माझ्या मांडीवर डोकें टेंका. यावर ते मला म्हणाले, “ मनोरमे, तुझ्या मांडीवर मी डोकें टेंकीत नाहीं, तुझ्या सोन्यासारख्या लुगड्याला रक्ताचे डाग पडतील ! ”

मीं म्हटलें, “ पडूंदेत डाग ! जिथें हा माझा सोन्यासारखा देह आपल्या सहवासाशिवाय मातीचा मातीला मिळून जायचा आहे, तिथें ह्या लुगड्याची कसली किंमत ? पण आपल्यावर काय काळ कोसळला हा ! ”

माझ्या भेदरलेल्या प्रश्नाला निळकंठांकडून शांत मनानें व शांत वाणीनें उत्तर मिळालें. “ मनोरमे, माझ्या आंगाला बळेंच चिकटवण्यांत आलेल्या पापांचें परिमार्जन व्हावें, म्हणून मी मामींच्या पायांवर डोकी ठेवीत होतों; पण मामींना

माझी शिवाशिव होईलशी वाटली, म्हणून त्या दूर सरल्या व माझा तोल जाऊन माझें मस्तक आरशावर आदळलें;–ती कांच माझ्या मस्तकांत रुतून त्यांतून ही रक्ताची गंगा वाहूं लागली. मनोरमे, माझ्या डोक्यांतून तिडिक उठते ग!"

"थांबा हं! मी जाऊन पाणी आणत्यें, फडका आणत्यें व आपल्या मस्तकाला थंड पाण्याची पट्टी बांधत्यें." असें म्हणून मी घरांत हलक्या पायांनीं चालत गेल्यें व एक गार पाण्यानें भरलेला तांब्या आणि एक हात-रुमाल आणला. मला माहीत होतें, आज पाण्याचा एक थेंबहि निळकंठांच्या पोटांत गेलेला नाहीं. म्हणून रात्रींच्या गुरुवारचें माझ्या वांटणीचें फराळाचें होतें, तेंहि मी घेऊन आल्यें. कपाळाशिवाय त्यांच्या दंडावर व गालांवरहि खरचटल्यासारखें झालें होतें, त्याला लावायला थोडी ओली हळदहि आणली.

निळकंठांनीं विचारलें, "मनोरमे, लीला मला कांहीं म्हणो, मामामामी कांहीं म्हणोत, जग कांहीं म्हणो; पण मी आचारांविचारांनीं पावन आहें, हे माझे दुर्बलाचे बोल तुला तरी खरे वाटतात ना?"

मी म्हणाल्यें, "हें काय मला भलतेंच विचारतां तें? आपण व मी दोन का आहोंत? पण नानाताई ऐनप्रसंगीं आपल्यावर उलटलीं, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. हाच आपण त्यांच्या कुसव्यांत जन्म घेतलेला असता, तर अशा प्रसंगीं तींच आपलीं पाठीराखीं बनलीं असतीं."

यावर निळकंठ म्हणाले, "खरोखरच, या जगांत ज्यांचे जन्मदाते आई-बाप जिवंत आहेत, त्यांच्यासारखे भाग्यवान तेच! पण मनोरमे, इतक्या रात्रीं तूं माझ्या खोलींत कशी आलीस?"

"मी सर्वांचा डोळा चुकवून आल्यें."

"कां आलीस?"

"कां म्हणजे? उद्यां आपण जाणार म्हणतां, मलाहि बाबा माहेरीं घेऊन जाणार आहेत. आतां आपली व माझी ताटातूट झाल्यावर मीं कसें वागावें तें विचारायला आल्यें. हळू शब्दांत मला सांगा काय तें." असें म्हणून मी निळकंठांच्या डोकीला ओल्या फडक्याची पट्टी बांधूं लागल्यें, तेव्हां मला त्यांनीं उपदेश केला, "मनोरमे, माझा प्रत्येक शब्द शिरसावंद्य मानायला तुझी तयारी आहे ना?"

" होय." मी उत्तरल्यें.

" मग ' पिता धर्मः पिता स्वर्गः पिता हि परमं तपः ' या तत्त्वाला अनुसरून तूं आपल्या बाबांच्या प्रत्येक शब्दाला संमति दिली पाहिजेस. त्यांनीं तुला कुणालाहि माळ घालायला सांगितली तरी तूं घातली पाहिजेस. ते जी जी गोष्ट करतील, ती आपल्या मतें तरी तुझ्या कल्याणाचीच करतील. त्यांच्या रक्तामांसाची तूं आहेस. त्यांचें प्रिय करतां करतां संसाराची व सुखाची काय कथा; पण पंचप्राणांची ओवाळणी करावी लागली, तरी ती तूं केली पाहिजेस. खऱ्या आर्यबीजाचे कन्यापुत्र आपल्या मातापितरांचें प्रिय करण्यासाठीं स्वतांच्या सर्वस्वावर पाणी सोडण्याला सदैव तयार असतात."

मीं विचारलें, " बाबांचीं मतें आज ना उद्यां कदाचित् पालटतीलहि ! तोंपर्यंत मी लग्नच करीत नाहीं असें त्यांना सांगितलें व अठरा वर्षांच्या वयांत येईपर्यंत कसेबसे दिवस काढले तर ? "

यावर मला निळकंठ म्हणाले, " तूं हिंदु कुंवार आहेस; तुझ्या ह्या इच्छेला कायदाहि मान देणार नाहीं व धर्महि मान देणार नाहीं."

मीं म्हटलें, " मला कायदा माहीत आहे. माझी एक मैत्रिण असेंच करणार आहे. ती आज सोळा वर्षांची आहे. एका तरुणाशीं तिचें लग्न व्हायचें आहे. तो बी. ए., एल्एल्. बी. वकील आहे. त्यानें तिला शिकवलें आहे कीं, ' तूं बापाला सांग, माझें शिक्षण पुरें होईपर्यंत माझें लग्न करूं नका; म्हणजे बापाला कायदेशीर रीतीनें कांहींच करतां येणार नाहीं. '–तसेंच मींहि केलें तर ? "

" पण हें तूं कुणासाठीं करणार ? "

" कुणासाठीं याचा अर्थ काय ? माझ्यासाठीं व आपल्यासाठीं ! "

" अहाहा ! मनोरमे तूंच का ही ? ह्या निळकंठाची वाग्दत्त वधूच का ही अशी कायद्याच्या आधारावर आईबापांना धाब्यावर बसवून स्वतांच्या वैषयिक सुखाची शमता करूं पहाते ?–कर्म बोलतें हें माझें ! "

आधींच निळकंठांच्या कपाळाला जखम झालेली, तशांत संतापाच्या भरांत त्या जखमेंतून जास्तच रक्त वाहूं लागलें. ' हळू बोला ' म्हणून मीं सांगितलें, त्यावर माझ्या हाताला हिसडा देऊन त्यांनीं सांगितलें,–" चल दूर हो. तुझ्यासारख्या अधम आर्यकन्येचा स्पर्शहि माझ्या आंगाला न झालेला बरा."

इतका निळकंठांना राग आला, व मीहि चूक केली असें माझें मन मला

सांगूं लागलें. मग त्या चुकीचें प्रायश्चित्त म्हणून त्यांचे पाय धरल्याशिवाय मी कशी राहूं ! मीं मनोभावानें त्या पुण्यपायांवर डोकी ठेवली व वाचाळतेबद्दल क्षमा मागितली. क्षमा निळकंठांनीं केलीहि. मी मात्र एवढेंच सांगितलें, " मी बाबांच्या इच्छेप्रमाणें वागेन, ते सांगतील त्यांना माळ घालीन, ते जें जें सांगतील तें तें करीन; पण तें सारें आपली आज्ञा म्हणून करीन. "

" माझी आज्ञा म्हणून वागावयाचें असेल, तर माझी तुला अशी आज्ञा आहे कीं, तूं या निळकंठाला विसर. "

निळकंठ मला विसर म्हणाले; पण सांगतांना त्यांना कांहीं विचार का होता ! विसर काय ? पायांत नुसता कांटा मोडला, तर तें दुःख काढून टाकतांनासुद्धां मनाला किती वेदना होतात. आणि ही तर मनांतली प्रेमाची आवडती— मनकवडी ठेव ! ती टाकल्यें म्हटल्यावर टाकतां येते थोडीच ! मी उत्तरल्यें, " आपली आज्ञा मला शिरसा वंद्य आहे. पण एकदम कांहीं मला आपल्याला विसरतां यायचें नाहीं. आणि मला आपणाला विसरायला आपण सांगितलें, तसे आपण तरी मला विसराल का ?—सांगावें गडे ! "

यावर डोळ्यांत पाणी आणून निळकंठ उत्तरले, " नाहीं. मनोरमे, मला जन्मोजन्मीं तुझा विसर पडणार नाहीं. पण माझ्या सुखानें सुखी किंवा दुःखानें दुःखी होणारें या जगांत कोणीहि नसल्याकारणानें तुझी आठवण कर करून मी सारा जन्म रडत बसलों, तरी कुणाला माझा त्रास नाहीं. तुझें मात्र तसें नाहीं. तूं मला आठवलेंस तर तुझें सारें आयुष्य दुःखमय झाल्यामुळें तुझे आईबाप, तुझा पति, तुझे सासूसासरे, या सर्वांच्या कपाळीं तें दुःख येईल. "

" बरें आहे; मी आपण सांगतां तशीच वागेन. मग तर झालें ? "

" होय. पण मला तसें वचन दे. "

मीं म्हटलें, " मी वचन देत्यें; पण या वचनाला मी या जन्मापुरतीच बांधलेली राहीन. आणि तेंहि वचन देण्यापूर्वी मला कांहीं संस्कार उरकून घ्यायचे आहेत. "

इतका वेळ मी बाकीच्या साऱ्या गोष्टी विसरल्यें होत्यें. त्याची आठवण होऊन जवळच्या ओल्या हळदीच्या वाटीकडे लक्ष्य जायला व निळकंठांचा होकार मिळायला एक गांठ पडली. मीं वाटींतली हळद काढून तळहातावर घेतली व ती त्यांच्या सर्वांगाला, तोंडाला, खरचटलेल्या भागावर चोळून

लावली. आमचें दोघांचें जर लग्न झालें असतें, तर येत्या दिवाळीला त्यांच्या आंगाला तेलउटणें लावून, या माझ्या गोऱ्या हातांनीं तें आंग चोळून ऊनऊन गुलाबपाण्यानें मी त्यांना न्हाऊं घातलें असतें. पण इतकी भाग्याची मी नाहीं. आतां कोणत्या ना कोणत्या मिषानें त्यांच्या आंगाला तेलहळद लावायची हौस मी भागवून घेत होत्यें झालें !

मला निळकंठांनीं विचारलें, "मनोरमे, दैवदुर्विलासाच्या वणव्यांत करपलेलें माझें हें काळें तोंड आतां तुझ्या हातच्या हळदीनें गोरें कसें होणार ? ह्या काळतोंड्याच्या गालांना तूं कितीहि हळद फांसलीस तरी जग मला काळतोंडाच म्हणणार."

मीं म्हटलें, "जग म्हणेना ! आपणाला त्याच्याशीं काय करायचें आहे ! आपण किनी जर समर्थ असतों, तर या जन्मापुरती भोगावी लागणारी यातायात चुकवण्यासाठीं हें जगच सोडून निराळ्या एखाद्या जगांत–जिथें आंतबाहेर ह्या दुरंगी व्यवहाराचा सैतानी धांगडधिंगा चालत नाहीं, आणि जिथें सर्वांभूतीं प्रेमाचा सारखा आस्वाद घेतां येईल, अशा एखाद्या नव्या जगांत जाऊन राहिलों असतों. ऐकलेंत का ? या जन्मीं काय व्हायचें तें होवो; पण पुढच्या जन्मीं आपण व्हावें ब्रह्म; मी होईन माया ! पण ह्या जगांतल्या मायेसारखी दुष्टाव्याची माया नव्हे बरें; सुष्टाव्याची माया होईन. मग आपण या मायाब्रह्माचें सुंदरसें नवें जग निर्माण करूं, व तिथें आजूबाजूला कुणाचा वासवारा नाहीं, अशा त्या एकट्या जगांत आपण व मी अशीं दोघेंच प्रेमाची लहानशी, गरीबशी; पण परस्पर हृदयवेदनांनीं फुललेली, नटलेली, सजलेली अशी झोंपडी बांधून तिच्यांत सुखानें राहूं. मग आपल्याला ह्या जगाचा-ह्या देखतभुल्या दुरंगी दुनियेचा वासवाराहि नको. ह्या पापी जगांतलें कांहीं म्हटल्यावर कांहींसुद्धां पाप आपण बरोबर घ्यायचें नाहीं. हे देह–ही मातीसुद्धां इथच्या मातींत फेंकून द्यायची व आपण दिव्य देहांनीं वर जायचें. सातां समुद्रांपलीकडे शेषशाईच्या मस्तकावर श्रीविष्णु नाहीं का झोंपीं गेले आहेत व लक्ष्मी त्यांचे पाय चुरते आहे ? तशीच मी मग ढगांवर ढगांच्या गाद्या रचून त्यांवर निळ्याकाळ्या आकाशाची दुलई पसरून देईन, त्या शय्येवर आपण झोंपा आणि मग मी आपल्या चरणांची दासी आपले पाय मांडीवर घेऊन चुरीत बसेन. द्या पाहूं ते पाय इकडे !" असें म्हणून मी निळकंठांचे पाय मांडीवर घेऊन चुरूं लागल्यें, तेव्हां हे पाय

असेच जन्मभर चुरीत बसावें, असेंहि मला वाटलें;—पण किती मी विसराळू तरी! त्यांना भूक लागली असेल म्हणून फराळाचें आणलें, तें तसेंच राहून गेलें. तें मीं ताटांत वाढलें. निळकंठांच्या उष्ट्या ताटांत जेऊन पतिव्रतेचें व्रत सांग करावें, असें मला कधींपासून वाटे. पण माझ्या नशिबीं तो योगच नव्हता. पण नसेना कां? मीं त्यांना सांगितलें, "आपण अगोदर फराळ करा व आपल्या ओठांचें अमृत चिकटलेला उष्टा घांस मला ठेवा. मी दुसऱ्याची अर्धांगी व्हायची असल्यें तरी मी आपल्यासाठीं त्यांना ओळखल्यें. आपलें उष्टें खाल्ल्यानें मी कांहीं भ्रष्ट व्हायची नाहीं. आमचें लग्न झालें असतें, तर लग्नमंडपांत एकमेकांना लाडू—करंजीचे घांस भरवतांना आम्हांला हंसवणार, चि वणार व शेवटीं चिडवून चिडवून रडवणार असा ताईचा पण होता. पण—आतां त्याची आठवण हवी कशाला?"

माझी मलाच ती आठवण असह्य झाली. मी आपला तोच लग्नमंडप समजल्यें व लाडूचा एक घांस निळकंटांना देऊन बजावलें, "निळकंठ, हट्टी नवऱ्यासारखा थुंकायचा नाहीं बरें हा! नाहीं तर थुंकाल; मग तो उष्टा लाडू मी नाहीं खायची!"

मीं निळकंठांना घांस दिला; त्यांनीं मला घांस दिला. पण मनाला त्रास होतो म्हणून मला भविष्यकाळच्या ह्या आठवणी आतां नको होत्या. त्यांचा त्यांनाहि विसर पडावा, म्हणून मी प्रयत्न करीत होत्यें. मीं मुद्दाम विषय बदलण्यासाठीं त्यांना विचारलें, "पण आपण उद्यां नानाताईंना सोडून निघालां म्हणजे कुठें जाणार?"

"कुठें जाऊं!" काकुळतीला येऊन मला निळकंठांनीं विचारलें, "मीं माझ्या जन्मभूमीला जाईन तर दादा तेथील सारी सत्ता बळकावून बसला आहे; तिथें जावें तर त्याच्याशीं पहिल्यानें उभा दावा मांडावा. माधव व अनंत म्हणतात कीं, आपण तिघांनीं माझ्या पूर्वीच्या योजनेप्रमाणें तिकडे जावें व व खेड्यापाड्याच्या सुधारणेचे विचार मूर्त स्वरूपाला आणून दाखवावे. या कामीं आमच्या ओळखीच्या दोघां धनवंतांनीं आम्हांला लागेल तेवढा पैसाहि देऊं केला आहे. आमचे सावकार आमची जमीन माफक साऱ्यानें मला द्यायला तयार आहेत. आमच्या चार गांवची धनीण पिरोजाबाई व तिची मुलगी प्रेमा ह्या दोघीहि स्त्रिया जातीच्या हलक्या असतांहि माझ्या कार्याचें

महत्त्व ओळखून त्या चारी गांव माझ्या वहिवाटीला द्यायला तयार आहेत. फार काय, मनोरमे, हें गूढांतलें गूढ तुला सांगतों, माझीं सुधारकी मतें ऐकून पिरोजबाईनीं मला आपला जांवई करण्याची इच्छाहि पत्रांतून मला कळवली होती. जशी तूं सुशील आहेस, तशीच त्यांची प्रेमा वारयोषितेची मुलगी असूनहि सुशील आहे; तिला माझी नाराजी कळतांच कोणत्याहि अटीशिवाय आपली संपत्ति माझ्या स्वाधीन करण्याची आपली इच्छा त्या मायलेकींनीं परवां मुद्दाम मला पत्र पाठवून प्रगट केली आहे. ”

मला ही प्रेमाची कथा ऐकून माहीत होती; पण निळकंठांचा अपमान होईल म्हणून आजपर्यंत ती मी बळेंच विसरल्यें होतें. मीं म्हटलें, “ तसें असेल, तर आपण माधव, अनंत व नलिनी यांना घेऊन आपल्या गांवीं जा व पतितांचा उद्धार करा. ”

“ पण आम्ही कसे जाऊं ! मनोरमे, परमेश्वरानें आम्हांला देशसेवेच्या, लोकसेवेच्या सुंदर कल्पना दिल्या, व निराळशीपणानें त्यांची सांगता करणारीं कोमल अंतःकरणेंहि दिलीं. पण काय असेल तें असो, चित्ताची समता बिघडूं न देण्याचा धीरोदात्त स्वभाव व मनाचा खंबीरपणा यांची आमच्यापाशीं वाण आहे; त्यामुळें परिस्थितीच्या पायांशीं आम्हांला लोळण घ्यावी लागते. ह्याच परिस्थितीनें व मनोविकारांनीं मला घेरून मीं आतां कोणासाठीं जगावें व कोणासाठीं काय करावें, हा प्रश्न माझ्यासमोर निर्माण केला आहे. या जगांत मी मेलों, तर रडणारें कोणी नाहीं. बरें; मी नांवारुपाला आलों तरी माझें कौतुक करणारेंहि कोणी नाहीं. असल्या ह्या परक्या जगांत मी कुणाचा कोण कुणासाठीं जगूं ? ”

निळकंठांचा प्रश्न माझ्याहि अंतःकरणाला सोळा आणे पटला. पण अशा निवृत्तिमय विचारांच्या फेऱ्यांत सांपडून ते जीवाचें कांहीं बरेंवाईट करून घेतील कीं काय, याचें मला भय वाटत होतें. संतापातिशयाच्या भरांत त्यांनीं पूर्वी दोन वेळां आत्महत्या करायची तयारी केली होती, ती मला माहीत होती. देशसेवेचा व लोकसेवेचा उपदेश मी तो त्यांना काय करणार ! त्यांच्याच उपदेशानें देश किंवा जनता यांच्या सेवेंतील रहस्य मला कळूं लागलें होतें. तेव्हां मींच तो उपदेशाचा मार्ग सोडला. मात्र वैतागाच्या भरांत त्यांना जीवाचें बरेंवाईट करून घ्यायची इच्छा झाली तर ती मूर्त स्वरूपाला

येऊं नये, म्हणून मीं त्यांना हात जोडून विनंती केली, " आपल्याला माझ्या गळ्याची शपथ आहे, आपण जिवाचें कांहीं बरेंवाईट कराल तर ! कुणासाठीं जगावें हा प्रश्न आपल्याला सुटत नसला तर तो सुटेपर्यंत आपण त्या परमेश्वरी कौतुकाचा असाच विचार करीत राहा. आपण थोर पुरुष आहां, आपण आपल्या दैवाचे नियंते आहां. आपला आत्मविश्वास या वेळीं रसातळाला गेला व आपण दैवासमोर हात टेंकले, तर जग आपल्याला बाईलवेडे म्हणून आपली निंदा करील;--मग माझ्या स्वामींना असें नव्हे असें मागें कीं पुढें, कुणीं बोललेलें मला नाहीं खपायचें. तें कांहीं नाहीं; असला अविचार करणार नाहीं, असें आपण मला वचन द्यावें. मी बाबांच्या इच्छेला मान देऊन ते सांगतील त्या तरुणाचा संसार सुखासमाधानानें साजरा करीन, असें वचन आपण कसें माझ्यापासून घेतलें आहे ? तसें वचन आपण मला द्यावें. असें काय तें ? द्यावें म्हणत्यें ना वचन ? आपल्या देहाचा नाश आपसुखानें करायला उठणारे असे आपण कोण हो ? द्यावें वचन ! "

इतकी विनवणी केल्यावर वचन मिळत नाहीं असें थोडेंच आहे ! वचन तर मिळालेंच. आतां मला काळजी होती, ती निळकंठांचें पुढें कसें होईल याची. वीरासारखे वीर ते; लाथ मारतील तिथें पाणी काढतील. पण माझा जीव मेला मायाळू ना ? मला आपलें उगाच भय वाटत होतें, यांचें पुढें कसें होईल ! मीं विचारलें, " आपण उद्यां ताईनानांना सोडून निघाल्यावर कुठें जाणार ? आपल्यापाशीं वाटचालीला खर्चायला तरी कांहीं आहे का ? "

निळकंठांनीं विषण्ण चित्तानें मला विचारलें, "मनोरमे, आईबाप, भाऊबंद, सगेसोयरे--ही सारीच दुनिया ज्याला परकी व पारखी झाली आहे, त्या भणंग भिकाऱ्याला वाटचालीची कसली काळजी ? भर दोन प्रहरीं तापलेल्या रस्त्यावरील धुळीवर अश्रूंचा शितोडा घालून त्या वाटेनें दुर्दैवाचें गीत गात गात अनवाणीं दारोदार भटकणाऱ्या ह्या भटक्या फटिंगाला जिकडे पुढा तिकडे मुलूख थोडा ! "

मीं माझ्या हातांतील सोन्याच्या बांगड्या व आंगठी काढून निळकंठांना देत म्हटलें, " असें करूं नये; ही माझी आंगठी व ह्या दोन सोन्याच्या बांगड्या आपल्यापाशीं ठेवाव्या. काळवेळेला उपयोगीं पडतील. "

" पण याविषयीं तुला तुझ्या आईबापांनीं विचारलें तर ? " निळकंठांनीं मला विचारलें.

मी उत्तरल्यें, " तिकडे गेल्यावर माझें मी पाहून घेईन. पण लक्षांत ठेवावें बरें; हे माझे चुडे—ही माझ्या सौभाग्याची खूण मीं आपल्यापाशीं ठेवली आहे, तें सोन्याचें सोनें खर्चूं दे; पण त्याबरोबर माझ्या सौभाग्याची आठवण मात्र वाटचालीला खर्चायची नाहीं. ती नीट जीवाच्या जीवापलीकडे जपून ठेवावी व या जन्मींचे भोग भोगून सरल्यावर पुढच्या जन्मीं आपण देवलोकांत भेटूं, तेव्हां ती माझी मला परत द्यावी. पण मीं आपल्याला सोनें दिलें, तसें आपण मला काय देणार ? "

मीं मुद्दामच विचारलें होतें कीं, ते काय देतात पहावें. त्यांनीं लगेच जवळच्या रक्ताच्या थाळींत बोट बुडवून त्या रक्ताची टिकली माझ्या कपाळावर रेखून सांगीतलें, " यापेक्षां मी काय देऊं ? तूं श्रीमंताची लेंक, तूं आपल्या आंगावरचीं सोनींलेणीं काढून या अभाग्याच्या स्वाधीन केलींस. पण माझ्यापाशीं सोनेंलेणें कुठें आहे? त्याऐवजीं ही माझ्या या जन्मींच्या प्रेमाची खूण, ही माझ्या रक्ताची टिकली मी तुझ्या भालप्रदेशावर रेखून ठेवतों. परमेश्वरा, ह्या देवतेच्या ललाटीं ही माझ्या रक्ताची टिकली कल्पांतापर्यंत अशीच ओली राहूं दे ! "

आतां माझी एकच इच्छा बाकी राहिली होती. या नाहीं तर पुढच्या जन्मीं तरी आम्ही संसार करूंच करूं; पण आमच्या ह्या जन्माची आठवण जगाला रहावी असें आमचें एखादें चिरकालचें स्मारक असावें, हीच ती इच्छा. ती कशी तरी पुरी करावी असें मीं सांगतांच मला उत्तर मिळालें, " मनोरमे, तुझ्यासारख्या देवतेचें स्मारक करायचें, तें तुझ्या प्राप्तीविषयीं निराश झालेला हा जीव जनसेवेंत चंदनाप्रमाणें झिजवून लौकिकाचा जो गंध पदरीं पडेल, त्याचें केलें पाहिजे. पण तितकें खंबीर माझें मन आहे किंवा कसें, याचा माझा मलाच अजून संशय आहे. "

मीं म्हटलें, " एखादा कादंबरीकार ह्या माझ्या आठवणींचा शेवट कसा करील माहीत आहे का ? मी आपल्याबरोबर सती गेल्यें आहें—नको पण. मी जनांत नाहीं तरी मनांत आपलीच पत्नी आहें. खऱ्या पतिव्रतांना पतीच्या निधनानंतर अस्तित्वच नाहीं मुळीं. खरी पतिव्रता जी असेल, ती पतीच्या निधनकाळापासून सती जाईपर्यंतच्या क्षणिक वैधव्याचा डागहि आपल्या उज्ज्वल पातिव्रत्याला नाहीं लावून घ्यायची;–तो डाग मीहि माझ्या नांवाला नाहीं लावून घ्यायची. आजपर्यंतच्या आर्यपतिव्रतांनीं जर पति-

निधनापासून सती जाईपर्यंत क्षणभर तरी जिवंत राहण्याचा दुबळा मोह आवरला असता, तर आपल्या भाषाकोशांत ‘ विधवा ’ हा शब्दच गोंवला गेला नसता. त्यापेक्षां आपल्यादेखत भरल्या चुड्यांनीं मला मरण आलें आहे, असें कुणी दाखवील का ? एवढी माझी हौस कुणी पुरवील का ? ”

माझ्या प्रश्नाला गंहिवरलेल्या कंठानें निळकंठ उत्तरले, “ मनोरमे, माझ्या हौसांमौजांना आतां शोकाच्या अथांग सागरांत व दुःखाच्या प्रचंड वणव्यांतच तुझ्या माझ्या चरित्रनाटकाची नांदी गात बसायचें आहे. कर्तव्याची इतिश्री दैवानें केली, तरी ह्या निराशेच्या निर्बलतेनें स्वतांच्या कर्माला हात लावून रडत बसण्याची मला पूर्ण मुभा दिली आहे. माझ्यासारख्या जातिवंत हताश जीवाला जगासाठीं कांहीं करतां आलें नाहीं तरी स्वतांसाठीं एवढें तरी खास करतां येईल. उद्यां तूं माहेरीं गेलीस म्हणजे लौकरच तुझ्या वांट्याला सासुरवास येणार. मीहि मामामामींना आतां कायमचाच अंतरणार आहें. मला माझ्या दैवदुर्विलसिताचें भयाण किर्रर्र् रान हिंडायला मोकळें आहे. त्या रानांतील परकेपणाच्या घनदाट काळोखांत अश्रूंच्या तेलानें डोळ्यांच्या वाती भिजवून मी त्यांच्या दोन मशाली पाजळणार, त्या मशालींच्या प्रकाशांत पूर्वसंचिताच्या काळ्या खडकावर बसून, या माझ्या चुरलेल्या अंतःकरणाचा एकेक पापुद्रा सोलून तो विवेकाच्या सपाटीवर पसरणार, व पंचप्राणांच्या पांच लेखण्यांपैकीं क्रमाक्रमानें एकेक माझ्या रक्ताच्या लाल शाईत बुडवून तुझ्या आयुष्यांतील आठवणींची समाधि चिरकालची रंगवून ठेवणार. ”

मीं विचारलें, “ यापेक्षां कांहीं म्हटल्यावर कांहींच करायचें नाहीं ? ”

“ यापेक्षां कांहीं करण्याची शक्तीच माझ्या आंगीं उरली नाहीं. ”

“ मग आपल्या साऱ्या आशा, साऱ्या महत्त्वाकांक्षा फुकटच तर ? ”

“ होय. मग त्या माझ्यासारख्या दुर्बलाच्या हातीं पडल्या म्हणून फुकट झाल्या असें जग म्हणालें तरी त्याला माझा नाइलाज आहे. ”

“ आपण असे हताश होऊं नये. मीं आपल्याला उपदेश करावा असें जरी नाहीं, तरी सांगत्यें, परोपकाराचें पोषण करणारी चित्ताची समता या वेळीं आपण बिघडूं दिली नाहीं, तर त्यांतच आपल्या पौरुषाची शोभा आहे, व मलाहि त्याचा अभिमान आहे. ”

“ तूं सांगतेस तें खरें; पण मनोरमे, दैवी आपत्तींच्या झंझावातांत उन्म-

ळून पडूं पहाणाऱ्या चित्ताचा आलंब राखणें या वेळीं तरी माझ्या आवांक्या-बाहेरचें आहे. भविष्यकाळीं माझ्या आयुष्याचा सद्व्यय व्हावा, अशी परमेश्वराची प्रार्थना करण्यापलीकडे मला या वेळीं दुसरें कांहींहि करवत नाहीं."

"आपल्या चित्ताची समता बिघडूं नये, अशीच मीहि परमेश्वराची प्रार्थना करीन. ही माझी पवित्र ब्रह्मकुमारिकेची हांक त्याला आपल्या हांकेच्या अगोदर ऐकूं जाईल."

"माझ्या कर्तव्यापेक्षां तुझें कर्तव्य महत्त्वाचें आहे. तुझ्या पातिव्रत्याची कसोटी यापुढें तुझ्या सासरीं ठरायची आहे, याची तुला आठवण आहे ना?"

"हो! मला आठवण आहे."

"मग सांग पाहूं तर, मी तुझा कोण?"

"या जन्मीं का पुढच्या जन्मीं?"

"पुढच्या जन्मींच्या गोष्टी या जन्मीं हव्या कशाला? या जन्मींच्याच गोष्टी बोल."

मला या प्रश्नाचें उत्तर देतांना मोठेंच कोडें पडलें. पण या वेळीं शाश्वत सद्भावनांची जोड देण्याविषयीं परमेश्वराची मनांत प्रार्थना करून मी उत्तरल्यें, "आपण माझे भाऊ!"

"शाबास मनोरमे, आतां मात्र तूं खरी पतिव्रता शोभलीस. हीच—हीच भावना तूं जन्मावेरीं आपल्या अंतःकरणांतून ढळूं देऊं नकोस."

माझ्याच्यानें हे बोल ऐकवेनात व निळकंठांना जास्त बोलायचेंहि धैर्य होईना. इतक्यांत कोंबडा आरवला व पहाट झाली. आतां मला या देवमंदिरांत बसतां येणें अशक्य होतें. न जाणो, कुणी ना कुणी मला पाहिली असती, तर मग उगाच घरच्या माणसांच्या डोळ्यांत आमची ही भेट सलली असती. बाकी, आजची भेट हीच आमची शेवटची भेट होती. आतां जी आमची जन्माची ताटातूट होईल, ती मी कशी सहन करावी! हें श्यामसुंदर रूप पुन्हां दिसायचें नाहीं!–हरे राम! निळकंठांच्या पुण्यदर्शनाशिवाय एक दिवस सुना गेला तर तो एका युगाइतका मला कंटाळवाणा वाटे; मग आतां सारा जन्म त्यांच्या दर्शनाशिवाय मीं कसा काढावा! मीं विचारलें, "आपण मला वरच्यावर पत्र तरी पाठवायचें विसरणार नाहीं ना?"

"कशाला?" निळकंठांनीं विचारलें.

मीं म्हटलें, " कशाला हें काय विचारतां ? मला आपली खुशाली तरी कळली पाहिजे ना ? "

निळकंठ उत्तरले, " मीं पत्र पाठवलें किंवा न पाठवलें, तरी मी खुशाल असणें किंवा नसणें तुझ्या आचरणांतील पापपुण्यावर अवलंबून आहे. तूं जर या वेळीं दिलेल्या आणाभाका सोळा आणे पाळल्यास, तर तुझ्या पुण्याईच्या जोरावर मला अखंड आयुरारोग्य मिळेल. त्या आणाभाका तुझ्याच्यानें योग्य रीतीनें पाळल्या जातील ना ? "

" हो ! " मी उत्तरल्यें.

" ठीक आहे. आतां लक्षांत ठेव बरें; एका काळीं वाग्दत्त वधूवरें असणारी निळकंठमनोरमेची जोडी या घटकेला ठार मेली, व पाठोपाठच्या बहीणभावंडांची निळकंठमनोरमेची जोडी आज नव्यानें जगांत जन्माला आली आहे. त्या नव्या नात्यांत मी तुला ' मनूताई ' अशी हांक मारीन. पण तूं माझी पाठची बहीण आहेस; तूं मला कशी हांक मारशील ? "

थरथरणाऱ्या अंतःकरणानें मीं हांक मारली, " निळूदादा ! "

" ओ ! " माझ्या हांकेला निळकंठ–पण मी चुकल्यें, निळूदादा उत्तरला, " मनूताई, मी एखाद्या भाऊबिजेला तुला ओंवाळणी घालायला येईन. "

हळूहळू दिशा फांकल्या, पूर्वेच्या गालीं अरुणोदयाची गुलाबी लाली खुलूं लागली, तशी मीहि तिकडच्या–चुकल्यें, निळूदादाच्या खोलींतून बाहेर पडल्यें. त्या कुणाच्या तरी शपथेचा–पण आतां मी निळूदादा म्हणायला लाजत्यें, हेंहि मनकवडें पापच ! तसें नाहीं–निळूदादाच्या शपथेचा परमेश्वर मला पुन्हां पुन्हां बजावून सांगूं लागला कीं, निळकंठांची वाग्दत्त वधू मनोरमा मेली; पार रसातळाला गेली. आतां या क्षणीं निळूदादाची धाकटी बहीण मनोरमा जन्माला येऊन ती आपल्या बंधूच्या खोलींतून बाहेर पडत आहे. त्या शपथेच्या परमेश्वरानें मला असेंहि सांगितलें कीं, तूं त्या मेलेल्या मनोरमेला विवेकाच्या खळग्यांत गाडून त्यावर विसराळूपणाची समाधि बांध. पण मी पडल्यें हळव्या मनाची बायकोमाणूस ! असलीं मर्दानी कामें माझ्या हातून कशीं पार पडावीं ! तरी पण मीं मनाचा हिय्या करून सांगितलें कीं, मी ती गोष्ट विसरण्याचा–त्या आयुष्याच्या जगांत आपण वावरलोंच नाहीं, असें माझें मला भासवण्याचा–प्रयत्न करीन, व तो यशस्वितेनें सिद्धीला जाईपर्यंत मनः-

संयमनाची फूलपत्री त्या समाधिस्थानावर तीनत्रिकाळ वाहून त्या फूलपत्रीच्या पर्वताखालीं तें स्थान झांकून टाकीन. एवढेंच माझें बायकोमाणसाचें सामर्थ्य !

विचारपरंपरेच्या पायऱ्या उतरतां उतरतां मी स्वतांशींच असा प्रश्न केला कीं, ही साधी राहाणी तरी आतां मीं कां म्हणून पत्करावी ? एक तर ही राहाणी आतांपर्यंतच्या पुण्यमय आयुष्यांतील प्रेमाचा पाक रांधून तो मला वाढणार व नसत्या गोष्टींची आठवण करून देणार. दुसरी गोष्ट, मला बाबांनीं प्रभाकर-पंताना–या पुढें त्यांचें नांव घ्यायची नाहीं. कारण ते माझे पति व्हायचे आहेत–देऊं केली आहे. त्यांना कांहीं इतका भिकार पेहराव आवडणार नाहीं, व मी त्यांची अर्धांगी होणार, त्यांची पुण्यपतिव्रता शोभणार, म्हणून मलाहि तो आवडतांकामा नये. कुणीं मला हा धारण करायला शिकवला, कुणीं त्याच्या साह्यानें देशांतील गोरगरिबांच्या हालअपेष्टांची जाणीव माझ्या अंतःकरणाला पटवून दिली, ते कुणाचे थोर विचार आचारांच्या मूर्तस्वरूपाला आले असते तर मी साऱ्या महाराष्ट्राला–साऱ्या भारतवर्षाला ललामभूत होऊन बसण्यासा-रखी खऱ्या आर्यकन्येची कामगिरी केली असती. पण त्या गोष्टी आतां कशाला ! ज्यांच्या सेवेंत मला आतां अर्पण केली जाणार आहे, त्यांच्या दर्जाला शोभेल व त्यांच्या चित्ताला प्रसन्न करील, अशीच माझी दिनचर्या असली पाहिजे अशी माझ्या अंतरसाक्षी परमेश्वराची आज्ञा आहे; ती मला शिरसामान्य आहे.

हे भगवान् ! मी शपथ तर घेऊन चुकल्यें ! आतां त्या शपथेची पूर्तता करण्याचें महत्कार्य पार पाडण्याची जबाबदारी मी तुझ्या पायीं संपवत्यें. स्मरणशक्तीला भविष्य काळच्या भवितव्यतेच्या पाळण्यांत अंगाई करायला लावून तिच्या पाळण्याला झोके देत देत प्रकृत समाधीचें अंगाईगीत गात गात तिला झोंप आणायची; हें परमेश्वरी भावनेचें लेंकरूं देवा ! मी तुझ्या स्फूर्तिदानाशिवाय कसें खेळवूं ! तशांत मी अजून खरीखुरी लेंकुरवाळीहि नाहीं !



# तेरावी झुळुक

## लीला (३)

हे जनतारूपी जगन्नाथ ! शेवटीं माझी सुखदुःखाविषयींची कल्पना खोटी ठरली. मीं सुखासाठीं पाप केलें, निळकंठांसारख्या पुण्यवंत महात्म्यांचा हात धरून त्यांना पापाच्या वाटेनें चालवूं लागल्यें, व ते चालेनात तेव्हां त्यांच्या नांवानें उलट्या आरोळ्या मारल्या ! गुणवंतराव नुसत्या योजनेंतच होते कीं, निळकंठांवर आग कशी पाखडावी. पण त्यांच्या योजनेला प्रत्यक्ष कृतीचें बाळसें मीं दिलें. गुणवंतरावांनीं मला सांगितलें होतें कीं,—पण तें आतां बोलून काय `करायचें आहे ! मी त्यांना हवी असणारी गोष्ट केली, आतां त्यांच्यावर माझी सत्ता सुरू झाली !

एकदां माधव, नलिनी, अनंत व यमुना यांनीं मला विचारलें, "लीले, ह्या एकंदर प्रकाराचा अर्थ काय ?"

यावर मी उत्तरल्यें, "तुम्हांला हात जोडत्यें; पण निळकंठांनीं जी माझी अब्रू घेतली तेवढीच मला मरायला पुरे झाली. आतां तुम्ही आणखी माझा छळ करूं नका"—यांचीच कथा काय, पण प्रत्यक्ष गुणवंतरावांनीं व सरस्वतीबाईंनीं जेव्हां मला विचारलें कीं, 'याचा अर्थ काय,' तेव्हां त्यांनाहि मीं हेंच सांगितलें, "निळकंठांनीं माझा हात धरला, व मला ओढीत—"

आतां सांगा, जगांत खरें कोण ? निळकंठराव खरे का मी खरी ? जग म्हणेल व मीहि जगाच्या म्हणण्याला संमति देईन कीं, मी खरी. पण माझ्या मनाला मी काय सांगूं !—परमेश्वरा, हें आत्मवंचनेचें दुःख वैऱ्यालाहि देऊं नकोस. या वेळीं मला पृथ्वीच्या मोलाचा धडा मिळाला कीं, सुखाचा शोध लावण्याचा मार्ग, जगाच्या डोळ्यांत धूळ फेंकून गारुडी जसा मातीचा रुपया करून दाखवतो, तशी पापाची पुण्याई करून दाखवणें किंवा जादुगाराप्रमाणें सभोंवारच्या जगाची नजरबंदी करणें, हा नव्हे. नजरबंदी करणारे गारुडी जगांत पोटापुरता पैसा मिळवतात; पण रात्रौ त्यांच्या तोंडांत किडे पडतात असें म्हणतात. खरेंखोटें देव जाणे. पण मी जी आज साऱ्या लोकांची नजरबंदी

केली, व निळकंठांना पुण्यवंतांचे पार्पी बनवून मी पतिव्रताशी मिरवल्यें, त्यामुळें आज माझी अब्रू जगांत राखली गेली, व कदाचित् वाटेंतले बाकीचे कांटे काढले तर गुणवंतरावांच्या संसारांतलें गृहिणीपदहि मला मिळवतां येईल. पण मनांतलें मन विश्वासघाताच्या दुर्गंधांतील पापरूप किड्यांच्या बजबजाटांत असें नर्ककुंड बनलें आहे कीं, नको हा जन्मसा मला झाला आहे. तरीहि संसाराची आशा कांहीं सुटत नाहीं. हे भगवान्, मला आतां अशी छळूं नकोस. हा पापांचा पर्वत तोलून धरण्याइतकी खंबीरता माझ्या मनाला दे !

*   *   *   *

यमुनेचा तर आग्रह पडला कीं, सरस्वतीबाईंनीं बाळंतपणाला बाहेर गेलें पाहिजे व कोणत्या ना कोणत्या उपायांनीं एखाद्या अनाथबालकाश्रमांत त्या बाळाला पाठवलें पाहिजे. तसें झालें नाहीं व बाबांनीं–दिनकररावांनीं 'हें मूल आपल्या पोटचें नव्हे' असें सांगून घटस्फोट केला, तर 'असल्या दुराचारी स्त्रीची मुलगी मी' हें सांगायला आपण जिवंतहि राहाणार नाहीं, अशी यमुनेनें शपथ घेतली होती. तिच्या आग्रहासाठीं नाहीं तरी स्वतांच्या अब्रूसाठीं व शेजाऱ्यांच्या लाजेसाठीं गुणवंतरावांनीं सरस्वतीबाईंच्या बाळंतपणाची व्यवस्था येथील हॉस्पिटलमध्यें केली, व ल महिन्याचें झाल्यावर त्यांना पंढरपुरला पाठवायच्या, तें मूल पाळण्यांत टाकायचें व यात्रेहून येतांना मूल मेलें असा बोभाटा करून जगाच्या डोळ्यांत धूळ फेंकायची, अशी योजना ठरली. त्या प्रमाणें सरस्वतीबाई बाळंतपणाला गेल्या.

माझ्याशीं पुनर्विवाह करावा, असा सरस्वतीबाईचाहि गुणवंतरावांना आग्रह पडल्याकारणानें त्यांना नाहीं म्हणतां येणें शक्यच नव्हतें. सरस्वतीबाईंच्या अब्रूचा भ्रमाचा भोंपळा फोडणें किंवा न फोडणें आतां सर्वस्वी माझ्या हातीं असल्यानें व विशेषतः गुणवंतरावांची चरित्रपरंपरा लोकांच्या संशयाला कारण होईल या भयानें, माझ्या पुनर्विवाहाचा योग जुळून यायचा होता. ही गोष्ट होतां होतां बहुतेक ओळखीच्या माणसांच्या तोंडीं झाली. इतकेंच काय; पण विधवानिवासांत आमचा पुनर्विवाह व्हायचा, हेंहि ठरलें. इतकें ठरल्यावरहि गुणवंतरावांनीं निळकंठराव व मनोरमा यांचा दुष्टावा कांबरें करावा ? पण हिंसा हा जसा क्रूर श्वापदांचा जन्मजात गुण असतो, तसा उपवर तरुणींच्या शीलाची माती करूनच आपल्या आयुष्याचें मोल वसूल करण्याचा त्यांचा

विषारी स्वभाव होता. बाकी, मी त्यांची अर्धांगी झाल्यावर त्यांचे हे सारे दुर्गुण घालवीन, अशी मला आशा होती.

गुणवंतरावांचा माझ्याशीं पुनर्विवाह ठरला, तरी मध्यें शारदाबाईंचा आड पडदा होता. पहिली बायको जिवंत असतां दुसऱ्या विधवेशीं पुनर्विवाह केल्याबद्दल प्रार्थनासमाजांत एका अस्सल समाजसुधारक प्रौढ कुमारिकेचें निषेधपर भाषण झालेलें मीं नुकतेंच विधवाविवाहाच्या कायद्याच्या वाढदिवशीं ऐकलें होतें. अशा स्थितींत शारदाबाई जिवंत असतां जर आमचा पुनर्विवाह झाला, तर सुधारकांतहि आम्हांला कोणी जोड्यांपाशीं उभीं करणार नाहींत, या भयानें आम्हांला तसें करतां येईना. यावर गुणवंतराव म्हणत कीं, गोपाळराव घांट्यांसारखा पुनर्विवाह करून त्यांच्यासारखी कीर्ति मिळवायची. अनायासें परिस्थितिहि अनुकूल होती. मी शारदाबाईंच्या शुश्रूषेसाठींच गुणवंतरावांच्या घरांत आल्यें होत्यें, व शारदाबाईंनीं मला खासा टोमणा हाणला होता, "तरण्याबांड बायकांना मोलकरीण म्हणून, दाई म्हणून, सुईण म्हणून किंवा मास्तरीण म्हणून कधीं-कधीं घरांत ठेऊं नये; आणि गरभारशा, बाळंतशा किंवा आजारी असतांना तर मुळींच ठेऊं नये. त्या मग सवती होऊं पहातात व शेवटीं सुधारणेच्या नांवावर त्यांचा गळेपडूपणा शोभवून घ्यावा लागतो, असा उपदेश माझ्या आईनें मला गर्भादानाच्या दिवशीं केला आहे."

हा टोमणा मला या ठिकाणीं आठवला याचें कारण गोपाळराव घांटे हे गुणवंतरावांचे एक जीवश्च कंठश्च स्नेही होते. गोपाळरावांचा पुनर्विवाह असल्याच घालमेलींनीं जमून आला होता, व त्याची काळी बाजू ध्यानीं न घेतां सुधारकांनीं त्यांचा गौरव केला होता. पण मला असली बाष्कळ सुधारणा नको होती. निदान आमच्या पुनर्विवाहाला 'ही घांट्यांच्या पुनर्विवाहाची सुधारलेली आवृत्ति आहे' अशीं नावें लोकांनीं ठेवलेलीं मला आवडलीं नसतीं. त्यापेक्षां एखाद्याची राख म्हणून घ्यायचें कपाळीं आलें तरी पत्करलें, त्यांत पापांवर पांघरूण तरी पडत नाहीं, असें माझें मत होतें. पण सुधारणेच्या बाबतींत गुणवंतरावांना घांटे म्हणजे ब्रह्मदेव वाटत असत, तिथें माझा नाइलाज होता. त्या वेळीं मनाशीं एवढीच खूणगांठ बांधली कीं, वाइटाकडे नेहमीं चित्ताची प्रवृत्ति असते ती अशी.

ही सुधारणा कितीहि भयंकर असो, तिचा उपयोग झाला तर आपणहि

करावा, असें मला वाटलें. मला घाई होती, ती आतां यमुनेसाठीं! नुक्तेंच दिवाकरपंत कानेटकर नांवाच्या एका मुलाशीं तिचें लग्न गुणवंतराव व सरस्वतीबाई यांनीं ठरवलें होतें; पण सरस्वतीबाईंना बाळंतपणाला जावें लागल्यानें व यमुना तर लग्नालाच नाकबूल असल्यानें ती गोष्ट तेवढ्यावरच राहून गेली. बरें; घरांत तरी यमुना सुरक्षित राहील म्हटलें तर गुणवंतरावांची पापी दृष्टि अलीकडे तिच्यावर वळली होती. 'आईबापांनीं ह्या घरच्या कुंटिणखान्यांत—ह्या मेल्या राक्षसाच्या दाढेंत मला कां उभी करून ठेवली नकळे!' असे यमुनेच्या तोंडचे उदासवाणे उद्गारहि मला अलीकडे एकदोन वेळां ऐकूं आले होते.

अशा स्थितींत मीं मनाचा ठाम निश्चय केला कीं, शारदेला विष पाजून निजधामाला पाठवल्याशिवाय गत्यंतर नाहीं. आणि काय करायचे ते सोहाळे विचारांच्या ओघाबरोबर आजच्या आज करायचे, नाहींतर न जाणो, एक तर यमुनेच्या शीलाची गुणवंतरावांकडून लूट व्हायची, व उद्यां सरस्वतीबाई आल्यावर त्याच माझी मोठी सवत होऊन बसायच्या!

*　　　*　　　*　　　*

गुणवंतरावांनीं बेसुमार मारल्यामुळें म्हणा, कीं स्वतःच्या कर्मभोगामुळें म्हणा, आज शारदाबाई बेजारपणें आंथरुणाला खिळल्या होत्या. त्यांचा श्यामसुंदरहि त्यांच्याच बिछान्यावर त्यांच्या शेजारीं झोंपीं गेला होता. मी माझ्या मनांत समजून चुकल्यें कीं, शारदाबाईंच्या ह्या यातनांना मी कारण आहें. पण अघोर कर्म करूं लागलें असतां विचार केला म्हणजे धीर खचतो, म्हणून मी विचार न करतां दुधाची वाटी भरून आणली. गुणवंतरावांनीं कसल्यातरी कामासाठीं प्रुसिक ऍसिड कारखान्यांतून आणून ठेवलें होतें व हें क्षणिक मरण देणारें अत्यंत भयंकर विष आहे, असें आम्हां सर्वांना बजावून सांगितलें होतें, त्यांतले दोन थेंब त्या दुधांत घालून ते बोटानें ढवळले. ती वाटी घेऊन शारदेच्या ओंठांना लावायला मी आल्यें, तेव्हां नुकताच शारदेचा डोळा लागला होता. तिच्या पोटीं देवानें गर्भवासाचा पाळणा बांधला होता व त्या पाळण्यांत चार महिन्यांचें बाळ झोंपीं गेलें होतें. त्या पाळण्याच्या दोऱ्या गुणवंतरावांच्या लाथांनीं अगदीं खिळखिळ्या झाल्या असल्या पाहिजेत, असें तिचा श्वासोच्छ्वासच सांगत होता.

ह्या गर्भवासांतील पाळण्याच्या दोऱ्या व त्यांच्या बरोबरच शारदाबाईंच्या जिवाचा झोला ह्या विषाच्या वणव्यांत मी जाळून टाकायला आल्यें तेव्हां मनांत

म्हटलें, " शारदाबाई, उठा ! त्यांच्या गर्भांत झोंपीं गेलेल्या बाळा, हें पहा तुझें मरण ह्या पेल्यांतील दुधांत बुडी मारून दडून बसलें आहे. तुझी आई जगती वांचती, तर तूंहि पुऱ्या दिवसांनीं जन्माला येऊन जगतें वांचतेंस ! मग तुझ्या आईनें याच वाटींतून दूध पाजून तुला लहानाचें मोठें केलें असतें; तूं रडून आकांत करूं लागलेंस कीं तिनें हीच दूधवाटी तुझ्या ओंठांना लावून तुला डाव्या उजव्या आंगाखांद्यावर खेळवलें असतें. पण राजसा ! मी चांडाळीण तुला दुधाच्या पान्ह्या ऐवजीं हा विषाचा पान्हा पाजून आज मृत्यूच्या आंगा-खांद्यावर खेळवणार आहें. ह्या दोन जिवांच्या हत्या "– हा विचार मनांत आल्या बरोबर माझे हात लटलट कांपूं लागले. मी विषाचा पेला खालीं ठेवला व विचार करूं लागल्यें, तों ते विचार सुष्टाव्याचे ! नकोत–हे सुष्टाव्याचे विचार नकोत. स्वतःच्या सुखासाठीं एका निरपराधी साध्वीच्या जन्माची माती करा-यची, हा कुठच्या देवाघरचा न्याय ?– हा आम्हां विधवांच्या घरचा न्याय ! होय, हाच आम्हां विधवांच्या घरचा न्याय !–मीं मनाला धीर देऊन हांक मारली, " शारदाबाई ! "

" ओ ! " शारदाबाई माझ्या हांकेनें जाग्या होऊन दाटल्या कंठानें विचारूं लागल्या, " काय म्हणतां लीलाबाई ! "

मीं माझ्या हातांतली दुधाची वाटी त्यांच्या हातीं देत म्हटलें, "हें एवढें दूध प्या. गरभारशा तुम्ही, मघाशीं तुमचा जीव हैराण झाला होता–हें एवढें घ्या ! "

इतक्यांत श्यामसुंदर ' आई मला दूध ! ' ' आई मला दूध ! ' करीत डोळे चोळीत चोळीत उठून बसला.

शारदाबाईनीं माझ्या हातचा दुधाचा पेला घेऊन श्यामसुंदरला समजावलें, " देत्यें बरें बाळ ! थांब जरा. "

श्यामसुंदर जास्तच हट्ट धरून बसला, " मला आधीं दूध पाहिजे. "

शारदाबाई श्यामसुंदरला पोटाशीं गोंजारून म्हणाल्या, " माझा सोना तो ! तुला आधीं देत्यें, तुला दिल्याशिवाय मी प्यायची नाहीं. "

मला हा श्यामसुंदराचा हट्ट पाहून कांपरें भरलें. ही नव्यानें होणारी बाल-हत्या कशी टाळावी, याचाच मला उलगडा होईना. मी शारदाबाईंना म्हटलें, " तें तुम्हीं घ्या, त्यांत नेहमींचें औषध घातलेलें आहे. मी त्याला दुसरें आणून देत्यें. "

यावर तो गुलाम श्यामसुंदर मला म्हणाला, "असेना, आईचें औषध कांहीं कडू नाहीं. मला आईच्यांतलेंच दूध पाहिजे."

मी घाईघाईनें घरांत गेल्यें, व एका पेल्यांतून दूध आणून तें श्यामसुंदराला देत म्हटलें, "हें धर बाळ, दूध !"

पण त्या बिचाऱ्याचा कसा काळ ओढवला होता नकळे; तो हट्ट धरून बसला, "मी नाहीं जा पिणार तें, मला आईच्यांतलें दूध पाहिजे."

"तसा नाहीं पिणार तो ! आणा तें इकडे." असें म्हणून शारदाबाईनीं माझ्या हातांतली दुधाची वाटी घेऊन ती आपल्या वाटींत ओतली, व त्यांतलें अर्धें पुन्हां त्या वाटींत ओंतून ती वाटी श्यामसुंदराच्या ओंठांना लावून म्हटलें, "पुरे झालें बाळ, दूध ?"

दूध पिऊन झाल्यावर 'पुरे' म्हणून श्यामसुंदर पुन्हां झोंपीं गेला. शारदाबाईनीं बाकीचें दूध पिऊन बिछान्यावर आंग टांकलें. इतक्यांत यमुना जागी होऊन माझ्या खोलींत येऊन मला विचारूं लागली, "कसली गडबड आहे हो लीलाताई ?"

मी फाटलेल्या अंतःकरणानें उत्तरल्यें, "गडबडसडबड कांहीं सुद्धां नाहीं. शारदाबाईनीं आज साऱ्या दिवसांत कांहीं खाल्लें नव्हतें, तें त्यांना दूध प्या म्हणाल्यें."

यमुना आल्या पावलां परत निघून गेली. मीहि शारदाबाईच्या खोलीचा दरवाजा बंद करून बाहेर आल्यें. मात्र वाऱ्यानें दरवाजाची उघडझांक होऊं नये म्हणून दरवाजाला बाहेरून कडी लावून घेतली.

मी मनांत पक्कें समजून चुकल्यें कीं, शारदाबाई स्वर्गाला चालल्या व बरोबर आपल्या आवडत्या श्यामसुंदरालाहि घेऊन चालल्या. देवाचीच इच्छा तशी होती, त्याला मी तरी काय करणार ! ह्या विषाच्या वाटींतच श्यामसुंदराचा मृत्यु त्याच्या आईच्या निऱ्यांना बिलगून उभा होता, हें हा वेळपर्यंत माझ्या स्वप्नींहि नव्हतें. ह्या पापांच्या उतरंडीवर आतां मी माझा संसार थाटणार ! देवा ! जगांतील प्रत्येक विधवेला आपला नवा संसार थाटतांना कोणाना कोणा शारदेच्या संसाराची व तिचीहि अशीच होळी करावी लागते का ? आम्हां विधवांच्या फुटक्या कपाळावर उसन्या सौभाग्याची जी टिकली लागणार, ती कुणा साध्वीच्या व तिच्या मुलांबाळांच्या रक्ताचीच लागली पाहिजे,

असा आम्हांला परमेश्वरी शाप आहे का ? आतां शारदा व श्यामसुंदर यांचे पंचप्राण वातावरणांतील लहरींच्या विमानांत बसून वैकुंठीं चालले ! अशी त्यांच्या जीवनाची चिता पेटवून त्या चितेच्या होळीवर मला माझ्या सौभाग्याची पोळी भाजायची आहे ! परमेश्वरा, शारदेच्या व तिच्या मुलांबाळांच्या आत्म्यांना अक्षय शांति दे !

* * * *

पुन्हां तोच पापपुण्याचा विचार ! बस्स ! या पुढें हा विचारच नको. मी करत्यें तें माझ्या मतें तरी पुण्यच करत्यें, व आतांपर्यंत केलें तें पुण्यच केलें. शारदेला भवयातनांतून सोडवली, हें पुण्य नव्हे का ? शारदेच्या गर्भातल्या अर्भकाला ह्या दुरंगी दुनियेंतील पापी जीवनाचा वाराहि लागूं दिला नाहीं, हें पुण्य नव्हे का ? श्यामसुंदरला नंदनवनांत देवबालकांबरोबर खेळायला पाठवून दिलें, हें पुण्य नव्हे का ? आणि इतक्या पुण्याईच्या जोरावर—मीहि परमेश्वराचीच कन्या आहें; मी माझें जीवन सुखाचें करूं पाहात आहें, हेंहि पुण्यच नव्हे का ? हें सारें पुण्याईचें कार्य आहे; याला कुणीं पाप म्हणूं नये !

आतां तरी मी गुणवंतरावांची होणार खास ! ह्या भावी संसाराची कल्पनाचित्रेंहि मला किती रमणीय वाटत होतीं ! नवरावायकोचें नातें पहिल्यावहिल्यानें ओळखणाऱ्या जोडप्याला तिसऱ्या माणसाची अडचण होते. हा श्यामसुंदर जिवंत असता तर—पोरगाच तो, 'आई आई' करीत रात्रींबेरात्रीं ओरडत उठता. आणि गुणवंतरावांनाहि त्याचा फार लळा होता; त्यानें त्यांच्याच पलंगावर झोंपणार असा हट्ट घेऊन बसल्यावर साराच रंगाचा बेरंग व्हायचा. पण देवाला संकट, त्यानें परस्पर आईच्या हातून मुलाला विष पाजवलें ! इतकें झालें तरी ह्या बिंबाधराची अडचण आहेच. ह्याची जोपासना करण्यांत मला सोन्यासारख्या रात्री ह्याच्या पाळण्याची दोरी हलवीत जागून काढाव्या लागणार ना ! तें कांहीं नाहीं; याला एखाद्या अनाथबालकाश्रमांतच पाठवला पाहिजे. तो कांहीं माझ्या पोटचा नाहीं; पाठचा आहे. इतकें झाल्यावर तरी देवा, पहिलीं कांहीं वर्षें मला गर्भार—बाळंतपण देऊं नकोस. गर्भारपण, बाळंतपण हें आहेच आम्हां बायकांच्या नाशिबीं. पण हे पण—ह्या प्रतिज्ञा पुऱ्या करतांना मला माझ्या नवांनवसांच्या पतिदेवांच्या सेवेला अंतरावें लागेल तें ! त्यापेक्षां मला मुळींच मूल न झालेलें पत्करलें. आमची

आम्हीच आपलीं मुलें. ते मुलगे; मी मुलगी. आम्ही दोघें हा संसाराचा खेळ किती मजेनें खेळूं पण! आतां मी गुणवंतरावांची झाल्यासारखीच आहें, ही कल्पना ध्यानीं आल्याबरोबर मी टवटवीत झाल्यें, हे माझे बसलेले गाल जरा वर आले, असें माझें मलाच आतां वाटूं लागलें आहे! लग्नन्हाणांत नवरीमुलगीच्या डोकीवर एकवार नवऱ्याच्या शेंडीचें कळसवणी पडलें, कीं ती केळीच्या खांबासारखी हां हां म्हणतां आंगाखांद्यानें भरते असें म्हणतात. पण तो गुण कळसवण्याचा कसला! त्याचें तंत्र निराळेंच आहे, तें मला माहीत आहे–त्याचें तंत्र तेंच!



# झुळुक १४ वी

## यमुना (३)

उजाडतें न उजाडतें, तोंच लीला माझ्या खोलींत आली व मला सांगूं लागली, " यमू, शारदाबाई व श्यामसुंदर यांची काय दशा झाली, ती पहा!"

मी एकदम घाबरल्यासारखी झाल्यें. मी लीलेबरोबर काकूंच्या खोलींत जाऊन पहात्यें, तों काय! काकू बिछान्यावर थंडगार पडलेल्या व त्यांचा गोजिरवाणा श्यामसुंदर त्यांच्या कुशींत काळनिद्रेंत झोंपीं गेलेला! जवळ दुधाच्या दोन वाट्या रिकाम्या पडल्या असून प्रूसिक ॲसिडची बाटली काकूंच्या उशाशीं होती. हा देखावा पाहून माझ्या अंतःकरणाला एकदम धक्का बसल्यासारखा झाला. लीला मला धीर देत म्हणाली, " विचारीं मायलेंकरें आम्हांला सोडून गेलीं. आतां असा धीर सोडून कसें चालेल! मी गुणवंतरावांना बोलावून आणत्यें."

काका येऊन पहातात, तों त्या मेलेल्या मळ्यांच्या तोंडावरील प्रेतकळेपेक्षां त्यांना जास्त तें काय दिसणार! त्यांनीं काकूंच्या उशागतची बाटली पाहिली, दुधाच्या वाट्या पाहिल्या व एकदम संशयग्रस्त मुद्रा करून लीलेला विचारलें, " लीले, हा काय प्रकार आहे?"

लीला उत्तर देतांना गोंधळल्यासारखी होऊन म्हणाली, " मला कांहीं माहीत नाहीं."

" रात्रीं ह्या मायलेंकरांना दूध कोणीं पाजलें होतें?" काकांनीं विचारलें.

लीला उत्तरली, " दूध मीं पाजलें नाहीं, मीं आणून दिलें."

" तुमचा रात्रींचा सारा संवाद मीं ऐकला होता बरें लीले! खरें बोल." काका म्हणाले.

काकांच्या दरडावणीच्या प्रश्नानें लीला गर्भगळित होऊन घरांत गेली व आपल्या खोलींत शिरून दरवाजाला कडी लावून घेत म्हणाली, " मला कांहीं माहीत नाहीं."

काका मला म्हणाले, " यमू, ह्या चांडाळणीनें माझा गळा कापला. मीं

तिच्यावर विश्वास टाकला; पण तिनें माझा असा घात केला. विधवाच पडली ती; तिच्यापाशीं कसला आला आहे विश्वास! जगाच्या आदिकालापासून अंतकालापर्यंत भूत-भविष्य-वर्तमान ह्या तीन मशाली पाजळून त्या मशालींच्या प्रकाशांत मानवी संसाराचा विश्वकोश जन्मोजन्मीं धुंडाळून पाहिला, तरी त्यांत विधवा व विश्वास ह्या दोन शब्दांचें वास्तव्य एकत्र सांपडणें शक्य नाहीं. असल्या बेइमान निमकहराम विधवेवर मीं माझ्या बायकोमुलांच्या शुश्रूषेचा विश्वास टाकला, त्याचें मला हें प्रायश्चित्त मिळालें. हाय हाय! यमू, माझा श्यामसुंदर मी आतां कुठेंग पाहूं! माझी शारदा मला आतां कशी भेटेल!"

काका किती निष्ठुर व विषयलंपट झाले तरी ते मनुष्यप्राणीच होते! त्यांच्या जिवाचे हे दोन जिवलग तुटून पडलेले पाहून त्यांना रडूं आलें, यांत आश्चर्य तें काय! पण त्यांच्या शोकापेक्षां या वेळचा त्यांचा रागच मला जास्त अनावर भासला. पुन्हां पुन्हां ते चवताळलेल्या वाघासारखे, लीला ज्या खोलींत जाऊन दडून बसली होती, त्या खोलीकडे पहात. पण ज्याचें नांव तें, लीला दरवाजा म्हणून उघडीना.

इतक्यांत विमला जागी होऊन बाहेर आली. तिला वाटलें कीं, श्यामसुंदर झोंपींच गेला आहे. ती त्याला हांका मारूं लागली, "श्याम, अरे श्याम! चल-ऊठना खेळायला!"

पण श्याम आज विमलेवर-विमलेवरच कां, साऱ्या दुनियेवर रुसून अक्षय समाधींत रंगून गेला होता, तो विमलेच्या हांकांनीं कसा जागा होणार! विमलेला कांहीं हें गूढ उकललें नाहीं. ती काकांना विनवूं लागली, "काका, श्यामला उठवाना हो-ताई, तूं तरी त्याला जागा करना ग!"

विमलेचीं हीं बाळबोलणीं ऐकून काकांच्या नेत्रांतून वाहणाऱ्या दाभणाएवढ्या अश्रुधारा बोटाएवढ्या वाहूं लागल्या. मी विमलेची समजूत घालून तिला सांगूं लागल्यें कीं, आपली काकू, आपला श्यामसुंदर हीं आपल्याला सोडून देवाच्या घरीं गेलीं. यावर ती मला विचारूं लागली, "देवाच्या घरीं कुठचीं जातील? हीं इथें तर झोंपीं गेलीं आहेत. थांब. तूं नाहीं तर मी श्यामला जागा करत्यें हं!"

विमला लगबगीनें श्यामसुंदरापाशीं गेली, व नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें त्याच्या गालाचा साखरचुंबा घेऊन त्याच्या कानाशीं तोंड नेऊन गुजुगुजु

बोलूं लागली, " ऊठ ना रे श्याम ! आज मी तुला इस्पिकांचा बंगला बांधायला शिकवीन. "

बोलतां बोलतां विमलेचा चेहरा गोरामोरा झाला. मीं विचारलें, " विमले, असें काय ग ? भ्यालीस कीं काय ? "

" ताई, श्यामचे गाल माझ्या ओंठांना थंडगार लागतात ! " असें म्हणून जाणत्या माणसाचा आव आणून विमलेनें श्यामच्या सदऱ्याखालीं त्याच्या छातीला हात लावून पाहिला, तेव्हां तर ती पुरी कोमेजली, व मला रडव्या स्वरानें विचारूं लागली, " ताई, माणसें मेलीं म्हणजेच इतकीं थंडगार होतात ना ग ? "

" होय ! " असें सांगून मीं विमलेच्या हाताला धरून तिला माझ्यापाशीं घेतली. इतक्या वेळांत भयानें तिचें आंग थरथर कांपत होतें. माणसें मेलीं म्हणजे थंडगार होतात, हें आमचा बाबू--माझा मोठा भाऊ--देवीच्या विकारानें दीड वर्षापूर्वी वारला, तेव्हां तिला कळलें होतें, व त्याला बांबूंच्या तिरडीवर बांधून स्मशानांत लोक नेऊं लागले, तेव्हां ' माझ्या बाबूला असे बांधूं नका हो ! त्याचें आंग दुखेल ' असें ओरडून रडतां रडतां ती बेशुद्ध पडली होती. तेव्हांपासून आतांपर्यंत तिला लागलेला बाबूचा ळळा सुटला नव्हता. ' देवाच्या घरीं बाबू गेला, तो अजून कसा आला नाहीं ? त्याला पत्र पाठवून नाहीं तर तार करून बोलावा; मला त्याला पाहीनसें झालें आहे ' असा तिनें नेहमीं हट्ट घ्यावा, व ' तो आतां देवाच्या घरून परत येणार नाहीं ' असें सांगितलें म्हणजे रडूं लागावें. अशा स्थितींत आज तोच भयाण प्रकार पाहून जर रात्रीं ' माझ्या ताटांत दूधभात जेवायला श्यामसुंदर पाहिजे ' म्हणून ती हट्ट धरून बसली, तर आम्ही दुर्दैव्यांनीं आतां तिला कुठचा श्यामसुंदर आणून द्यावा !

काकू व श्यामसुंदर यांच्या मरणाची वार्ता वाऱ्यासारखी आमच्या चाळींत पसरली, व जो तो आमच्या घरीं समाचाराला येऊं लागला. गंगाबाई--मनोरमेची आत्या माझ्या आईची पक्की दावेदारीण होती, तरी ती व तिची मुलगी--माझी मैत्रीण बाबीहि येऊन आमचें शांतवन करूं लागली. मीं विमलेला बाबीच्या स्वाधीन करून सांगितलें, ' जा. बाबीताईच्या घरांत जाऊन खेळ जा.--बाबी, कृपा करून आज कांहीं तूं शाळेंत जाऊं नकोस. तुमच्या

मुख्य मास्तरीणबाईंना शेजारच्या सुंदराताईंबरोबर चिठ्ठी पाठव, व विमलेला तेवढी सांभाळ, नाहींतर पोरगी भिईल बिईल."

बाबी माझ्या शब्दाला मान देऊन विमलेला घेऊन आपल्या घरीं गेली.

काकी व श्यामसुंदर विषप्रयोगानें मेलीं, हें जरी सर्वांना माहीत होतें, तरी जगाचा व्यवहार ध्यानीं घेऊन त्या तशा शोकमय परिस्थितींतहि एका हातानें अश्रु पुशीत काकांनीं सर्वांना सांगितलें, "शारदा दुधांत चुकून औषधाच्या ऐवजीं विष ओतून प्याली, व त्या दुधाचा एक घुटका तिनें श्यामसुंदरला पाजला, त्यामुळें त्यांची ही दशा झाली."

लोकांना काय, हेंच खरें वाटलें. यामुळें लीलेच्या जिवाला थोडा धीर आला व ती बाहेर येऊन काकांचे तेच शब्द आपल्या मायावी अश्रूंत भिजवून जरा नरम करून ज्याच्या त्याच्या कानीं कोंबूं लागली. त्यांतलें मायावीपण व पाप काकांना माहीत होतें, मला माहीत होतें, व गंगाबाई, बाबी यांनीं आमचा संवाद इत्थंभूत ऐकल्या कारणानें त्या दोघींनाहि माहीत होतें. त्यांनीं या दोन मृत्यूंतील सत्य चवाठ्यावर आणण्याचें मनावर घेतलें असतें तर खुनी कोणीतरी एक ठरून फांशीं जातें, ही गोष्ट निराळी; पण आम्हां बायकांपोरांची सरकार-दरबारीं साक्षीपुरावे देतांना विटंबना होईल, याचें मला भय होतें. काकांनाहि तेंच भय होतें. यामुळें लीलेनें विषप्रयोग केला, अशी आमच्या मनाची बालंबाल खात्री असतांहि तिचें नांव घ्यायला आम्हांला तोंड नव्हतें.

मीं गंगाबाईंना बाजूला घेऊन त्यांचे पाय धरून सांगितलें, "बाबीची आई, माझ्या आईनें तुमच्याशीं उभा दावा धरला असला तरी मी कांहीं तुमची दावेदारीण नाहीं. माझ्या आईच्या पापांबद्दल व चुकांबद्दल मी तुमची क्षमा मागतें. मला तुमची बाबीच समजा व आजच्या प्रकाराविषयीं खरी खोटी कोणतीहि गोष्ट बाहेर बोलायचें टाळून आमची अब्रू वांचवा."

खरोखरच गंगाबाई थोर मनाच्या होत्या. त्यांनीं या वेळीं मला खरा धीर दिला. बाबी तर माझी जिवलग मैत्रीण होती. ती कधींच या गोष्टी जगांत बोलली नसती.

आम्ही काकूंच्या व श्यामसुंदरच्या प्रेतांकडे पाहून रड रड रडलों. पण अशीं रडत किती वेळ बसणार! हीं प्रेतें एकदांचीं स्मशानांत जाऊन भस्मसात् होईपर्यंत खुनाचा आरोप माथीं मारला जातो कीं काय, याचें मला भय होतें.

शेवटीं काकांनीं एका शेजाऱ्याकरवीं सरकारी कचेरींत काकूंच्या आत्महत्येची वर्दी दिली व त्याबरोबरच हजार हजार रुपयांचा एकएक, असे दोन तोंडे भरलेल्या पिशवीचें तोंड मोकळें सोडलें, तेव्हां एकदांचें सरकारी चौकशीच्या समुद्र-मंथनांतून काका म्हणत होते तशाच प्रकारानें 'आत्महत्या झाली,' असें रत्न बाहेर पडून प्रेतांना अग्नि देण्याला परवानगी मिळाली, व अखेर काकू आणि श्यामसुंदर ह्या मायलेंकरांना स्मशानांत नेऊन शेजारीं शेजारीं जाळण्यांत आलें—राम राम !

काका स्मशानांतून परत यायच्या पूर्वीच हॉस्पिटलमधून आमच्या ओळखीचा एक नोकर वर्दी घेऊन आला कीं, आई बाळंत झाली; मुलगा झाला. लीला मला म्हणाली, " यमूताई, झाल्या गोष्टी कांहीं नव्हेशा होत नाहींत. मेलीं ती गेलीं; पण जिवंत आहेत त्यांची तर आपण काळजी घेतली पाहिजे ! आज एकदां जाऊन बाळबाळंतिणीला पाहून आलेलें बरें ! "

विमलाहि हट्ट धरून बसली कीं, मी आईचें बाळ पाह्यला जाणार ! मला मनांतून असा संताप आला कीं, कुठचा पांढऱ्या पायांचा पोर जन्माला आला; त्याच्या पायगुणानेंच माझ्या काकूंचा, माझ्या श्यामसुंदराचा काळ ओढवला. आई बाळंत झाली व मुलगा झाला, ही बातमी जगांत कळली तर ती आठवण झाल्याबरोर आईच्या—ह्या आमच्या कुळांतील एका चांडाळणीच्या दुर्वर्तनामुळें आमच्या साऱ्या कुळाला कलंक लागला गेला ! हे विचार मनांत येतांच मला वाटूं लागलें कीं, संध्याकाळीं बाळ बाळंतिणीच्या समाचाराला म्हणून जावें, जातांना बरोबर तीच विषाची बाटली न्यावी व दुधांतून म्हणा किंवा अन्नांतून म्हणा, विष घालून त्या पापी चांडाळणीची व तिच्या पोटीं जन्माला आलेल्या जिवंत पापाची ह्या जगांतून कायमची मोकळीक करावी. पुढें त्याचा परिणाम काय होईल तो होईल; पण आज तर आमच्या कुळाला लागलेला डाग पुसला जाईल !

मीं लीलेला स्पष्ट सांगितलें, "बाळबाळंतीण खुशाल असोत कीं मरोत; मला त्यांचा समाचार घ्यायला फुरसत नाहीं. "

लीला मला म्हणाली, " असें काय यमू, तुझी जन्मदाती आई ती ! "

यावर संतापाच्या भरांत मी उत्तरल्यें, " हो ! आणि असल्या व्यभिचारी आईच्या पोटीं मी जन्माला आलेली, त्या मलाहि मरण येईल तर चांगलें. "

* * * *

दोन प्रहरीं गंगाबाईनींच आम्हांला अन्नाला लावलें. पण जेवण कुणाला जाणार! काकांनीं तर पांचां बोटांनीं अन्नाला स्पर्शहि केला नाहीं. त्यांनीं स्मशानांतून आल्याबरोबर लीलेला सांगितलें, " चांडाळणी, तूं माझ्या बायको-मुलांचा घात केलास! तुझें वास्तव्य या घरांत आहे, तोंवर मी अन्नाला शिवणार नाहीं. या घरांतूनचसें काय; या जगांतून ज्या वेळीं तुझें तोंड काळें होईल, त्या वेळीं माझा जीव शांत होईल. "

लीला पुन्हां घरांत जाऊन दडून बसली. तिलाहि आज जेवण गेलें नाहीं. विमला जेवीना म्हणून तिची समजूत करण्यासाठीं अळ्याबळ्यानें मीं तिच्या तोंडांत चार घांस कोंबले, तेव्हां तिच्याबरोबर तिच्या डोळ्यांचें पारणें फेडण्या-साठीं चार घांस माझ्याहि तोंडीं कोंबले, तेवढेंच माझें जेवण झालें.

संध्याकाळ झाली व आतां काळरात्र येणार, ती काळोखी भयाण वेळा कशी काढावी या विचारांत मी माझ्या खोलींत विचार करीत बसल्यें होत्यें, इतक्यांत बाबी माझ्या खोलीच्या खिडकीसमोर आली व म्हणाली, " यमू, वीणाताईच्या घरीं येतेस का? तिकडे तुला करमेल. आज वीणाताई बाळंत झाल्या; त्यांना मुलगा झाला. "

वीणाताईचेहि महिने भरले होते, हें मला माहीत होतें. पण त्या आजच बाळंत होतील, अशी मात्र कुणालाहि खात्री नव्हती. मीं मनांत म्हटलें, ह्या भयाण घरांत बसून तरी काय करायचें आहे! त्यापेक्षां मनोरमा व निळकंठ यांना भेटून तरी यावें. कालच निळकंठांचा मला निरोप आला होता कीं, आपण उद्यां मामांच्या घराला मुकणार आहों, त्यापूर्वी एकवार भेटून जा. मनोरमाहि आजच आपल्या आईबापांबरोबर पुण्याला लग्नाला निघून जायची होती. तिनेंहि मला भेटायला बोलावलें होतें.

बाबी व मी वीणाताईच्या घरीं गेलों, तों नेहमींप्रमाणें वीणाताई अर्थातच बाहेर दिसल्या नाहींत. मात्र एक खोली बाळंतीच्या खोलीसारखी सजवलेली असून तिच्या समोरच्या दिवाणखान्यांत मनोरमेची आई, वीणाताईची आई, कोणी-एक डॉक्टर कृष्णाताई व गंगाबाई बसलेल्या दिसल्या. बाबीहि त्यांच्यांतच जाऊन बसली. पण मनोरमा किंवा निळकंठ त्या ठिकाणीं दिसेनात, म्हणून मी त्यांच्या माडीवरील बैठकखान्यांत निघाल्यें. इतक्यांत मामींनीं मला हांक मारली, " यमू, अगोदर इकडे ये, हे पेढे धर. तुला आज पेढे देऊं नये.-

तूं सुतकी आहेस. पण तुम्हां सर्वांच्या इच्छेप्रमाणें वीणाताईनीं लीलाधराला जन्म दिला, मला नातू झाला, त्याचे हे पेढे धर.”

मामींच्या शब्दाला मान देऊन मला खालीं जाऊन बसावें लागलें. माझ्या बरोबर विमलाहि होतीच. आम्हांला कुंतलेनें घाईघाईनें पेढे आणून दिले व सांगितलें, “माझी ताई बाळंत झाली, बाबू झाला, त्याचे हे पेढे!–पण काय ग विमले, तुझ्या आईलाहि बाबू झाला, त्याचे पेढे मला नाहीं दिलेस ते?”

विमला यावर काय उत्तर देणार! ती बापुडवाणी होऊन माझ्याकडे पाहूं लागली. मीं तिला धीर देण्याच्या उद्देशानें तिच्या केंसांवरून हात फिरवून सांगितलें, “खा तो पेढा.”

पण शहाणी पोर ती; ती पेढा हातांतल्या हातांत घेऊन राहिली. सर्व मंडळीनें आपापल्या परीनें माझें शांतवन केलें; पण आईच्या बाळंतपणाची गोष्ट कुणींच मुखावाटे काढली नाहीं. सर्वांना माहीत होतें कीं, माझी आई घर सोडून हॉस्पिटलांत बाळंतपणाला गेली, यांतच कांहीं गोम आहे.

या वेळीं काय बोलावें, हेंच मला सुचेना. पण कांहीं तरी बोललें पाहिजे म्हणून मीं विचारलें, “वीणाताई बाळंत केव्हां झाल्या?”

‘बरोबर एक वाजून तेविस मिनिटांनीं.’ वीणाताईची आई-नर्मदाबाई उत्तरल्या.

“मुलगा रंगारूपानें कुणासारखा आहे?” मीं विचारलें.

यावर वीणाताईची आई उत्तरली, “रंगानें आईसारखा आहे––”

तें वाक्य नीरजाकाकूंनीं पुरें केलें, “पण तोंडवळा बापासारखा आहे.”

मीं विचारलें, “आतां मुलाचें नांव काय ठेवणार?”

यावर वीणाताई उत्तरल्या, “पांचां मुखीं परमेश्वर; तुम्हीं ठरवलें, तेंच नांव ठेवणार–लीलाधर!”

मध्येंच कुंतला दरवाजांत उभी राहून म्हणाली, “ताई, ताई, तुझ्या बाळाला जरा दाखव ना ग?”

“गप्प बैस ग जाग्यावर!” नर्मदाबाई कुंतलेवर ओरडून म्हणाल्या, “वीणे, तिन्हीसांजांची कातर वेळ झाली, आतां मुलाला कुणाला दाखवूं नकोस. दृष्ट-बिष्ट लागेल.”

म्हातारीच्या ह्या लळ्याचें मला कौतुक वाटलें. मुलगा, मुलगा म्हणून साऱ्या दुनियेंतल्या बायकांचा जीव परता आशेला आलेला असतो, तसाच

नर्मदाबाईचाहि आला होता. पण परमेश्वरानें त्यांना कांहीं मुलगा दिला नव्हता. बरें, मुलगा नाहीं तर नाहीं, वीणाताई एकुलती एक मुलगी झाली, त्या मुलीला तरी मुलगा व्हावा व तो आपण मांडीवर खेळवावा, अशी त्यांची उत्कट इच्छा होती. पण बरींच वर्षे वीणाताईनाहि कांहींच मूलबाळ झालें नाहीं. नर्मदाबाईच्या जिवाला ही गोष्ट फार लागे. त्या एकदां बेसुमार आजारी होत्या, तेव्हां वीणाताई नुक्ती गरोदर होती, व तिच्या मुलाचें—नातवाचें तोंड पाहिल्याशिवाय आपण इहलोकची यात्रा पुरी करणार नाहीं असा त्यांचा देवापाशीं हट्ट होता. तो हट्ट देवानें ऐकला, व त्या पुण्यपतिव्रतेच्या चित्ताचें शांतवन करण्यासाठीं किती नवस, किती सायास, किती उपास, किती पारणीं यांचे नजराणे घेऊन एकदांचा वीणाताईच्या उदरीं लीलाधर जन्माला घातला. इतक्या अपूर्वाईच्या नातवाला स्वतांची किंवा प्रत्यक्ष त्याच्या आईची—वीणाताईची दृष्ट लागेल म्हणून जपण्यांत नातवंडाची व त्यांतल्यात्यांत नातवाची हौस, हा एकच विशेष होता, व तो खास कौतुकास्पद होता.

* * * *

काका व आई यांनीं मिळून दिवाकरपंत कानेटकर नांवाच्या मुलाशीं माझें लग्न ठरवलें होतें, हें मला माहीत होतें. तो योग होतां होईतों जुळूं नये, अशी माझी इच्छा होती. असें कां होतें नकळे; पण मला नुसता बी. ए. किंवा बी. एस्सी. होऊन नोकरीवर उपजीविका करतां करतां ‘ केला केला व्यर्थ संसार केला, गेला गेला बापुडा व्यर्थ गेला ’ असला पोटार्थी पति नको होता. ही आवड माझ्या मनाशीं ठरवून द्यायला निळकंठच कारण झाले होते. व्हावें तर त्यांचीच अर्धांगी व्हावें; त्यामुळें आपल्या संसारांत त्या उत्साही, समर्थ व लोकहितवादी पतीच्या सहवासांत जगाच्या संसाराला आपण बराच हातभार लावूं शकूं असें मनोरमेला वाटे, तसेंच मलाहि वाटे. पण आमच्या दुर्दैवानें आम्हांला ग्वाही दिली होती कीं, निळकंठ कांहीं तुम्हांला पति मिळणार नाहींत; तुमचें सासर व तुमचा संसार हें सारें पुण्यालाच आहे.

इतक्यांत रावसाहेब—वीणाताईचे वडील लग्नकुंडल्यांचें एक पुडकें चाळीत तिथें आले. हा आपला त्यांचा एक व्यवसायच होता. त्यांना मीं विचारलें, “ इतक्या साऱ्या लग्नसराईत तुम्ही तुमच्या बाबीसाठीं नाहीं हो एखादा नवरा मुलगा शोधलात रावसाहेब ! ”

वीणाताई दरवाजाच्या आंतून उत्तरल्या, " बाबीला मुळीं लग्नच करायचें नाहीं. होय ना ग बाबी ? "

" होय. " बाबी उत्तरली. बाबी लग्न करायला कबूल नाहीं, हें मलाहि माहीत होतें. पण रावसाहेबांचें मत यावर काय पडतें, हेंच मला पाह्यचें होतें. तें कांहीं पाह्यला मिळालें नाहीं. मी त्यांना पुन्हां विचारलें, " रावसाहेब, लग्नाच्या वाटाघाटींना सध्यां तेजीचें स्वरूप आलें असेल नाहीं ? कारण पुढच्या वर्षी सिंहस्थ आहे. पण हीं लग्नें जमवून देतांना तुमच्या पदरीं कोणतें यश पडतें हो ? "

रावसाहेब उत्तरले, " यश कसलें पदरीं पडणार ? हातीं घेतलेली योजना योग्य रीतीनें पार पडली, तर कांहीं मला कुणी शेलापागोटें देणार नाहीं; पण मनोरमा व निळकंठ यांच्यासारखा प्रकार झाला तर एका बाजूनें ह्या आमच्या आक्काबांईचीं उणीं बोलणीं व दुसऱ्या बाजूनें 'लग्नाचा सौदा जमला; लग्नाचा सौदा मोडला'—असे वधूवरांचे शाप मात्र पदरीं पडतात."

रावसाहेबांचें हें बोलणें हरिहरपंत व नीरजाकाकू यांना उद्देशून होतें. पण नीरजाकाकूंनीं यावर कांहींच उत्तर न देतां चेहरा मात्र रागानें लाललाल केला. मीं विचार केला कीं, याच ठिकाणीं ही गोष्ट थांबवावी. नाहींतर ती भलत्याच थराला जायची ! मीं विचारलें, " मनोरमा कुठें आहे ? ती इतक्या वेळांत इथें कुठें आढळली नाहीं. "

नीरजाकाकू म्हणाल्या, " तिचें नाळ निळकंठांच्या खोलींत पुरलेलें आहे. —थांब म्हणावें, आज वीणा बाळंत झाली म्हणून आम्ही राहिलों; आणखी चार दिवसांनीं तुला पुण्याला नेऊन नवऱ्याच्या गळ्यांत बांधली, कीं सुटल्यें एकदांची. ह्या घोडनवऱ्या घरांत वाढल्या, कीं त्यांचा पाय जाग्यावर टिकेनासा होतो. वयांत आलेल्या मुली म्हणजे मुली नव्हेत त्या; विष आहे तें ! त्या नवऱ्याच्या नवऱ्याकडे गेलेल्या चांगल्या. तें महादेवाचें विष महादेवाच्या पचनीं पडतें. "

नीरजाकाकूंनीं बोलायला व मनोरमा आपल्या खोलींतून बाहेर यायला एक गांठ पडली. मनोरमा शांत पण मेघमंद्र स्वरानें उद्गारली, " आई, मी माझ्याच खोलींत बसल्यें होतें. माझें नाळ माझ्याच खोलींत पुरलेलें आहे. उगाच मला अशी घालूनपाडून कां बोलतेस बरें ? "

नीरजाकाकू म्हणाल्या, " घालून पाडून बोलत्यें तर! तूं निळकंठांशीं-- परके पुरुष ते,-बोलतेस चालतेस तरी कां ग ? "

" पण मीं त्यांच्याशीं बोलायचें आजपासून सोडलें आहे! आतां आपण पुण्याला गेलों, म्हणजे माझें लग्न होऊन मी सासरीं जाईन. त्यांच्यासाठीं माझा जन्म अडून राह्यचा आहे थोडाच ! " मनोरमा म्हणाली.

" मग एकूण आम्ही पाहिलेला नवरा तुला आवडतो ना ? " नीरजा-काकूंनीं विचारलें.

चित्ताची समता काडीइतकीहि ढळूं न देतां मनोरमा उत्तरली, " हो ! आवडतो-हें काय विचारतेस आई ? तुम्हां वडील माणसांचा माझ्यावर विश्वास नसला तरी माझा तुमच्यावर आहे. "

" हें अगदीं मनापासून बोलतेस तूं ? "

" हो मनापासून बोलत्यें. "

इतक्यांत शंकर-मनोरमेचा धाकटा भाऊ हरिहरपंतांबरोबर बाहेरून फिरून आला, तो चौकशी करूं लागला, " निळकंठभावजी कुठें गेले ? "

" त्यांना भावजी म्हणायचें नाहीं बरें बाळ ! " मनोरमा उद्गारली.

" तर काय म्हणायचें ? तूंच तर मी इथें आल्यावेळीं मला सांगितलें होतेंसना कीं, त्यांना भावजी म्हणायचें म्हणून ? " शंकरानें विचारलें.

या त्याच्या प्रश्नानें सर्वांना हसूं आणलें. मनोरमाहि हंसूं लागली. ती म्हणाली, " तेव्हां तसें सांगितलें होतें; पण आतां त्यांना निळूदादा म्हणायचें. "

" ते माझे निळूदादा; मग तुझे ग कोण ? " शंकरानें विचारलें.

" ते माझेहि दादाच; तुझेहि दादाच. तूं माझा धाकटा भाऊ, तसे ते माझे थोरले भाऊ ! " मनोरमा उद्गारली.

मनोरमा सहज लीलेनें हे शब्द बोलून गेली; पण आम्हां सर्वांच्या मनावर त्या शब्दांचा फारच चमत्कारिक परिणाम झाला. हरिहरपंतहि तटस्थ होऊन हा प्रकार पाहूं लागले. सर्वांच्या गंभीरतेंत भर घालण्यासाठीं कीं काय, मनोरमेनें गंभीरपणानें शंकराला सांगितलें, "जा बाळ शंकर, निळूदादाला सांग जा कीं, ताईला लीलाधर झाला. "

शंकर धांवत धांवत वर गेला व थोड्याच वेळांत निळकंठांना हाताशीं धरून ओढीत खालीं घेऊन आला. त्यांना जिन्यावरच पाहून मनोरमा

म्हणाली, " निळूदादा, आपल्या इच्छेप्रमाणें ताईला मुलगा झाला बरें! आई, त्यांना पेढे द्यायचे का ? "

" हो हो ! द्यायचे तर! इतका वेळ आम्हांला त्यांचा विसरच पडला होता.––जा ग कुंतले, निळकंठांना पेढे आणून दे जा." नीरजाकाकू म्हणाल्या.

हा वेळपर्यंत वीणाताईंना मुलगा झाल्याची बातमी निळकंठांना कळूं नये, व त्या आनंदीआनंदाचे पेढे आम्ही परक्यांच्या परक्यांनीं अगोदर चाखले तरी त्यांचें तोंड गोड होऊं नये, हें पाहून! मी तर थक्कच झाल्यें. मीं वीणाताईंना विचारलें, " वीणाताई, असें काय हें ? याचा अर्थ काय ? "

निळकंठ मध्येंच हंसत हंसत गंभीर मुद्रेनें उत्तरले, "याचा अर्थ मामी काय सांगणार? बाहेरच्या माणसांनाच घरच्या माणसांच्या अगोदर राजी करावें लागतें."

वीणाताई यावर म्हणाल्या, " हो! घरचा घरचा तो म्हणतो, आणि आमच्यावरच अपेश ठेऊन आज आम्हांला सोडून निघाला आहे ! ज्यांना ज्यांना–घरच्यांना, बाहेरच्यांना खरा आनंद झाला, त्यांनीं त्यांनीं आपण होऊन येऊन चवकशी केली.––जा ग कुंतले, त्याला पेढे आणून दे जा. "

कुंतला एका कागदावरून पांच पेढे घेऊन आली व ते जिन्याच्या पायरीवर ठेऊन म्हणाली, " त्यांना म्हणावें, घ्या ते पेढे ! "

कुंतलेनें सरळ रीतीनें निळकंठांच्या हातीं पेढे दिले असते तर! पण तिचा हा उद्दामपणा तेथल्या सर्वांना आवडलासें मला दिसलें. कारण, एरव्हीं तिला असें नव्हे असें कुणीतरी कांहींतरी बोललें असतें. मी बोलणार होत्यें; पण म्हटलें, नको ! लोकांच्या माणसांना बोलायचा मला काय अधिकार!

पेढ्यांना हात न लावतां निळकंठ दोनतीन मिनिटें उभे राहिले, तेव्हां वीणाताई म्हणाल्या, " पहा! त्याला जर खरोखरीच माझ्या मुलाला पाहून आनंद झाला असता, तर हां हां म्हणतां त्यानें पेढा उचलून तोंडांत घातला असता. "

निळकंठांनीं एक दोन उसासे सोडून पण वरवर हंसत पेढ्यांचा कागद उचलून हातीं घेतला व ' हे पहा पेढे खाल्ले ' म्हणून पांचहि पेढे खाऊन टाकले. पण त्यांच्या उसाशांतून अपमान व दुःख यांची वाफ निघत होती, ती मला व मनोरमेलाच काय ती माहीत होती.

" बरें, यमूताई, उद्यां मी मामामामींचें घर सोडून जाणार. कदाचित् पुन्हां बरेच दिवस भेटलों नाहीं, तर दयालोभ ठेवा. " निळकंठ म्हणाले.

मीं विचारलें, " आपण कुठें जाणार ? "

" तें कांहीं अद्याप निश्चित ठरलें नाहीं. आपली मनूताई कशी आतां आपल्या सासरीं जाणार, तूं कशी तुझ्या सासरीं जाणार, तसाच मीहि कुठेंतरी जाणार, एवढें खरें. "

"माझी आई बाळंत झाली, मुलगा झाला, माझी काकू व श्यामसुंदर यांची तशी दशा झाली, हें आपल्याला कळलेंच असेल." मी म्हणाल्यें.

" होय. " निळकंठराव म्हणाले, " अनंत मघां आला तेव्हां सांगत होता. "

निळकंठराव पुढें कांहीं न बोलतां झपझप् जिना चढून वर गेले. त्यांनीं माझ्या लग्नाची गोष्ट काढल्याबरोबर माझ्या आंगावर कांटा उभा राहिला. कारण, मला खुद्द त्यांच्याशिवाय दुसरी सौभाग्यदेवताच आवडत नसे. मनोरमेचेंहि तसेंच होतें. असें असतां मनोरमा हंसत हंसत त्यांना 'निळूदादा' म्हणाली, याचा अर्थच मला कळेना.

मनोरमा मला म्हणाली, " यमूताई, आपण आज राणीच्या बागेंत फिरायला जाऊं.–आई, जाऊं ना ग आम्हीं ? " तिनें नीरजाकाकूंना विचारलें.

" हो ! जा. पण लौकर या मात्र ! " नीरजाकाकू म्हणाल्या. विमला माझ्या मागोमाग येऊं लागली. पण कुंतला तिला म्हणाली, इथेंच खेळ. मनोरमाहि म्हणाली, मुली बरोबर नसलेल्या बऱ्या. शेवटीं आम्हीं दोघींनींच फिरायला जायचें ठरवलें. मनोरमा आपल्या खोलींत जाऊन उंची व झगझगीत पोशाग करून आली. अलीकडे ती निळकंठरावांना रुचेल असा अगदीं साधा पोशाग करी; पण आज तिचा नूर पालटला. ती 'निळूदादा' म्हणते काय, पुन्हां–श्रीमंताची कनकलक्ष्मी बनते काय, पुन्हां ये रे माझ्या मागल्या–सर्वच कांहीं विचित्र !

गाडीवानाला सांगून मनोरमेनें घरची गाडी जोडायला लावली व आम्ही गाडींतून फिरायला निघालों.

* * * *

मनोरमेनें निळकंठांना 'निळूदादा' अशी हांक मारली, ही गोष्ट माझ्या नाला शल्यासारखी बोंचत होती. मीं मनाचा धीर करून तिला विचारलेंच, मनूताई, तुला अंतःकरण आहे का ? "

मनोरमा हंसतमुखानें उत्तरली, " हा तूं निळूदादाचा कैवार घेत असशील ! "

पुन्हां तेच शब्द–निळूदादा ! मी जरा रागानेंच म्हणाल्यें, " त्यांचा इतका विश्वासघात करायची जर तुझी इच्छा होती, तर मला तसें अगोदरच कां नाहीं सांगितलेंस ? त्यांचे चरण चुरायचा अधिकार मला तरी प्राप्त होतोसा मीं पाहिला असता. आमच्या लग्नसोहळ्याला कांहीं कुणाची आडकाठी नव्हती. बाबांना ते जांवई पाहिजे होते, काकांना ते पाहिजे होते, आईला ते पाहिजे होते, आणि मला तर पाहिजेच होते. "

इतकी मी बोलल्यें, तरी मनोरमेचें आपलें हंसें चालूच होतें. हा तिचा निसतकोडगेपणा पाहून तर मला तिचें तोंडहि पहावेंसें वाटेना. मी इळीमिळी गूप चिळी गप्प बसल्यें. मनोरमा बळेंच मला म्हणाली, " यमूताई, मी माझ्या आचारांविचारांना जी ही निराळी दिशा लावली, ती माझ्या अकलेनें लावली, असें तुला वाटत असेल, तर ती तुझी चूक आहे. त्यांनीं मला सांगितलें, मला भाऊ म्हण–म्हटलें. त्यांनीं मला सांगितलें, प्रभाकरपंतांशीं विवाह करायला होकार दे–दिला. त्यांनीं मला सांगितलें, त्यांच्याशीं—माझ्या पतींशीं खऱ्या पतिव्रता-धर्मानें वाग—गोष्ट कबूल केली. आतां मी पतिव्रताधर्म पाळायचा तर दोन पतींच्या कल्पनेला मनांत थारा देणें हें तरी पापच नाहीं का ? तें पाप मीं करूं नये, अशीहि त्यांचीच आज्ञा मला झाली आहे. त्यांना मीं विसरावें, आम्ही एकमेकांनीं मरावें, हीहि त्यांचीच आज्ञा. हा आयुष्याचा खेळ खेळतांना माता-पितरांच्या व वडील माणसांच्या चित्तप्रसन्नतेला धक्का लागतां कामा नये, व ह्या पूर्वीच्या प्रेमसंबंधाचा संशयहि माझ्या पतीला येतां कामा नये, हीहि त्यांचीच आज्ञा ! आतां तूंच सांग यमूताई, हें आयुष्याचें दिव्य पार पाडण्या-साठीं वैवाहिक स्थितीच्या रणांगणांत उतरणारी मी आर्यकन्या सध्यां वागत्यें, यापेक्षां कोणत्या निराळ्या मार्गानें वागूं ? "

मनोरमेची ही उदात्त विचारपरंपरा मला पटली; पण तिच्या शक्याशक्य-तेविषयीं मात्र मला संशय होता. अंतःकरणाची देवघेव अशी कशी करतां येते, याचें मला कोडें पडलें. अनंतांशीं विवाह करण्याची नुसती कल्पना माझ्या डोक्यांत आली, तेव्हां निळकंठ व अनंत या दोन जीवात्म्यांच्या मध्यें इरेला सांपडून माझ्या अंतःकरणाची जी ओढाताण झाली, त्या वेदना वेळींहि मला हाय हाय करायला लावीत होत्या. ही माझी अंतःकरणाची सं मता निळकंठ व मनोरमा यांच्या अंतःकरणाच्या संलग्नतेसमोर कवडीमो

चीहि नाहीं, असें असतां पतिपत्नीप्रेमांत रंगून राहिलेल्या त्या निळकंठ–मनोरमेच्या संलग्न जीवाचा मनोरमा हा एक लचका तोडला गेल्यावर त्या दोघांना जिवंत तरी कसें राहातां आलें, याचेंच मला कौतुक वाटलें. पण मनोरमेनें ही तपस्या स्वतः केली नसून ती खऱ्या आर्यकन्येच्या कर्तव्याचें हें कांहीं तरी थोतांड माजवीत आहे, असें मानायलाहि माझी तयारी नव्हती. कारण निळकंठांच्या सहवासांत ती देवीपदाला पोंचली होती, हें मला माहीत होतें. अशा चित्ताच्या केंविलवाण्या स्थितींत काय बोलावें, हेंच मला सुचेना.

मी बोलत नाहीं असें पाहून मनोरमा मला म्हणाली, " यमूताई, विचारांच्या गुंतागुंतींत अशी गोंधळून जाऊं नकोस. आपल्या जीविताप्रमाणेंच आपल्याशीं नित्य संबंध येणाऱ्या आपल्या मातापितरांना व आप्तेष्टांनाहि जीवित आहे व सुखदुःखाच्या संवेदनाहि आहेत. अन्य जीवांना सुखी करणें, हाच आपल्या सुखाचा मूलमंत्र आहे; तो मंत्र अनुभवण्याच्या वाटेवर मी सध्यां आहें. आज मी माझ्या सुखासाठीं माझ्या आईबापांच्या मर्जीविरुद्ध हट्ट धरून बसल्यें, तर त्यामुळें त्यांच्या आत्म्यांना शोक होईल. ठरलेलें लग्न मोडलें व आपला वरपक्ष असून वधूपक्षाकडून आपला अपमान झाला म्हणून—हिंदु वर आहेत ते; त्यांच्या आत्म्याला शोक होईल, व त्यांच्या मातापितरांनाहि शोक होईल. ज्या अर्थी एकवार जमलेलें लग्न ऐन वेळीं मोडलें, त्या अर्थी नवऱ्यामुलाच्या आंगींच कांहीं व्यंग असलें पाहिजे अशा तर्कानें कोणी मुलीचा बाप आपली मुलगी त्यांना देऊं धजणार नाहीं. ह्या गोष्टीचा त्यांच्या व त्यांच्या मातापितरांच्या मनावर किती भयंकर परिणाम होईल बरें ! विवाहसंबंधांत —ज्या शुभ मुहूर्तावर सृष्टींतील विविध मानवी वंशाचा विस्तार नीतिधर्माच्या अनुज्ञांनीं सुरू होतो, त्या संबंधांत असले अपशकुन काय कामाचे ? हे अपशकुन, हे जीवात्म्यांचे शाप वधूवरांना जन्मभर जाचतात. पुरुषांच्या आचारांच्या बाबतींत मला कांहीं सांगवत नाहीं; पण आम्हां आर्यकन्यांच्या जीवितयात्रेचा सूक्ष्म विचार केला, तर विवाह व सद्वंशविस्तार हेंच आमच्या जन्माचें सार्थक होय. पण आप्तेष्टांच्या शापांचे डाग ज्या वधूवरांच्या चारित्र्याला लागलेले असतात, त्यांचा वंशविस्तार कधींहि शुभपरिणामकारक व्हायचा नाहीं; अर्थात्, त्या शापांनीं त्यांच्या संसाराची माती होणार ! मग जीवितांत स्वारस्य तें काय राहिलें ? यमूताई, आम्ही बायका इतक्या शिकतों सवरतों, त्या

शिक्षणाचा सदुपयोग आपण प्राणिमात्राला प्रसन्न करण्यांतच केला पाहिजे, असें तुला नाहीं का वाटत ? ”

मीं विचारलें, “ प्राणिमात्राला प्रसन्न करणें हेंच खरें जीवितसाफल्य असलें, तरी तेवढ्यासाठीं असा आत्मघात करणें हें पाप नाहीं का ? आपण सुखी तर जग सुखी. ”

मनोरमा उत्तरली, “ तूं म्हणतेस तें खरें; पण आम्हां जीवांना आत्म-सुखाचीच कल्पना करतां येत नाहीं. आंगाखांद्यावर रुळणारें सोनें मोतीं, देहाची लाज झांकून शोभा वाढवणारीं सुंदर सुंदर वस्त्रें, आंगीं मुसमुसणारें तारुण्य व आवडत्या वधूशीं किंवा वराशीं संगम, याला सुख मानण्याची जगाची रीत असेल; पण जर वधूवरांचीं चित्तें प्रसन्न नसतील, तर ह्या दिखाऊ सौख्याच्या जड सृष्टीची शोभा काय ? आपले जीवितयात्रेंतील सांगाती जीव—आईबाप, बहीणभाऊ, सासूसासरे वगैरे जीवसृष्टि जर आपल्याविषयीं प्रसन्नचित्त नसेल, तर त्यांच्या सहवासांत आपण तरी कशीं प्रसन्न राहणार ? यमूताई, विश्वाची उभारणी सहकारितेच्या तत्त्वावर झाली आहे, व परस्पर जीवितांतील मूलभूत सौख्याचा शोध लावण्याचा सहकारिता हा एकच राज-मार्ग आहे. हा जगाचा सामान्य नियम झाला; पण मी माझ्या मातापितरांनीं योजिलेल्या वरालाच माळ घालून त्याचा संसार सोन्याचा करणार म्हणत्यें याचें कारण, बाबा एकवार त्यांच्या चरणीं मला अर्पण करण्याचें ठरवून चुकले आहेत. ते बाबांचे, आईचे आवडते आहेत. त्यांना मीहि आवडल्यें, असें आईबाबा मला सांगतात; पण ते बरेच चंचल वृत्तीचे व बहुधा पापाचर-णांना बळी पडलेले असावे, असा ताईचा त्यांच्यावर आक्षेप आहे. अशा स्थितींत मी माझा हट्ट चालवून त्यांच्या लग्नांत खो खातला, व दुर्दैवानें त्यांच्या लग्नाचा योग या वर्षीं जुळून आला नाहीं–अन् पुढच्या वर्षीं आहे सिंहस्थ !—तर न जाणो ! एकवार बहकलेल्या तरुणाचें चंचल मन आहे तें; तारुण्य व संपत्ति यांच्या जोरावर समवयस्क कुलकन्यांच्या शीलाची माती करण्यालाहि ते वेळीं मागेंपुढें पाहाचे नाहींत. अशा वेळीं कुलस्त्रियांची अब्रू बचावली जावी, त्यामुळें त्यांच्या उभयतांच्या घराण्यांची इभ्रत टिकावी, त्यांच्या व माझ्या कौटुंबिकांना संतोष व्हावा,—इतक्या लाभापुढें माझ्या एकटीच्या एकाकी संसारसुखाची कसली मातब्बरी ? ”

मनोरमेच्या ह्या विचारांनीं माझ्या अंतःकरणांत चांगला प्रकाश पडला. मला वाटूं लागलें, मनोरमेप्रमाणेंच मलाहि स्वार्थसंन्यास करून कितीएक आत्म्यांचे शुभाशीर्वाद मिळवतां येण्यासारखे आहेत. पण विचारांनीं हृदय कंपायमान झालें, तरी आचाराची सांगड कशी घालावी, हें माझें मलाच कळेना. कांहीं झालें तरी निळकंठांविषयीं माझ्या अंतःकरणांत जागृत झालेली पतिविषयक भावना या वेळीं मनोरमेपासून चोरून ठेवणें मला कसेंसेंच वाटलें. आतां त्यांत चोरून तें काय ठेवायचें! निळकंठ तिलाहि लाभले नाहींत; मलाहि लाभले नाहींत. अर्थात् या ठिकाणीं सवतीमत्सराचा प्रश्नच नव्हता. मीं मनोरमेला म्हटलें, " मनूताई, जीवितयात्रेंतील विविध प्रसंगांनीं आपलीं दोघांचीं हृदयें सारखींच भाजलेलीं आहेत, नाहीं ? "

" होय. " मनोरमा म्हणाली, " पण आतां त्याचें काय! जर मीं इच्छिलेला सौभाग्याचा ठेवा मला मिळाला असता, तर त्याच्या अर्ध्या भागाचा वांटा मीं तुला खास दिला असता. पण आतां त्या गोष्टीचें नांवहि नको. आपण या जन्मापुरत्या तरी वाग्दत्त परदारा आहों; निळकंठ किती झालें तरी या जन्मीं आम्हांला परके पुरुष आहेत. ते माझे दादा आहेत; पण ते तुझे कोण आहेत बरें ? "

मनोरमेसारख्या पतिव्रतेच्या वाणींतून माझ्या पातिव्रत्याला व आर्यत्वाला मारली गेलेली हांक मला स्पष्ट ऐकूं येत होती. तिच्या देववाणीचा अव्हेर मी कसा करूं! मी उत्तरल्यें, " ते माझेहि निळूदादाच आहेत. "

मनोरमा म्हणाली, " होय ना ? मग आपण दोघींहि समदुःखी आहों. आपल्याला कांहीं संन्यास घेववायचा नाहीं व घेतांहि यायचा नाहीं. मीं माझा मार्ग ठरवलेलाच आहे. आतां तुझा मार्ग तूं काय तो ठरव. "

मनोविकारांचें प्राबल्य व आत्म्याची अवहेलना न करण्याविषयीं मनोरमेनें नुकताच केलेला उपदेश, यांचें अधिष्ठान माझें मन बनल्यानें माझें मला कळून चुकलें कीं, काकांनीं व आईनें माझ्यासाठीं योजिलेल्या वराच्या सेवेंत आत्मार्पण करणें हेंच माझ्या जीविताचें मंगलतम साफल्य आहे. शिवाय त्या माझ्या भावी पतिदेवतेविषयीं मला आतांपर्यंत तरी अभिमान वाटे याचें कारण, त्यांनीं प्रभाकरपंतांप्रमाणें स्वतांचा बदलौकिक करून घेतला नव्हता. मीं मनोरमेला स्पष्ट सांगितलें, " वडील माणसांचें मन राखण्याचें पुण्यकर्म म्हणून त्यांनीं योजिलेल्या संसाराचा भार वाहाण्याला मी आनंदानें तयार आहें. "

"पहा बरें; आपण या जन्मापुरत्या तरी आतां निळकंठांना मुकलों, ते आम्हांला मुकले."

"आणि पुनर्जन्म आहे, असें आपण गृहित धरून चाललों तर पुढच्या जन्माची काय वाट?" मी विचारलें.

"पुढच्या जन्माची वाट!–यमूताई, पुढच्या जन्मीं आपण या जन्मापेक्षां बऱ्याच शहाण्या होऊं. आपण मागच्या जन्मीं देवाघरीं जें देणें दिलें, त्याचीं फळें आज भोगीत आहों; ती चूक पुढच्या जन्मासाठीं आपण ह्या जन्मांत सुधारून घेऊं. पहिल्यानुदां जर आपल्याला कांहीं करायचें, तर हा जन्म अगदीं सोंवळ्या पातिव्रत्यांत घालवायचा. तें इतकें सोंवळें कीं, परपुरुषाच्या कल्पनेचें वारेंहि आमच्या मनाला शिवतां कामा नये. कुठचे निळकंठ-कोण कुठच्या झाडाचा पाला, त्यांचा आमचा या जन्मीं बहीणभावंडांचा संबंध राहिला तर राहो, नाहीं तर ते आमचे कोणी नव्हेत; आम्हीं त्यांच्या कोणी नव्हे. जगांतले इतके पुरुष, त्यांतले ते एक पुरुष! असा हा जन्म सदा हंसून खेळून काढायचा. मात्र त्यांना विसरायचें नाहीं. पण—काय बाई तरी, ती पुढील जन्मांतल्या सौभाग्याची साजिरी गोजिरी मूर्ति कुठच्या डोळ्यांनीं पहावी, कुठच्या अश्रूंनीं न्हाणावी, व कुठच्या फुलांनीं पुजावीसें मला होऊन गेलें आहे. यमूताई, आपण देव्हाऱ्यांतले देव नाहीं का पुजीत, तसे त्यांना देव मानून त्यांचें चिंतन करायला आम्हांला मुळींच हरकत नाहीं. देव म्हटला, कीं त्याच्याविषयीं कोणाहि पतिव्रतेच्या मनांत व्यभिचारी भावनाच यायची नाहीं. तो किती गुणवान्, पराक्रमी आहे! भगवान् श्रीकृष्ण, दाशरथी राम, हे देवावतार रूप, पराक्रम व संपदा यांनीं किती श्रेष्ठ होते! पण त्यांच्याविषयीं आपल्या मनांत कधीं तरी पापी वासना येते का? फार लांब कशाला! आपले स्वामी विवेकानंद किती विद्यावन्त, किती रूपवान् व तरणेबांड अवतारी पुरुष होते! पण त्यांच्याविषयीं अशी नव्हे अशी पापवासना कुणातरी आर्यकन्येच्या मनाला कधीं शिवली आहे का?—हो! असेंच करायचें गडे. त्यांना आपण देव म्हणून पुजायचें. आमच्या पतींना, आमच्या सासूसासऱ्यांना, व त्यांच्या कृपेनें आम्हांला मुलेंबाळें झालीं तर त्यांना त्यांच्यापाशीं उदंड आयुरारोग्य मागायचें, आणि देवाची नित्य प्रार्थना करायची कीं, हे भगवन्, आतांपर्यंतच्या आमच्या आयुष्यांत कुणाच्याहि चुकांमुळें किंवा अजाणपणामुळें

कांहींहि घडामोडी झालेल्या असोत; आम्ही परदारा ठरल्या दिवसापासून तिकडे काणाडोळा करून खरा पतिव्रताधर्म पाळला आहे. आम्ही आर्यावर्ताच्या आर्यपतिव्रतांची लाज राखली आहे. त्या आमच्या पुण्याईचें फळ म्हणून पुढच्या जन्मीं आमच्या भालप्रदेशावर निळकंठांच्या नांवचा कुंकुमटिळक रेंखला जाईल, अशी आमच्या पुनर्जन्माची गोड घटना कर--आहे कबूल ? "

मी म्हणाल्यें, " हो, आहे कबूल ! पण गडे, पुढच्या जन्मीं आम्ही सवती-सवती तरी कां म्हणवून घ्यायचें ? त्यापेक्षां हा देहाचा पृथक्‌पणाच सोडून दिला तर ! एरव्हीं तरी त्या देहाची माती आज ना उद्यां मातींत मिसळायचीच आहे; त्या वेळीं आपण एकमेकींच्या अंतःकरणांत ज्या दडून बसूं, त्या बाहेर म्हणून यायच्या नाहीं. विधाता मग आम्हांला शोधून शोधून दमेल, त्याला कदाचित् वाटेल, ह्या मृत्युलोकच्या पुण्यपतिव्रता आहेत; यांना कुणातरी राज्ञीच्या उदरीं जन्माला घालावें व राजोपचाराचे भोग द्यावे. पण त्याला म्हणावें, नको बाबा, नको ! तुझें तें राज्ञीपद आम्हांला नको. तूं आम्हांला पृथ्वीमोलाच्या साम्राज्याची राणी करणार असलास तरी नको. जी स्थिति निळकंठांना देशील, तीच आमच्या संलग्न जीवाला दे. मनूताई, पुढच्या जन्मीं निळकंठांना एखादे राजेसाहेब होणें आवडेल का ग ? "

मनोरमा उत्तरली, " कधींच नाहीं. त्यांना वैभवाचा तिट्कारा आहे; ते गर्भश्रीमंती कधींच भोगणार नाहींत. "

मलाहि तसेंच वाटलें होतें. मग आम्हीं दोघींनी मनाशीं ठराव केला कीं, पुढच्या जन्मीं एकीच्या अंतःकरणांत दुसरीनें दडून बसायचें व एका देहानें पुनर्जन्म घ्यायचा. मात्र तो ग़रीब, ममताळू व मनोभावानें प्रामाणिक असणाऱ्या मातापितरांच्या पोटीं घ्यायचा. त्या संलग्न देहाची घडण देवाकडून कशी करून घ्यावी याविषयीं आमच्यांत आपआपसांतच मतभेद झाला. निळकंठांना मनोरमेचा गौरवर्ण, रुंद कपाळपट्टी, पाणीदार डोळे, जेवणीची व हनुवटीची सुंदर ठेवण, रसबाळ्या केळ्यांसारखे सुंदर हात व वर आलेले गुलाबी गाल आवडत. पण कमरेखालच्या शरिराची तिची ठेवण कांहीं कमरेवरच्या शरीरबांध्याइतकी गोंडस नव्हती. तिच्या पायांचे चवडे तर तिच्या गोंडस शरिराच्या मानानें बरेच खडबडीत होते. तो कमरेखालचा भाग तिच्यापेक्षां माझा सुंदर होता,--इश्श बाई पण ! त्यांत एवढें वर्णन तें काय करायचें ! नाहीं म्हणायला मनोरमेपेक्षां

माझें नाक मात्र चांफेकळीसारखें होतें. इश्श पण! आपल्या रूपाचें वर्णन करायला ज्याची त्याला लाज वाटते. माझ्यापरी मी साधारण होत्यें, मनोरमा तर सुंदरच होती. शिवाय मुली वयांत आल्या म्हणजे त्या कुरूप असल्या तरी अप्सरेसारख्या शोभतात. तें असो; शेवटीं माझ्या रूपाची अहंता मीं सोडली, मनोरमेची मनोरमेनें सोडली व आम्हीं एकमेकींच्या सौंदर्याचें एकीकरण करून नवा देह धारण करायचें ठरवलें.

बोलतां बोलतां राणीची बाग आली, तेव्हां तिन्ही सांजांची वेळा झाल्या-कारणानें आम्हीं गाडीवानाला गाडी घरीं परतवायला सांगितलें. खासगी बोलणीं बोलण्यासाठीं आम्हीं हें बागेचें निमित्त काढलें होतें इतकेंच. परत येतांना आमचें विशेष कांहीं संभाषण झालें नाहीं. मी मात्र मनांत शपथ वाहिली कीं, माझ्या वडील माणसांनीं माझ्यासाठीं जो वर पाहिला आहे, त्यालाच सुखासमाधानानें माळ घालायची. मनोरमाहि तसेंच करणार होती. मग पुढच्या जन्मीं—पण त्याचें आज काय! हा विचार ठरला, तसाच दुसरा एक ठरलेला विचार मात्र पालटला. माझ्या मातेला व तिनें आजच जन्म दिलेल्या बालकाला विष पाजून त्यांना या जगांतून नाहींशीं करून अब्रू बचावायची, हा तो माझा विचार होता. मी मनोरमेला म्हणाल्यें, " मनूताई, आज माझ्या आईला व तिच्या बाळाला तूं जीवदान दिलेंस. "

" कसें? " म्हणून मला मनोरमेनें विचारलें, तेव्हां तिला मीं माझे पूर्वीचे विचार सांगितले व कोणाहि आत्म्याला शोक करूं देऊं नये, हा तिच्याच उपदेशानें जिवंत झालेला नवा विचार सांगितला. या गोष्टीचें तिला कौतुक वाटलें व हंसूंहि आलें.

आम्ही घरीं जाऊन पोंचतों तों विमला बाबीबरोबर अगोदरच तिच्या घरीं गेली होती.

* * * *

रात्रौ आम्हीं नांवाला जेवलों. विमला बाबीच्याच घरांत झोंपीं गेली होती. मलाहि माझ्या खोलींत झोंपायचें भय वाटूं लागलें म्हणून मी काकांना म्हणाल्यें, आज सारी मंडळी मधल्या दिवाणखान्यांत निजूंया. काकांनीं तें कबूल केलें.

रात्रींचे बारा वाजले, तरी मला झोंप लागेना. काका तर मधून मधून

'माझा श्याम' 'माझा श्याम' करून तळमळत होते. लीला मात्र गाढ झोंपीं गेली होती व तिचा बिंबाधरहि जवळच पाळण्यांत झोंपीं गेला होता.

एकाएकीं लीला झोंपेंतच बडबडूं लागली, " तुम्हांला हात जोडत्यें शारदाबाई,–श्यामसुंदर, तुला मी खाऊ देईन; पण तुम्हांला मीं विष घातलें हें गुणवंतरावांना सांगूं नका. "

एखाद्या समंधासारखे काका ताड्कन् उठून उभे राहिले व माझ्या बिछान्यापाशीं येऊन म्हणाले, " यमू, जागी आहेस का ? "

" हो ! काय हो काका ? " मीं विचारलें.

" ऐक ! हा साक्षात् खून बोलूं लागला, ऐक ! " काका दांतओंठ खात म्हणाले.

बराच वेळ आम्हीं कान देऊन लीलेचें बोलणें ऐकत होतों. एकेक शब्द ऐकतांना माझ्या हृदयावर एकेक निखारा पडल्याचा मला भास होत होता. काकांच्या श्वासोच्छ्वासाला तर जोराची भरती आली होती व खराखुरा खून त्यांच्या आंगीं चढला होता. लीलेच्या संभाषणावरून आम्हांला पूर्ण कळून चुकलें कीं, लीलेनेंच काकू व श्यामसुंदर यांना दुधांतून विष पाजलें.

झट्कन् काकांनीं आपल्या खिशांतला हातरुमाल काढला व–अरे देवा ! बोल बोल म्हणतांना त्यांनीं माझ्या तोंडांत बोळा कोंबला. मला ओरडतां येईना; पण रडें आलें तें मात्र आवरेना.

" यमू, शारदेच्या व श्यामसुंदराच्या खुनाचा सूड घेण्याची राक्षसी योजना मला निर्वेधपणें पार पाडतां यावी एवढ्याचसाठीं मला तुझी अशी दशा करावी लागत आहे. मी तुझ्या केंसालाहि धक्का लावणार नाहीं. मला क्षमा कर. " असें म्हणून काकांनीं माझे हातपायहि घट्ट बांधून ठेवले. आतां मला बोलायला वाचा कुठें होती ? डोळे मात्र उघडे होते.

लगेच काकांनीं हलक्या हातानें कपाट उघडून पोलादी सुरी बाहेर काढली व ते लीलेच्या बिछान्यापाशीं गेले, तोंच लीला दचकून जागी झाली व विचारूं लागली, " अगबाई, कोण तें ? "

काकांनीं उत्तर दिलें, " मी तो खुनी ! "

लीलेनें भीतभीत पहिल्यानें पाळण्यांतल्या बिंबाधराला आपल्या पोटाशीं घेतलें व कांपऱ्या स्वरानें विचारलें, "गुणवंतराव, तुमच्या हातीं ती सुरी कशाला ?"

" तुझा व तुझ्या पोराचा जीव घ्यायला " असें काका बोलतात न बोलतात, तोंच लीला ओरडण्याचा प्रयत्न करूं लागली. पण काकांनीं प्रथम तिच्या छातीला सुरी भिडवून मग सैतानी स्वरांत सांगितलें, " खबरदार ओरडशील तर–इथल्या इथें मरून पडशील–हरामखोर ! खुनी ! "

लीला अधिकच कांपऱ्या स्वरानें म्हणाली, " कोण खुनी, मी का ? "

" हो हो ! तूंच !–लीले, तूंच माझ्या बायकोमुलांच्या नरडीचा घोंट घेतलास ! लीले, मी कितीहि निर्दय असलों तरी पोटच्या गोळ्याची व जन्माच्या सहचारिणीची हत्या करण्याइतकी निर्दयता माझ्या आंगीं नाहीं. या वेळीं माझें अंतःकरण आंतल्या आंत दोधाई कसें रडत आहे, हें तुला जाणायचें असेल तर दे–खबरदार ओरडण्याचा प्रयत्न करशील तर ! दे ! त्या तुझ्या बिंबाधराला इकडे दे ! " असें म्हणून काकांनीं लीलेच्या कुशींतील बिंबाधरावर वाघासारखी झडप घातली व तिच्या हातांना झोंबून त्याला हिसकून घेतलें.

लीला दुःखावेगानें आणि प्राणभयानें एक किंचाळी फोडून उद्गारली, " अरे देवा ! गुणवंतराव, ह्या राजसाची आतां तुम्हीं काय गत करणार हो ? "

" पहा आतां काय गत करतों ती–पहा ! नीट उघड्या डोळ्यांनीं पहा ! दे–त्याला इकडे दे ! आतां ती वेळा स्मर–माझ्या राजसाला तूं विषाचा पान्हा पाजलास ती वेळा ! त्या विषानें त्याचे प्राण तडफडत होते, तसाच हा तुझा पोरटा आतां प्राण सोडतांना जिवाच्या आकांताला तडफडणार आहे. आतां त्याच्याकडे पाहून किती मनमुराद हंसतेस पाहूं बरें ! हें पहा ! डोळे सताड उघडे ठेऊन पहा ! ह्या तुझ्या पोराच्या मानेचा कोंवळा लुसलुशीत कमळाचा देंठ ह्या नखानें खुडून त्याचें शिरकमल ह्या धडापासून कसें वेगळें करतों पहा. "

अरे देवा ! लगेच बिंबाधराची कोंवळी किंचाळी माझ्या कानीं आली. काकांनीं त्याचें नरडें दाबून त्याच्या पंचप्राणांच्या दोऱ्या खेंचायला सुरवात केली होती, त्याचा हा परिणाम ! माझे डोळेहि ती बालहत्या पाहातांना भिऊन मिटले. लीला कळवळ्याला येऊन काकांच्या गळीं पडली, " गुणवंतराव, नका हो माझ्या ह्या त्रिभुवनसुंदराला ठार मारूं ! "

काकांनीं पुन्हां बिंबाधराचें नरडें दाबीत विचारलें, " कां ? आतां कां ? माझ्या त्रिभुवनसुंदराला तूं कसा बरें ठार केलास ? असाच ना–असाच ना ? पहा ! ह्या तुझ्या मिरकुडल्या पोराचे डोळे कसे गरगर फिरूं लागले पहा !



काकांनीं पुन्हां बिंबाधराचें नरडें दाबीत विचारिलें, " माझ्या त्रिभुवनसुंदराला तूं कसा बरें ठार केलास ? "

( पृष्ठ २०४ )

पहा ! माझ्या श्यामसुंदराचे डोळेहि मरणकाळच्या वेदनांनीं असेच हिरवे पिंवळे झाले असतील, ते तूं कसे बरें हंसत पाहिले असशील? आणि आतां हा देखावा पहातांना कां बरें डोळे मिटून घेतेस ? आतांच तुझे डोळे फुटले का ? खबरदार डोळे मिटून घेशील तर ! जागत्या डोळ्यांनीं नीट पहा ! सांग पाहूं, माझ्या बाळाचें मरण यापेक्षां कमी भयंकर होतें का ? पहा-हा तुझा पोर डोळ्यांतील बुबुळें गरगर फिरवून आकाशाकडे पहात आहे. आपल्याला आतां कोणत्या वाटेनें दुडदुड रांगत स्वर्गांत जावें लागणार, ती वाट शोधतो आहे ! ऐक; ह्याच्या नाड्या मरूं लागल्या. ह्याच्या जीवासभोंवार असलेलीं देहाच्या जिवंतपणाचीं बंधनें तटतटां तुटूं लागलीं. ह्याचे प्राण कासावीस होऊं लागले-माझ्या बाळाचे प्राणहि शेवटच्या घटकेला असेच कासावीस होत होते ना ! ”

आईचेंच हृदय पडलें तें; लीला काकांच्या हाताला झोंबून रडत रडत उद्गारली, “ माझ्या अर्भकाला सोडा हो ! त्याची हत्या तुम्हांला तुमच्या हातांनीं करवते तरी कशी ?–देवा, यांच्या जन्मवेळीं तूं यांच्या वांठ्याला कांहींच दयामाया घातली नाहींस कारे !-सोडा हो माझ्या राजबिंड्याला ! ”

मोठ्यानें ओरडत लीला बिंबाधराला उचलून घेण्यासाठीं धावली तेव्हां काकांनीं एका हातानें सुरी उचलून ती लीलेच्या छातीवर रोंखून सांगितलें, “ खबरदार मोठ्यानें ओरडशील तर ! गप्प बैस नाहींतर प्राण घेईन ! चल हो दूर ! दयामाया कसली घेऊन बसलीस ? लीले, या वेळीं हा पहा-माझ्या डोळ्यांत-माझ्या वाणींत, माझ्या करणींत, माझ्या नखशिखांत खून-खून-खून मुसमुसून राहिला आहे. या खुनी हातांना या माझ्या खुनी हृदयांतून दये-मायेचा पुरवठा कुठून होणार ! ह्या ब्रह्माण्डांत दयेमायेचा पसारा माजवून करुणेला निर्माण करणारा साक्षात् करुणेश्वर जरी या वेळीं माझ्यासमोर येऊन उभा राहिला, तरी हा खुनी गुणवंत आपल्या ह्या खुनी हातांनीं त्याचा-अस्सा गळा दाबून प्राण घेईल. पहा ! तुझ्या बिंबाधराकडे एकवार पहा ! हा मेला-ठार झाला-थंडगार पडला पहा !-कां ? आतां कां रडतेस ? तुझा एक पोरटा मेला म्हणून कांहीं सारी दुनिया ओस पडली नाहीं ! माझ्या श्यामसुंदराच्या व शारदेच्या मरणानेंहि माझ्या हृदयांत असाच शोकाचा वणवा पेटला आहे, समजलीस !—हा घे ! तुझ्या बिंबाधराचा हा मुडदा आंगाखांद्यावर घेऊन कसा खेळवतेस, पाहूं बरें ! ”

बिंबाधराचें प्रेत काकांनीं धाड्‌कन् लीलेच्या पुढ्यांत टांकलें. त्याला घेऊन पोटाशीं कवटाळून लीला रडूं लागली, " माझ्या सोन्या! माझ्या राजहंसा! इतक्या घोर रात्रीं स्वर्गाच्या अवघड वाटेनें एकटाच रांगत जातांना अर्ध्या वाटेंत भूकतहान लागली, तर तुला दूध कोण पाजील रे! स्वर्गाच्या वाटेनें येणाऱ्याजाणाऱ्या देवमाणसांच्या पायांखालीं तुझा चेंदामेंदा होईल ना! माझा बाळ तो!"

लीलेचा आर्त स्वर पुन्हां वाढूं लागलेला पाहून काकांनीं तिच्याच लुगड्याचा पदर फाडून त्या फडक्याचा बोळा तिच्या तोंडांत कोंबला, व तिच्या दुःखावर डागण्या दिल्या, " आतां रडतेस कशाला लीले! तुझा बाळ एकटा स्वर्गाच्या वाटेनें जातांजातां भिऊं नये, म्हणून त्याच्या सोबतीला मी तुलाहि आतां पाठवून देतों. चल ये! अशी माझ्यासमोर येऊन उभी राहा!--ह्या सुरीच्या आलिंगनांत तुझ्या देहाचा भार हलका फूल होईल! मग तूंहि तुझ्या बिंबाधराच्या मागोमाग धांवत जा. चल–अशी पुढें ये! ह्या तुझ्या मरणघरच्या वाटाड्याला जिव्हाळ्याची भेट दे ये!"

लीलेची वाचा बोळा कोंबून बंद करण्यांत आली होती. काकांनीं हातांतला सुरा उगारलेला पाहातांच मीं दोन्ही हातांनीं दोन्ही डोळे मिटून घेतले, तों एकदम 'खस्' असा कसला तरी आवाज माझ्या कांनीं आला, व डोळ्यांवर कसलें पाणी उडालें म्हणून हातानें चोळून पहात्यें तों—देवा! देवा! तें रक्त होतें! लीलेच्या छातींतून उष्ण रक्ताचें कारंजें थुइथुइ उडत होतें, त्यांतलें तें रक्त! तो देखावा पाहून मला मूर्छा आली.

*    *    *    *

कांहीं वेळानें मी शुद्धीवर येऊन पहात्यें तों दिवा बारिक होऊन मिणमिण जळत असून त्या अंधुक प्रकाशांत लीला व बिंबाधर यांचीं प्रेतें अस्ताव्यस्त पडलीं होतीं. लीलेच्या बिछान्यासभोंवार रक्ताचें रंकाळें सांचलें होतें. माझ्या तोंडांतला बोळा काढण्यांत आला नव्हता किंवा माझे हातपायहि सोडण्यांत आले नव्हते. दरवाजा किलकिला लावून घेतलेला होता. मात्र ह्या दोन जीवांची हत्या करणारे यमराज–काका आपले कपडे घेऊन बाहेर निघून गेले होते.

ती रात्र संपली व उजाडलें, तेव्हां आमच्या घरांतील खुनाची वार्ता ह्यां ह्यां म्हणतां साऱ्या चाळभर पसरली. शिपायांना ठाण्यावर वर्दी देण्यांत आली. त्यांनीं

आमच्या घराला वेढा देऊन मला व आमच्या कांहीं शेजाऱ्यांना पकडून नेलें. त्या वेळीं मला किती दुःख होत होतें म्हणून सांगूं ! तें दुःख बोलेन तर वाचा नाहीं, व रडेन तर डोळ्यांत अश्रु नाहींत, इतकें तें तीव्र आहे.

सरकारी रीत्या लीला व बिंबाधर यांच्या प्रेतांची तपासणी झाल्यावर त्यांचा खून करण्यांत आला आहे, असा निकाल मिळाला. काका फरारी झाले होते. शिवाय कालच त्यांनीं काकू व श्यामसुंदर यांच्या खुनांची वारासार केली होती. तसाच पैसा आजहि चारतां आला तर पहावा म्हणून निरनिराळ्या लोकांनीं परोपरीनें हा खुनी खटला रंगाला आणला, व काकांवरच खुनाचा आरोप ठेवला. त्यांना पकडण्यासाठीं पकड वारंट सुटलें.

साक्षीदारांपैकीं माझ्याशिवाय इतरांना कुणाला कांहींच माहीत नव्हतें, तीं सांगणार तरी काय !

माझी साक्ष झाली, तेव्हां मला माहीत होती तशी खडान् खडा माहिती मीं सांगितली, आणि मोकळी झाल्यें. मला कदाचित् शिपायांनीं त्रास दिला असता; पण नाना व रावसाहेब आमच्या रक्षणाला उभे होते म्हणून बरें झालें.

मी व विमला निर्दोषी म्हणून सुटल्यावर नानासाहेब आम्हांला आपल्या घरीं घेऊन गेले. ते काकांचे कारखान्यांतील भागीदार होते, त्यांना आम्हां अनाथ मुलींची काळजी घेणें प्राप्तच होतें. त्यांनीं बाबांना तार करून बोलावलें; पण बाबांची उलट तार आली कीं, या भानगडींत पडण्याची आपली इच्छा नाहीं.

मी नानासाहेबांच्या घरीं रहायला गेल्यें, त्याच दिवशीं सकाळीं निळकंठ सर्वांचा निरोप घेऊन निघून गेले होते. त्यांनीं नुकतीच लीलेची बेअब्रू केल्याचा आरोप समाजदृष्ट्या त्यांच्यावर लादण्यांत आला होता. त्यांचें तर या खुनांत कांहीं आंग नसेल ना, असा नानासाहेबांच्या घरच्या सर्व मंडळीला—मनोरमा व मी खेरीज करून—संशय होता. बायकांच्या तोंडचा संशय तो ! शिवाय पोलिस खात्यांतले एक बडे इन्स्पेक्टर मामांच्या वगींचे असल्यानें त्यांच्याहि कानीं ही वार्ता गेली. त्यावरून त्यांनीं निळकंठांचा तपास चालवला आहे असें आम्हांला कळलें.

मनोरमेच्या हातांतल्या बांगड्या व आंगठी नाहींशी झाली; अशी ओरड आज दोन दिवसांपासून नानासाहेबांच्या घरांत चालली होती. मनोरमेला विचारतां तिनें सांगितलें कीं, मी रात्रीं बिछान्यावर बांगड्या व आंगठी काढून

ठेवली, ती कोणीं नोकरचाकरानें चोरली असेल. पण गरीब बिचारे नोकर; त्यांना कशाला सरकारदरबारीं न्या ! शिवाय घरांत आनंदाचा दिवस-वीणाताईनीं लीलाधराला जन्म दिलेला ! तेव्हां त्या चोरीचा सरकारदरबार करण्यांत आला नाहीं.

पण एका दागिन्यांच्या दुकानीं हरिहरपंत मनोरमेसाठीं नवी आंगठी घ्यायला गेले असतांना दुकानदारानें त्यांना 'एक जुनी आंगठी विकत घेतां का' म्हणून विचारलें, व आंगठी काढून त्यांच्या हातीं दिली. हरिहरपंतांनीं आंगठी न्याहाळून पहात विचारलें, " ही आंगठी तुम्हांला कुठें मिळाली ? "

दुकानदाराला संशय आला. त्यानें विचारलें, " कां बरें ? "

" ही माझी आंगठी आहे. हिच्याबरोबरच कुणा माणसानें सोन्याच्या दोन बांगड्या आणून दिल्या आहेत का ? "

" होय. " दुकानदार गोंधळून उत्तरला, " पण सोन्याचा भाव न जुळल्यामुळें आम्हीं त्या विकत घेतल्या नाहींत. कां बरें ? हा चोरीचा माल आहे का ? "

" होय. तुम्हांला हा कोणीं आणून विकला ? "

दुकानदारानें आपल्या रोजनिशींत पाहून नांव सांगितलें, "निळकंठ–"

लगेच हरिहरपंतांनीं नाक्यावरच्या शिपायाला हांक मारून त्याच्या देखत आंगठी जप्त करवली, व दुकानदाराचे पैसे चुकते करून पोलिस ठाण्यावर जाऊन निळकंठांवर चोरीची फिर्याद केली.

घरीं आल्यावर हरिहरपंतांनीं मनोरमेला हांक मारून तिची आंगठी तिच्या स्वाधीन केली. ती हातीं पडतांच मनोरमेची चित्तवृत्ति अस्थिर होऊन हात थरथरूं लागले. तिनें अडखळत हरिहरपंतांना विचारलें, " बाबा, तुम्हांला ही आंगठी कुठें सांपडली ? "

हरिहरपंतांनीं सारा वृत्तांत मनोरमेला सांगितला व घरादाराला कळवलें कीं, " निळकंठ चोर आहे; त्याच्यावर आपण फिर्याद केली आहे. बांगड्याहि त्याच्यापाशीं आहेत; पण त्या त्याला पकडल्यावर सांपडतील. "

निळकंठ चोर आहेत हें कळल्याबरोबर जें उठलें तें नोकरमाणूसहि त्यांना शिव्याशाप देऊं लागलें. कारखान्यांतले नोकर आजपर्यंत त्यांचा इतका मान ठेवीत; पण घर फिरल्याबरोबर घराचे वांसेहि फिरले व ते नोकरहि त्यांच्या नांवानें मन मानेल तसे अभद्र शब्द उच्चारूं लागले. हरिहरपंतांनीं घरांत सर्वांना

सांगितलें कीं, आणखी कुणाकुणाचे कांहीं दागिने चोरीला गेले असले तर पहा, म्हणजे निळकंठाला कैद करून आणल्यावर त्याच्याकडे तपास करायला सांपडेल.

मनोरमेनें हरिहरपंतांना त्यांच्या पायांची शपथ घेऊन खरा प्रकार सांगितला कीं, आपण त्यांना दागिने दिले व आपण खोटें बोललों. पण हरिहरपंतांना ती एक कादंबरीच वाटली. ते म्हणाले, "मनू, दया दाखवावी; पण ती योग्य ठिकाणीं दाखवावी. निळकंठासारख्या सर्पावर–खाल्ल्या घरचे वांसे मोजणाऱ्या निमकहरामावर दया करणें, हें महत्पाप आहे!"

नीरजाकाकूहि म्हणाल्या, "चोर मेला! त्याला बसूं दे आतां डोंगरीच्या तुरुंगांत खडी फोडीत! असला चोर-जार-कपटी जांवई मला मिळाला असता तर मीं पोरीचें सौभाग्य न म्हणतां त्याला विष घालून ठार केला असता."

*मीं मनांत म्हटलें, "मग मात्र तुम्ही कऱ्हाड्या सासूबाई शोभलां असतां खऱ्या!"*

मनोरमा यावर कांहीं न बोलतां कर्माला हात लावून आपल्या खोलींत जाऊन बसली!

* * * *

दुसऱ्या दिवशीं सकाळच्या प्रहरीं हरिहरपंत दांत घांशीत खिडकींत बसले असतांना त्यांनीं सर्वांना हांक मारून सांगितलें, "एक मजा दाखवतों या! हें पहा चोराला पापाचें प्रायश्चित्त कसें मिळालें तें!"

सर्व मंडळी जाऊन पहातात तों काय!–सरकारचे शिपाई निळकंठांच्या हातींपायीं लोखंडी बेड्या अडकवून त्यांना पोलिसठाण्यावर घेऊन चालले आहेत. वीणाताई या वेळीं आपल्या खोलींत बाळंतवेढा घेऊन बसल्यानें तिला मात्र ही पर्वणी साधतां आली नाहीं. नानासाहेब कारखान्याच्या दरवाजांत उभे राहून ही मिरवणूक पहात होते. निळकंठांनीं जातां जातां एकवार––फक्त एकच वार माडीकडे पाहिलें; पण शिपायानें तेवढ्यांत त्यांच्या दंडाला हिसडा देऊन त्यांना पुढें खेंचलें. देवासमोर बळी देण्यासाठीं बोकडाच्या मानेला फांस लावून ओढीत नेतांना त्याच्या चेहऱ्यावर जशी केंविलवाणेपणाची छाया पसरलेली दिसते, तसली भयाण छाया या वेळीं निळकंठांच्या चेहऱ्यावर पसरली होती. त्यांची मनोरमेशीं नजरानजर झाली, तशीच माझ्याशींहि झाली. हरिहरपंत व नीरजाकाकू त्यांच्याकडे पाहून मुद्दाम थुंकलीं. तो अपमान आपल्या अंतः-

करणावर दुःखाचा निखारा ठेवून फुंकर घालीत आहे, व त्या आगींतील डोंबा-डोंबाच्या आंचेनें रक्ताची वाफ बनून ती थंड होऊन अश्रूंच्या रूपानें वहात आहे, असें चालतां चालतां निळकंठांच्या नेत्रांतून टपटपणाऱ्या अश्रुबिंदूंवरून मला अनुमान करतां आलें. ही भवितव्यतेच्या कंठांतील मौक्तिकमाला तुटून तिच्या सरांतलीं मोत्यें वाटभर उपडीं होत आहेत कीं काय, असा मला भास झाला. मनोरमा तर मूर्च्छावश होऊन खालींच कोलमडायची; पण ती माझ्या आंगावर सांवरली.



# पंधरावी झुळुक

---

## निळकंठ (४)

माझ्यावरील चोरीच्या आरोपाची नाशाबिती करण्यासाठीं सरकारी अदालतीची पायरी चढण्याचें कर्तव्य मनोरमेच्या वांट्याला यावें, ही कल्पनाच माझ्या अंतःकरणांत कालवाकालव करून सोडीत होती. माझें दुर्दैव हात धुवून माझ्या मागें लागलें होतें, त्यानें जातांजातां सहज मनोरमेचाहि चावा घेतला तर! असें कांहीं अनिष्ट होऊं नये म्हणून मी मुद्दाम मनोरमेचें नांवसुद्धां घेतलें नाहीं. पण सरकारी चौकशींत ओघानेंच तिचा संबंध आला, व साक्षीदार या नात्यानें तिला न्यायाधिशासमोर हजर रहाणें भाग पडलें. स्वतः शीलभ्रष्ट होऊं नये म्हणून खोटें बोलायचें नाहीं, व मनोरमेच्या नांवाचा वृथा बभ्रा होऊं नये म्हणून खरें सांगायचें नाहीं; एवढ्याचसाठीं मी न्यायाधिशाला त्याच्या कोणत्याहि प्रश्नाचें उत्तर देण्याचें नाकारलें होतें. पण मनोरमेनें सर्व गोष्टी जशा घडल्या तशा यथावत् निवेदन केल्यावर ती नादान ठरूं नये म्हणून मला त्या सर्व गोष्टी कबूल कराव्या लागल्या. हो! नाहीं तर मनोरमा ही एक बहकलेली तरुणी आहे असा तिच्या नांवाचा विनाकारण विचका व्हायचा!

फिर्यादीतर्फेच्या वकिलानें मला शिक्षा व्हावी म्हणून लीला व बिंबाधर यांच्या खुनाचा आरोप देखील बोलतां बोलतां माझ्या माथीं मारून माझ्याविषयीं न्यायाधिशाचें मन दूषित करण्याचा कसून प्रयत्न केला; पण तो सर्वस्वीं फुकट गेला. त्याचें फिर्यादीतर्फेचें भाषण माझ्या अवास्तव पण कायदेशीर निंदेनें इतकें ओतप्रोत भरलें होतें कीं, तें ऐकून खुद्द मलाच विषादपूर्वक हंसूं आलें. मनोरमा तर माझी ती निंदा ऐकून दुःखातिशयानें बेशुद्ध पडली. तिला औषधोपचार करण्यासाठीं बाहेर नेण्यांत आलें. तिची ती शोकाकुल अवस्था मला पहावेना म्हणून मी बेभानपणानें तिच्या मागोमाग जाऊं लागलों, इतक्यांत माझ्यावर पहारा करणाऱ्या शिपायानें माझ्या दंडाला धरून एक जोराचा हिसडा देत मला विचारलें, "ए बेवकूफ, कुठें चाललास?"

लगेच मी भानावर आलों, तेव्हां मला आठवण झाली कीं, मी कैदी आहें! पहिल्यानें बेभानपणांत मला वाटलें कीं, हें माझें घर आहे--पण आतां मला कळून आलें कीं, ही यमपुरी आहे!

अखेर मनोरमेच्या साक्षीवर न्यायाधिशाचा विश्वास बसून त्यानें मला निर्दोषी ठरवून सोडून दिलें. पण ह्या ग्रहदशेच्या फेऱ्यांत तीन आठवड्यांचा कच्चा तुरुंगवास मला भोगावा लागलाच! शिव शिव! तुरुंगवास कसला! नरकवासच तो!

याप्रमाणें फिर्यादीचा निकाल लागल्यावर मी कायद्याच्या आधारानें व जगाच्या दृष्टीनें निर्दोषी ठरलों खरा; पण मनोरमेचीं आईबापें, तसेंच मामामामी मला निर्दोषी म्हणायला तयार नव्हतीं. त्यांनीं ज्याच्यात्याच्यापाशीं असें मोकळ्या मनानें बोलून दाखवावें कीं, आपली मनोरमा फार सालस व प्रेमळ मुलगी आहे. तिला ह्या भटक्या फटिंगाची दया आली, व तिनें हेतुपुरस्सर ह्याच्या बाजूची साक्ष दिली, म्हणून हा निर्दोषी ठरून सुटला. ह्या एका सबबीवर माझ्या पदरीं हीनपणा बांधला जाऊन मनोरमेच्या उदारमनस्कतेचा डंका सर्वत्र वाजला जाऊं लागला.

ह्या एका दिव्यांतून मी मोकळा होतों, तोंच लीला व बिंबाधर यांच्या खुनाच्या संशयावरून सरकारी तपासाचें नवें शुक्लकाष्ठ माझ्या मागें लागलें व आगींतून निघून फोफाट्यांत पडल्यासारखें मला झालें. वास्तविक खुनाशीं माझा कोणत्याहि प्रकारचा संबंध नव्हता. इतकेंच काय; पण खून कसा, कधीं, केव्हां झाला, याबद्दल देखील मला कांहींच माहिती नव्हती. तेव्हां माझ्या ग्रहदशेचा फेरा ओढवला होता एवढेंच काय तें! माझ्याविषयीं ज्यांचें मन कलुषित झालें होतें, त्यांनीं सहज लीलेनें माझा संशय घेतला असेल, त्या पराचा पारवा होऊन तो पोलिसांपाशीं जाऊन कांहीं खोटेनाटें बोलला आणि पोलिसांनीं मला पकडलें. मी खुनी नाहीं असें मी माझी तपासणी करणाऱ्या अधिकाऱ्याला परोपरीनें सांगितलें. पण पैशाच्या आशेनें खुनापेक्षांहि भयंकर गुन्हे करणाऱ्या गुन्हेगारांची एक जंत्री त्यानें मला पाठ म्हणून दाखविली, व लीलेच्या दागिन्यांच्या आशेनें मीं लीलेचा व तिच्या बिंबाधराचा खून केला असावा, असा संशय जमेला धरून त्या संशयाची शाबिती करण्यासाठीं मला आंधारकोठडींत नेऊन 'समज' देण्यासाठीं त्यानें आपल्या हाताखालच्या

शिपायांना हुकूम दिला. शिपायी कसले ते! त्यांना यमदूतच म्हणायचें! त्यांनीं मला आंधारकोठडींत नेऊन माझा बराच छळ केला. बीभत्स शिव्यागाळींचा माझ्या माथीं पाऊस पडला. तेथें त्यांच्या लाथाबुक्क्यांचा मार मला खावा लागला. मीं खून कबूल केल्यास, किंवा निदान गुणवंतरावांचा तपास लावून दिल्यास मला जीवदान देण्याचेंहि कबूल करण्यांत आलें. अभक्ष्य पदार्थ माझ्या तोंडांत आणून कोंबण्याची धमकी मला देण्यांत आली. ह्या यमदूतांत एक यमदूत यवन होता, त्यानें तर कच्चें गोमांस आणून मला भरवण्याचेंहि भय घातलें. पण मी खोटें बोललों नाहीं. शेवटीं मी निर्दोषी असेन, अशी अधिकाऱ्याची अंधुक खात्री पटल्यावरून त्यानें कृपाळू होऊन मोठ्या मेहेरबानीनें दोन हजार रुपयांच्या जामिनावर मला खुलें करण्याचें ठरविलें. पण माझ्यासारख्या बदनाम झालेल्या अनाथ पोराला ह्या अफाट घटोत्कचाच्या बाजारांत दोन हजारांचा जामीन कोण मिळणार! नाहीं म्हणायला मामा काय ते माझे एकटे आधार होते. त्यांच्यापाशीं मदतीची भीक मागायला जाणें मला मरणापेक्षां अवघड वाटूं लागलें. पण दुसऱ्याच क्षणाला विचार केला कीं, मी कोणत्याच परीनें अन्यायी नाहीं, असें माझी मनोदेवता मला स्पष्टपणें सांगत असतां अकस्मात् ओढवलेल्या आपत्तींतून स्वतःचा बचाव करून घेण्यासाठीं मामांच्या दारीं जाण्यांत लाज तरी कसली! बाकी, या वेळीं मामा तरी मला मदत करतील किंवा नाहीं, याची वानवाच होती. माझ्यावर एवढा आपत्तींचा डोंगर कोसळला असतांना मी मेलों कीं जिवंत आहें, याची चौकशीहि ज्यांना करावीशी वाटली नाहीं, ते मला दोन हजार रुपयांची जामिनकी तरी कशी देणार! इतकें असूनसुद्धां मी माझ्या मानापमानाचें गाठोडें विवेकाच्या खुंटीला अडकवून निलाजरेपणानें मामांपाशीं जामिनगतीची मागणी केली; पण ती माझ्या अपेक्षेप्रमाणेंच नाकारली गेली. मामा अलीकडे मला पूर्णपणें विटले होते, व त्यांच्या दृष्टीनें मी एक उडाणटप्पू टारगा ठरलों होतों. परस्पर गैरसमजांमुळें आमच्या ऐक्याचें कांचेचें भांडें केव्हांच फुटलें होतें. अशा स्थितींत मी मामांपाशीं मदत मागितली, व निष्कारण स्वतःचा अपमान करून घेतला. मरण पत्करलें; पण आप्तेष्टांकडून होणारा हा अपमान नको असें मला तेव्हां वाटलें. अहा रे दैवाची विचित्र लीला!

माझ्या जामिनकीला उभा रहाणारा कुणीहि त्राता न भेटल्याकारणानें

मी आणखी एक दोन आठवडे तसाच तुरुंगांत कुजत पडलों होतों. अशा कच्च्या कैदेंत आयुष्याचे आणखी किती दिवस गुजरावयाचे, याचा कांहींच अंदाज नसल्यामुळें ह्या विटंबनेपेक्षां मरण येईल तर बरें असें वाटून मरण देण्यासाठीं मी रोज परमेश्वराची करुणा भाकूं लागलों. मरण आपलें आपणच स्वतःवर ओढवून आणलें पाहिजे, असें वाटून मी शेवटीं आत्महत्त्येचा एखादा सुलभ उपायहि पाहूं लागलों.

पण मीं तेव्हां मरावें असा ईश्वरी योगायोग नव्हता म्हणूनच कीं काय, एके दिवशीं आमची सावकारीण पिरोजबाई ही आपल्या प्रेमाला घेऊन परमेश्वरानें पाठविल्यासारखी दत्त म्हणून एकाएकीं माझ्यासमोर येऊन उभी राहिली. तिनें पहिल्यानेंच दोन हजार रुपयांच्या कोऱ्या नोटा अधिकाऱ्यांसमोर जामिनकीदाखल मोजल्या, व कायदेशीर रीतीनें मला मोकळें केलें. प्रथम पिरोजबाई स्वतः जामीन राह्यला तयार होती. पण ती वारांगना, तिला सभ्य स्त्री म्हणण्याला अधिकाऱ्याची तयारी नव्हती, म्हणून तिला रोखीची जामिनकी भरावी लागली. खरोखर, पिरोजबाई ही अंतःकरणाची अत्यंत प्रेमळ व आपल्या धंद्यांतहि विश्वासानें वागणारी साध्वी स्त्री होती! मी मी म्हणणाऱ्या कुलवंतांच्या कुलवती स्त्रियांनीं कित्ता गिरवावा, असें तिचें आचरण पवित्र व परोपकारी होतें. पण दुरंगी दुनियेला असल्या देवमाणसांची काय किंमत!

पिरोजबाई व प्रेमा ह्या मायलेंकी आज एकाएकीं इथें कशा आल्या, याचें मला आश्चर्य वाटलें. मीं मनाचा संशय फेडून घेण्यासाठीं त्यांना विचारलें; "पिरोजबाई, आज तुम्ही इकडे कुठें आलां?"

पिरोजबाई उत्तरली, "परवां नानासाहेबांचें पत्र तुमच्या घरीं गेलें होतें, त्यावरून आम्हांला सारी हकिकत कळली. तुमच्या प्रसंगीं तुम्हांला झाली तर शक्य ती मदत आपण करावी, असें प्रेमा म्हणाली, व मलाहि तसेंच वाटलें, म्हणून मी आल्यें. बाकी, झाला हा प्रकार एकंदरींत फार वाईट झाला. पण सारें जग असें एकाएकीं तुमच्यावर कसें बरें उलटलें?"

मी खिन्न मनानें उत्तरलों, "पिरोजवाई, घर फिरलें, कीं घराचे वांसेदेखील फिरतात ते असे. पण देव माझा पाठीराखा आहे. तोच आज तुमच्या मुखीं उभा राहिला म्हणायचा."

"नाहीं, देव माझ्या प्रेमाताईच्या मुखीं उभा राहिला." पिरोजबाई म्हणाल्या.

" होय का ! " मी हंसत हंसत म्हणालों, " मग आज प्रेमाताईनींच मला जीवदान दिलें म्हणायचें. कारण, मी आजच ह्या नरकवासाला विटून आत्महत्या करण्याचा बेत करीत होतों. "

" एकूण आपल्या जिवावर आतां आपली मालकी नाहीं तर ! " प्रेमा लज्जेनें अधोमुख होऊन हळूच आपला ओंठ चावीत म्हणाली. बोलतां बोलतां तिनें एकवार पिरोजबाईकडे पाहिलें.

" मग तुझें म्हणणें काय, निळकंठरावांनीं तुला पदरांत घ्यावें ? " पिरोज-बाईनीं विचारलें.

यावर कांहींहि उत्तर न देतां प्रेमानें लाजऱ्या हास्यमुद्रेनें एकवार माझ्याकडे चोरून मात्र पाहिलें. त्या पहाण्याचा अर्थ मला कळला. मी लगेच पिरोजबाईंना सांगितलें, " पिरोजबाई, तुम्हांला मी हात जोडतों, तुमची व तुमच्या मुलीची हौस भागवायला मी सर्वथैव असमर्थ आहें याबद्दल मला क्षमा करा. "

" कां बरें ? " पिरोजबाई म्हणाल्या, " तुम्हांला तुमच्या जातीगोताचें भय वाटत असेल तर अगोदर आपण मनाजोग्या एखाद्या वधूशीं लग्न करून वंशविस्ताराची सोय लावा, व मग प्रेमाला आश्रय द्या. तिच्याशीं तुम्ही लग्नच केलें पाहिजे असा माझा किंवा तिचा आग्रह नाहीं; तिच्याशीं तुम्ही जन्मभर प्रेमानें व विश्वासानें वागलां म्हणजे झालें. मग माझी प्रेमा तुमच्या बायकोची मैत्रीण होईल, व मरेतों तुमच्याशीं पतिव्रताधर्मानें इमानें इतबारें वागेल. " लगेच पिरोजबाई प्रेमाकडे वळून म्हणाल्या, " काय ग प्रेमा, तूं आहेस ना याला कबूल ? "

प्रेमा आनंदातिशयानें उत्तरली, " हो ! कुठून तरी मला या पायांचा जन्माचा आश्रय मिळाला म्हणजे झालें. "

त्या दोघीं मायलेंकींचे हे विचार मला चमत्कारिक वाटले. प्रेमा ही एका गणिकेची कन्या असल्यानें तिला स्वतःला परपुरुषाची राख होऊन रहाण्यांत कांहींच कमीपणा वाटत नाहीं, असल्या ह्या मनोवृत्तीला म्हणावयाचें तरी काय याचा मी क्षणभर स्वतःशीं विचार करतों आहें, तोंच पिरोजबाई पुन्हां मला म्हणाल्या, "पहा बुवा ! माझ्या प्रेमाला तुम्ही पदरांत घेतलीत, तर आहे ही सारी धनदौलत तुमचीच आहे. "

मी उत्तरलों, " पिरोजबाई, तुम्ही माझी आई आहां व प्रेमा माझी बहीण आहे. मला माझ्या उभ्या आयुष्यांत जर मनोरमेशिवाय अन्य वधूचें पाणिग्रहण करावयाचें असतें, तर इतर कुलवंतांच्या कुमारिकांना सोडून प्रेमाच्या भालप्रदेशावर अग्निब्राह्मणांच्या साक्षीनें माझ्या नांवाचा सौभाग्यटिळक रेखाण्यांत मी स्वतःला मोठा भाग्यवान् समजलों असतों. मी जातिभेदाचा किंवा जातिभेदमूलक रूढींचा बंदा गुलाम नाहीं हें तर तुम्हांला माहीतच आहे. पण मी व्यभिचारासाठीं जन्माला आलों नाहीं, व माझ्या मताप्रमाणें लग्नाचा प्रश्न निदान ह्या जन्मीं तरी मला विचारांत घ्यावयाचा नाहीं. यास्तव याच उद्देशानें जर तुम्ही माझी सुटका केली असेल, तर कृपा करून तुम्ही तुमचे दोन हजार रुपये परत घ्या, व मला तुरुंगांतच राहूं द्या. "

प्रेमा कांहींशी खिन्न होऊन म्हणाली, " आपला असा निश्चयच असेल, तर त्याचा भंग करण्याची माझी इच्छा नाहीं. पण मला आपणापासून आज एवढेंच वचन पाहिजे आहे कीं, पुढेंमागें कधीं काळीं जर आपले विचार पालटले व लग्न करण्याची आपल्या मनाची तयारी झाली, तर तेव्हां आपल्या अर्धांगीपदाचा मान मला मिळाला पाहिजे. "

मी आश्चर्यचकित होऊन विचारलें, " म्हणजे ? प्रेमा, माझ्यासाठीं तूं एवढें कडकडीत ब्रह्मचर्य पाळणार कीं काय ? "

" अर्थात् ! " प्रेमा उत्तरली, " ही प्रेमा नापाक कुळांत जन्माला आली म्हणून कांहीं शीलानें भ्रष्ट झाली नाहीं. मीहि आपल्याप्रमाणेंच व्रतस्थ राहून आपल्या मनाची खात्री पटवून देणार कीं, आपल्या परीनें आपल्याला जसा आपल्या शीलाचा अभिमान आहे, तसाच माझ्या परीनें मलाहि माझ्या शीलाचा अभिमान आहे. "

खरोखर, प्रेमाचा हा निश्चय मला मनापासून आवडला. मी मनांत म्हटलें, मनोरमा मला आवडती होती, तसाच मी जर प्रेमाला आवडता असेन, तर आवडत्या जीवासाठीं उभा जन्म रडत बसण्यांत माझ्याप्रमाणें तिनेंहि सुख कां मानूं नये ! बाकी, भविष्य काळाच्या पोटांत कांहींहि दैवघटना तयार असली, तरी सध्यां पुरता हा प्रश्न तोंडदेखला सोडवण्यासाठीं म्हणून प्रेमाच्या शब्दाला मान्यता देणें मला भाग पडलें.

तो दिवस मी पिरोजबाईच्या बिऱ्हाडींच काढला. यापुढें मीं काय करणार

वगैरे बऱ्याच गोष्टी त्या मायलेकींनीं मला विचारल्या. पण माझें मन स्वस्थ नसल्यामुळें मला त्यांच्या कोणत्याच प्रश्नाचें समाधानकारक उत्तर देतां आलें नाहीं. इतक्या दिवसांत आज मला जरा विसावल्यासारखें वाटलें. कारण जिव्हाळ्यानें माझ्याशीं सुखदुःखाचे दोन शब्द बोलणारे दोन ऋणानुबंधी जीव मला आज अकस्मात् भेटले होते. ऋणानुबंध म्हणावयाचा तो एवढ्या-साठींच कीं, या वेळीं माझीं खरीं मायेचीं माणसें माझ्यापासून दूरदूर निघून गेलीं होतीं, व त्यांनीं ' जन हे सुखाचे; दिल्याघेतल्याचे ' ह्या संतवचनाचा महिमा माझ्या मनाला पटवून दिला होता. भाऊबंद आज मला कशाला विचार-तील ! त्यांना आज माझ्यापासून संपत्तीचा उपराळा होण्यासारखा नव्हता. इष्टमित्र कशाला माझी पर्वा करतील ! माझ्याबरोबर हिंडून फिरून आज त्यांच्या लौकिकांत भर पडण्यासारखी नव्हती. मामामामी कशाला माझी चौकशी करतील ! त्यांच्या मतानें त्यांचा भाचा खाल्ल्या घरचे वांसे मोजणारा बेमान निपजला होता. मनोरमेचे आईबाप कां म्हणून चिंता करतील ! त्यांच्या मुलीचें सौभाग्य निळकंठाच्या नशिबाशीं बांधलेलें नाहीं ना; मग निळकंठ तिकडे मसणांत कां जाईना ! शेजारीपाजारी कशाला भीड बाळगतील ! असल्या बहकलेल्या तरुणाचा सहवास कधीं कसा जाचक होईल याचा नियम नाहीं. ओळखीदेखीचे, बैठकींतले व रोज निळकंठाच्या जिवावर चैन करणारे लोक कशाला त्याच्या वाऱ्याला उभे रहातील ! न जाणो, चारीबाजूंनीं गांजला गेलेला हा भुकेबंगाल त्यांच्यापाशीं चार दोन पैसे उसनवार मागायचा ! अशा चौफेर भयाण परिस्थितींत मी जखडून पडलों असतां ध्यानींमनींहि नाहीं, अशा ह्या दोघां मायलेकींनीं येऊन मला मदतीचा हातभार लावला, हा ऋणानुबंधच नव्हे काय ! मीं स्वप्नांतदेखील जिच्यावर प्रेम केलें नाहीं अथवा पुढेंहि जिला माझें प्रेम लाभणें शक्य नाहीं, अशा एका वारयोषितेच्या कुमारिका कन्येनें आपत्तीच्या ऐन वेळीं आपल्या जीवनसर्वस्वाचें उदक माझ्या हातावर सोडावें, ह्या विधिघटनेचा अर्थ काय हेंच मला कळेना.

माझ्या पडत्या काळाचा फायदा घेऊन वडील बंधूंनीं होती नव्हती तेवढी वडिलोपार्जित धनदौलत एकजात आपल्या नांवानें करून घेतली, व मला बुडवण्यासाठीं समाइकींत पांच हजारांचें नवें कर्ज काढून माझ्या डोक्यावर त्याचा भार रचून ठेवला. स्थावर मिळकतीपेक्षां हा कर्जाचा बोजा जबर अस-

त्यामुळें मी घराचा किंवा घरच्या दौलतीचा धनी व्हायच्या ऐवजीं अविभक्त कुटुंबांतील कर्जाचा मात्र धनी झालों होतों. याशिवाय माझ्या मागें माझ्या खेड्यापाड्यांतील सुधारणेच्या कार्यक्षेत्रावरून माझ्या बंधुराजांनीं सरोस नांगर फिरवून सोडला होता ! ह्या सगळ्याचा अर्थ माझ्या ध्यानीं आला तो हाच कीं, अशा आपत्तींच्या वेळीं मी माझ्या जन्मभूमींत परत जाईन म्हणेन, तर तिथूनहि माझी हद्दपारी आगाऊच झालेली आहे. ही माझ्या जन्माची दुर्दशा वर्णन करतांना पिरोजबाई एकसारख्या हळहळत होत्या, व प्रेमा तर डोळ्यांना पदर लावून बसली होती.

" निळकंठ, अशा पुण्यशील जीवांनाहि जगांत इतक्या हालअपेष्टा भोगाव्या लागतात, हाच देवाघरचा न्याय काय हो ? " प्रेमानें विचारलें.

मीं तिच्या प्रश्नाला शांत व हास्यमुद्रेनें उत्तर दिलें, " प्रेमाताई, हें जग आहे. जगांत हें असें चालायचेंच. संसारांत सांपडलेला खेळाडू जीव कितीहि सावधपणानें खेळत असला, तरी कधीं ना कधीं त्याचा डाव हा असा हुकायचाच--हीहि एक जगाची रीत आहे. "

आपल्या दुःखानें ह्या मायलेंकींना जास्त दुःखी करण्यांत अर्थ नाहीं, असें वाटून मीं त्याच दिवशीं त्यांचा निरोप घेतला. त्या दोघींनीं परत घरीं जातांना मला आग्रहानें बोलावलें. पण माझा जीवाभावाचा सारा परिवार इकडे गुंतला असतांना मी तिकडे कुणासाठीं जाऊं ! असें जरी होतें, तरी त्यांना अगदींच निराश करूं नये म्हणून मीं खोटीच थाप मारली कीं, आठां पंधरा दिवसांनंतर मी एकवार तिकडे येईन. पण तोंडावाटे असें वचन देतांना माझें मन मला मुद्दाम हाक मारून सांगत होतें कीं, वेड्या, आतां तूं कसला आपल्या जन्मभूमीला जातोस ! नादान बाईलवेडा बनल्यामुळें मानवी सृष्टींतून पिशाच्चसृष्टींत भटकणारा वेडा पीर तूं ! तुला आतां कसली जन्मभूमि आणि कसलें क`ा !

* * * *

माझ्या वांट्याला तुरुंगवास, मनोरमा व यमुना यांच्या वांट्याला सौभाग्य, मामींच्या वांट्याला मातृपद व अनंताच्या वांट्याला रुग्णावस्था अशा अनेक बऱ्यावाईट प्रसंगांनीं ह्या एकाच वेळीं माझ्या सभोंवार एकच गिल्ला केला होता. यामुळें काय करावें व काय करूं नये, हेंच मनाला सुचेना. थोडासा तपास केला

तेव्हां कळलें कीं, सारी मंडळी मनोरमा व यमुना यांच्या लग्नासाठीं पुण्याला गेली आहे. अनाथ यमुनेच्या लग्नापायीं होणारा खर्च सोसण्याची मामांनीं हमी घेतली होती, असेंहि मला कळलें; तेव्हां जिवाला आनंद झाला. यमुना इतकी सुशील, सुरूप व सद्गुणी असूनहि तिच्या माहेराचा मांडव होऊन ती उघड्यावर पडली, हें तिचें खडतर पूर्वसंचितच म्हणावयाचें नाहीं तर काय! तसाच अनंत! खरोखरच, माझा अनंत खरा माणूस होता; नुसता मनुष्यप्राणी नव्हता. पण संसारांतील निराशेच्या वणव्यांत तो बिचारा पुरा होरपळून निघाला. तोहि हवापालटासाठीं पुण्यांतच गेला आहे असें कळलें. ह्या सर्व जिव्हाळ्याच्या मंडळीला एकवार डोळांभर पहावें तरी, ह्या इच्छेनें मी थेट पुण्याला गेलों. वस्तुतः विचार केला तर ही मंडळी माझी कोण व मी त्यांचा कोण! पण जिव्हाळ्याच्या प्रेमाची ओढ कांहीं और असते हेंच खरें! ती ओढच मला माझ्या जिव्हाळ्याच्या जीवांकडे ओढून नेत होती, दुसरें काय!

पुण्यांत गेल्याबरोबर प्रथम आमच्या माधवरावांकडे जावें म्हणून मी निघालों, तों वाटेंत प्रभाकरपंतांच्या दारीं लग्नमंडप उभारलेला दिसला. दर्शनीं दरवाजाला मांगल्याची खूण म्हणून तोरणाच्या केळी बांधल्या होत्या, त्या बऱ्याच सुकलेल्या, व त्यांच्यावरचे केळ्यांचे घड फिक्कट झाले होते. ह्या एकंदर देखाव्यावरून मीं अनुमान केलें कीं, कांहीं दिवसांपूर्वी या मंडपांत एखादा लग्नसमारंभ उरकला असावा. तो कुणाचा असावा, याचा विचार करीत मी क्षणभर रस्त्यांतच उभा राहिलों. मला ह्या गोष्टींची अटकळ करतां येत नव्हती, असें नाहीं. पण चहूं बाजूंनीं भांबावून गेलेला जीव असाच आत्मवंचनेला बळी पडतो. आणि खरेंच आहे. साऱ्या जगानें विश्वासाला अपात्र ठरवलेल्या अभागी जीवानें स्वतःचा स्वतःवर तरी विश्वास कसा ठेवायचा!

मी किंकर्तव्यमूढ बनून रस्त्यांतच वेड्यासारखा उभा आहें, इतक्यांत प्रभातकाळीं सारवलेल्या आंगणांत रांगोळी घालण्यासाठीं एक मध्यम उंचीची, दुहेरी बांध्याची, रात्रीं झोंपेंत जिचे केंस विखुरले आहेत, अशी एक पंधरा-सोळा वर्षें वयाची सुंदर नववधू हातांत रांगोळीची चांदीची वाटी घेऊन बाहेर आली, व माझ्या नेहमींच्या परिचयाची आणि अर्थातच तिच्या अत्यंत आवडीची कमलदलगुंफा गुंफूं लागली. पहाटेला सुखशय्येवरून उठल्यामुळें आंगांत चोळी नाहीं, लुगडें अव्यवस्थितपणें विखुरलेलें, भालप्रदेशावर कुंकूं

झोंपेच्या भरांत पुसलें गेल्यामुळें वाढलेलें, केशकलाप विखुरलेला व गाल मात्र रक्तरंजित झालेले, अशी ती दुसरी कोण असणार! मीं तिच्याकडे पाहिलें; व तिनें माझ्याकडे पाहिलें. इतक्यांत तिच्या सासूबाईंनीं तिला हांक मारली, "कमले, अंमळ इकडे येऊन जा." म्हणे कमला! ही कुठची कमला! मी तिला कां म्हणून कमला म्हणूं? ती माझी मनोरमाच होती. ती सासूची कमला असेल, ती पतीची कमला असेल, ती सासरच्या प्रत्येकाची कमला असेल. पण माझी ती मनोरमाच होती! कमला! म्हणे कमला! लोकांची आज कमला झाली; पण ती माझी पूर्वीची मनोरमाच आहे. कमला आज पतीची पत्नी झाली, व कमला उद्यां मुलांची माता होईल. पण कांहीं झालें, तरी माझ्या अंतःकरणांत ठसलेली मनोरमेची रमणीय मूर्ति माझ्या दृष्टीआड कशी होणार!

मनोरमेची व माझी दृष्टादृष्ट झाली मात्र, त्याबरोबर मनोरमेनें खालीं मान घातली. त्यामुळें तिचें मुखमंडल जरी मला स्पष्ट दिसेना, तरी बाकीचा सारा देह स्पष्ट दिसत होता. त्यांतल्या त्यांत माझ्या लक्ष्यांत रहाण्यासारखी ढोबळ खूण म्हणजे नीरजाकाकूंनीं केंस विंचरून मनोरमेच्या माथीं पाडलेला दाभणाइतका रुंद भांग. मीं मनोरमेकडे निरखून पाहिलें; पण हा मी अन्याय करतों आहें असें माझें मलाच वाटलें. कारण, माझे तेव्हांचे विचार कामुक वासनांनीं विटाळलेले होते. एका काळीं माझी वाग्दत्त वधू म्हणून शोभणारी ही कामिनी आज आपल्या मर्जीविरुद्ध परपुरुषाला माळ घालून धर्मशील व्यभिचाराला बळी पडली! आपली मनोवांच्छित अर्धांगी देवाधर्माच्या साक्षीनें कां होईना; पण एका परपुरुषाच्या सुखशय्येची शोभा वाढविण्यासाठीं बळी पडली, हा विचारच बाणाप्रमाणें हृदय आरपार पोंखरून जाणारा नाहीं काय!

वरच्यासारख्या कल्पनांनीं मी पुरा भ्रमिष्ट बनलों. या वेळीं धरणीमाता दुभंग होऊन मला उदरांत घेईल तर बरें असें मला वाटलें. मी पुरुषासारखा पुरुष, मर्दासारखा मर्द जर अंतःकरणांतून इतका खचलों, तर बिचाऱ्या मनोरमेची मनःस्थिति या वेळीं किती कींव करण्यासारखी झाली असेल बरें! माझ्याच्यानें तिथें उभें रहावेना म्हणून मी तसाच मनोरमेची दृष्टि चुकवून रस्त्याला लागलों.

थोडासा पुढें गलों नाहीं तोंच पिवळी अष्टपुत्री नेसून, लगीनलेणीं आंगाखांद्यावर धारण केलेली यमुना एका घराच्या दरवाजांत उभी असलेली मला

भेटली. तेवढ्यावरून मी मनांत ओळखून चुकलों कीं, यमुनेचेंहि लग्न झालें. तिच्या हातांतील लग्नकंकणदेखील अद्याप सुटलेलें नव्हतें. तिला बिचारीला देखील देवाधर्माच्या साक्षीनें कां होईना; पण स्वतःच्या इच्छेविरुद्ध स्वतःच्या सुकुमार देहानें पतीच्या स्वरूपांत वावरणाऱ्या परपुरुषाच्या सुखशय्येची शोभा वाढवावी लागली. यमुनेची व माझी दृष्टादृष्ट होतांच मीं त्या सौभाग्यवतीला मनोभावानें प्रणाम केला, त्याबरोबर यमुना गोंधळल्यासारखी होऊन मला म्हणाली, " असें काय? आपण मला नमस्कार करायचा नाहीं; मी आपणाला नमस्कार करायचा. " लगेच ' आपला नमस्कार देवाला पावो ' असें म्हणून तिनें मला नमस्कार केला.

मीं यमुनेच्या बोलण्याकडे मुद्दाम दुर्लक्ष करून विचारलें, " यमूताई, गुणवंतरावांचा तपास लागला का?"

यमुना उत्तरली, " नाहीं. "

" बरें; सरस्वतीबाई तरी कुठें आहेत? "

" माझ्या लग्नासाठीं आई इथें आली आहे. ती यापुढें माझ्याच घरीं राहाणार आहे. "

" तुम्ही दोघीहि एकंदरींत सुस्थळीं पडलां आहां ना? "

" हो! जें ब्रह्मलिखित असतें, तें कधींच टळत नसतें. आणि नशिबीं जे कर्मभोग असतील, तेच गोड करून चालण्याशिवाय सुखाचा शोध कधींच लागत नसतो. " यमुना उद्गारली.

यापुढें यमुनेशीं बोलणें म्हणजे तिला तिच्या मेलेल्या आशांची दुःखद आठवण करून देणें होय, असें मला वाटलें. आपला सहवास जर दुसऱ्याला त्रासदायक होण्याचा संभव असला, तर आपणच तिथून काळें केलेलें काय वाईट! या न्यायानें मी तिथून थेट माधवाकडे गेलों. माझ्या जन्माचे असे धिंडवडे निघाल्यापासून माधवाला मी आज पहिल्यानेंच भेटत होतों. मला अनोळखी असलेल्या अलीकडच्या परिस्थितीमधील घडामोडी मीं माधवाच्या तोंडून ऐकल्या, तेव्हां इतरांबरोबरच माधवाचें मनहि माझ्याविषयीं कलुषित झालें असल्याचें मला स्पष्ट कळून आलें. माधवाचा व माझा तत्त्वतः मतभेद वारंवार होत असे. पण आज जें त्याचें मन कडू झालेलें मला आढळलें, तो कांहीं मतभेदाचा परिणाम नव्हता; तो माझ्याविषयीं त्याच्या मनांत दृढ झालेल्या गैर-

समजाचा परिणाम होता. माझ्या नैतिक आचरणाविषयीं माधवाचें मन फारच साशंक झालें होतें. लीलेवर बलात्कार मीं केला, मनोरमेचे दागिने मीं चोरले, फार काय, लीला व बिंबाधर यांचा खून करण्यांतहि माझा हात होता, अशा माझ्याविषयींच्या विषारी भावना त्याच्या मनांत रुजून वाढीला लागल्या होत्या. पण माधवाची संशयनिवृत्ति करण्याजोगी ती वेळा नव्हती. मग मी तरी विनाकारण माझ्या तोंडाची वाफ कशाला दवडूं ! तो मार्गच अजिबात सोडून मी त्याला आमच्या आपसांतील भविष्यकालीन कर्तव्याच्या संकल्पाविषयीं विचारलें, तेव्हां त्यानें मला टोमणेवजा उत्तर दिलें, "आजवर अशी देशसेवा करायची, अशी लोकसेवा करायची, वगैरे बोलघेवडेपणा आपण सर्वांनीं केला खरा; पण प्रत्यक्ष आचाराच्या कसोटीवर आमच्या कर्तबगारीचा कस ठरवतां आज आम्ही सारे हिणकस व निकामी ठरत आहों. लीलेनें अनीतींच्या खातेऱ्यांत लोळतां लोळतां जगांतून तसें तोंड काळें केलें, मनोरमा व यमुना ह्या तर बोलून चालून परदारा झाल्या, अनंत आतां ह्या जन्मापुरता तरी असून नसून सारखाच आहे—"

"कां बरें ?" मीं माधवाला विचारलें. मला त्याच्या बोलण्याचा अर्थच कळेना.

माधव उत्तरला, "त्याला अलीकडे उन्माद झाला आहे, व ह्या आजाराचें पर्यवसान वेडांत होणार असें डॉक्टरांचें मत आहे. त्याचा मेंदूहि दिवसेंदिवस बिघडत चालला आहे असें डॉक्टर म्हणतात."

अनंताला उन्माद होणार हें भविष्य मीं यापूर्वीच माझ्या मनाशीं केलें होतें. ज्या तत्त्वासाठीं मी माझ्या उभ्या आयुष्याची होळी पेटवण्याला तयार झालों होतों, त्याच तत्त्वासाठीं अनंतानेंहि आपल्या जीवितसर्वस्वावर उदक सोडलें होतें. मनोरमेविषयींची त्याची अपेक्षा दुर्दमनीय होती. ती ताब्यांत ठेवतां येती, तर आमच्यासारखे विजयी आम्हींच होतों. पण ती ताब्यांत ठेवतां येणें आम्हांला आमच्या सामर्थ्याबाहेरचें वाटत असल्यानें बाईलवेडेपणांत स्वतःच्या आयुष्याची होळी पेटवण्याशिवाय आम्हांला दुसरें कांहींच करतां येण्यासारखें नव्हतें.

माधवाच्या बोलण्यावर कांहीं उत्तर न देतां मी विमनस्कतेनें हंसलों मात्र ! आमच्या आयुष्याचें लाजिरवाणें हंसें झालें, हें दर्शविणारेंच तें माझें हंसें होतें. त्याचा अर्थ तेव्हांच चाणाक्ष माधवाच्या ध्यानीं आला. मी कांहीं बोलत

नाहींसें पाहून माधव उद्गारला, "निळकंठ, हे सारे दुबळ्या जीवांच्या विकारवशतेचे परिणाम आहेत. ह्या विकारवशतेनें तुझा बळी घेतला, अनंताचा बळी घेतला, ह्या विकारवशतेच्या जाळांतच मनोरमा व यमुना यांच्या उत्साहाची जळून राख झाली व लीला तर नखशिखांत भस्मसात् होऊन गेली. आतां हीच विकारवशता नलिनीचा व माझा बळी घेते कीं काय, हें मला पाह्यचें आहे, ज्या ठिकाणीं तुझ्यासारख्या सामर्थ्यवान् युवकांना ही विकारवशता सच्चरित्राच्या स्वर्गांतून असच्चरित्राच्या नरकांत ओढून आणते, त्या ठिकाणीं माझी व नलिनीची ती काय कथा !"

अहा रे दैवा ! मी सच्चरित्र युवक आहें, कीं असच्चरित्र मानवी समाजकंटक आहें, हें एक माझें मी जाणें व दुसरा तो ब्रह्माण्डाच्या उत्पत्तिस्थितिलयाची घडामोड करणारा जगन्नियंता जाणे ! पण तो माझ्या शीलाचा निर्णय या ठिकाणीं करून काय उपयोग ! ह्या देखाव्याच्या जगांत देखाव्याचें चरित्र पाहिजे असतें, व त्याच्यावर देखाव्याच्या देखतभुल्या बहुजनसमाजाकडून मान्यतेचा शिक्का मारला जातो ! हा देखावा माझ्या गांवीं नाहीं, मी ह्या जगांतील प्राणिमात्राशीं आजवर प्रामाणिकपणानें व सात्विक ममतेनें वागत आलों, जगाशीं लपंडाव खेळलों नाहीं, जगाच्या व्यवहाराच्या नांवावर आचारांची माती सोनें म्हणून विकली नाहीं, म्हणूनच मी परिणामीं चोर-जार-कपटी ठरलों अं ! सच्चाशीं सच्चा व लुच्चाशीं लुच्चा असा या दुरंगी दुनियेंत दुरंगी वर्तनाचा आयुष्क्रम ठेवण्याची जी जगाची रीत आहे, त्या किळसवाण्या रीतीचा मीं अवलंब केला नाहीं, म्हणून माझें जीवित अयशस्वी व्हावें काय !

हा वादाचा प्रश्न मिटावा म्हणून मी बळेंच विषयांतर केलें, "माधव, गेलें तें उदक व राहिली ती गंगा, या न्यायानें आमच्या जीविताच्या राखरांगोळीकडे लक्ष्य न देतां तूं व नलिनी दोघेंहि सुदैवानें ह्या मनोविकारांच्या डोंबाडोंबींत होरपळून निघालां नाहीं, तींच आम्हीं सारीं असें मानून पुन्हां एकवार विनंती करतों कीं, तुम्ही तरी विवाहग्रंथीनें बद्ध व्हा. तूं एक कट्टा निग्रही तरुण आहेस, तूं अविवाहित राहून कोणतीहि गोष्ट करूं शकशील; पण ह्या तुझ्या कठोर व्रतपालनाला नलिनीचा व्यर्थ बळी पडेल-तें स्त्रीहत्येचें पातक तूं आपल्या माथीं घेऊं नकोस."

माधव म्हणाला, "नलिनी सध्यां इथेंच आहे.'

मीं विचारलें, " ती कशाला ? "

" वीणाताई आपल्या माहेरीं आल्या, त्यांच्याबरोबर लीलाधराला सांभाळण्यासाठीं ती आली. ती लीलाधराची 'गव्हर्नेस' म्हणून सध्यां कांहीं दिवस नोकरीला राहिली आहे. अलीकडे तिच्या दिनचर्येत 'निम्फोमॅनिआ' चीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत, असें ऐकतों. "

मुली वयांत आल्या व त्यांचीं लग्नें झालीं नाहींत, म्हणजे कामुक मनोविकार अनावर होऊन त्यांना निम्फोमॅनिआ किंवा हिस्टीरिआ असे विकार जडतात. त्या विकाराला माझी बहीण बळी पडणार कीं काय, या भविष्यकालीन भयानें माझ्या मनाला जोराचा धक्का मिळाला. मीं माधवाला हात जोडून विनंति केली, " माधव, कृपा करून माझ्या बहिणीला तूं पदरांत घे. "

" पण आम्ही दोघेंहि एका गोत्राचीं पडलों ना ? तिचें गोत्र कौशिक; माझें गोत्र कौशिक ". माधव म्हणाला. ह्या उत्तरांत आणि त्याच्या या पूर्वीच्या उडवाउडवीच्या उत्तरांत जमीनअस्मानाचें अंतर होतें. आजच्या उत्तरांत आशेचा ओलावा बराच मुरला होता. मी म्हणालों, " इच्छा असली, कीं सर्व कांहीं होतें. हाच जर तुझ्या जागीं मी असतों, तर मी इतक्या अडचणींतूनहि मार्ग शोधून काढला असता. "

" तो कोणता ? " माधवानें विचारलें.

मी उत्तरलों, " मनासारखी सहधर्मिणी मिळण्यासाठीं मीं नलिनीला कोणातरी परगोत्रांतील पुरुषाला दत्तक घ्यायला लावली असती व मग तिच्याशीं विवाह केला असता. अशा रीतीनें मुलगी दत्तक घेऊन ती बापाच्या इस्टेटीची वारस होत नसल्यानें कोणीहि तिला सहज दत्तक घेतली असती. तसें करायला तुला काय हरकत आहे ? आतां कुटुंबाच्या पोटापाण्याचा प्रश्न म्हणशील तर तो केवळ पोरकटपणा ठरेल. तुम्हां दोघां सुशिक्षित वधूवरांना प्रयत्नांच्या जोरावर ह्या पृथ्वीचाहि स्वर्ग बनवतां येईल; इच्छा मात्र पाहिजे. "

माधव म्हणाला, " तूं म्हणतोस तशी योजना होण्यासारखी असेल, तर तुला व नलिनीला, दोघांनाहि आवडतें तेंच मला करतां येईल. पण मी मात्र मला दत्तक घेतां का, म्हणून कुठें विचारायला जाणार नाहीं. "

मी उत्तरलों, " तूं नको जाऊंस; मी जाईन. नलिनी माझी बहीण आहे, तिच्या संसाराची मला काळजी आहे. "

ह्या योजनेला मूर्त स्वरूप आणण्यासाठीं मला रावसाहेब किंवा मामा या दोघांपैकीं कुणातरी एकाचा आश्रय पाहिजे होता. यांपैकीं मामांना माझ्याविषयीं पूर्ण तिरस्कार वाटत असल्यामुळें ती वाटच बंद ! शेवटीं मी स्वतां रावसाहेबांकडे गेलों, तों ते घरच्या माणसांशीं दागिन्यांच्या गोष्टी बोलत बसले होते. त्यांच्यासमोर कांहीं नवे कोरे दागिने पडले होते. कुंतला त्यांच्या डाव्या हाताला बसून ' मला कसल्या मोत्यांचीं कुडीं देणार हो ? ' म्हणून विचारीत होती, मामी लीलाधराला पाजीत जवळच बसून ' बाबा, मला मोत्यांचा साज करायचा आहे. तुम्ही मोत्यें पहा; मी पैसे मागवत्यें. ' म्हणून सांगत होती. हरिहरपंत व नीरजाकाकू जवळच होतीं. नीरजाकाकू म्हणाल्या, " दादा, माझ्या मनूनें टपोऱ्या मोत्यांची लवंग करून मागितली आहे; तिला रोजरोज नथ घालायचा कंटाळा येतो. "

हरिहरपंत म्हणाले, " आतां मनूला म्हणावें, काय हवेत नकोत ते दागिने आपल्या नवऱ्यापाशीं माग. "

असा सारे आमोदप्रमोद चालला असतां मी त्या ठिकाणीं क्षणभर उभा राहिलों होतों. इतक्यांत मामींच्या आईनें मला पाहिलें, व मामींना सांगितलें, " वीणे, लीलाधराला घेऊन घरांत जा. " लगेच रावसाहेबांकडे वळून ती म्हणाली, " दागिन्यांचा पसारा जरा आवरून ठेवावा;—तो आला आहे. उचलील एखादी पुरचुंडी व घालील खिशांत. "

मामींची आई हे शब्द अत्यंत हळू बोलली; पण मला ते ऐकूं आले. मीं माझ्या मनाशीं विचार केला, निरपराधी जीवाच्या सर्वांगावर त्याच्या आप्तेष्टांनीं व त्यांच्या वशिल्यानें साऱ्या दुनियेनें निंदेची आग पाखडून त्या आगीच्या फोफाट्यांत त्याचें हृदय भाजून काढणें, हीहि एक जगाची रीत आहे. मामी लीलाधराला घेऊन घाईघाईनें घरांत निघून गेल्या, त्यामुळें मला त्या गोजिरवाण्या बालकाचें डोळांभर दर्शनहि घेतां आलें नाहीं. मी मामींना हांक मारून म्हणालों, " मामी, एकवार तुमच्या लीलाधराला मला डोळांभर पाहूं द्या तरी ! "

मामींच्यानें माझी भीड मोडवेना; त्या लीलाधराला घेऊन बाहेर येऊं लागल्या. पण नीरजाकाकू त्यांना हातानें दरवाजाच्या आंत लोटीत म्हणाल्या, " बाळाला दृष्ट लागेल; त्याला दाखवायचा नाहीं. "

कुंतला तिरस्काराच्या व आढ्यतेच्या स्वरानें विचारूं लागली, " त्यांत हो पाह्यचें तें काय ? मुलासारखा मुलगा आहे, नानांसारखा तोंडवळा व आंगलट आहे, ताईसारखा वर्ण आहे. तो जगावेगळा नाहीं कांहीं. "

अखेर मला लीलाधराला कांहीं डोळांभर पह्यातां आलें नाहीं. मात्र ह्या एकंदर प्रकारावरून मी माझ्या आप्तेष्टांना व हितकर्त्यांनाहि किती परका झालों आहें, याची ओझरती चुणुक मला कळली.

इतक्यांत नलिनी बाहेरून आली. तिला मात्र मला पाहून खराखुरा आनंद झालेला दिसला. तिनें माझी विचारपूस केली व चार कुशल प्रश्न विचारले. ह्या आमच्या एका रक्ताचा गुण काय, हा आपलेपणा मला त्या वेळीं जाणवला. 'पाण्यापेक्षां रक्त जाड असतें' अशी एक इंग्रजी म्हण आहे, तिचा अर्थ हाच.

नीरजाकाकू नलिनीला म्हणाल्या, " नलिनीताई, तुमच्या बंधूंना म्हणावें, आतां यापुढें तरी चोरी, चाहाडी, असे लांड्या लबाडीचे उद्योग करूं नका. अशा गोष्टींनीं त्यांचें, त्यांच्या कुळाचें व त्यांच्याशीं आमचा जर थोडाफार स्नेहाचा किंवा नात्याचा संबंध असेल तर आमचेंहि नांव बद्दू होतें.–सांगा त्यांना. "

नलिनी पाण्यांत टाकलेल्या मिठाच्या खड्यासारखी विरघळून स्वस्थ बसली. कांहीं वेळानें ती मला म्हणाली, "अनंतरावांची आतां धडगत नाहीं; त्यांचें वेड विकोपाला गेलें असून त्यांना आतांच वेड्याच्या इस्पितळांत नेण्यांत आलें आहे."

हरिहरपंत म्हणाले, " पहा ! ही तात्विक वेड्या पीरांच्या जन्माची गत पहा ! विचारांच्या वातावरणांत भराऱ्या मारणाऱ्या मानवी पक्ष्यांच्या आयुष्याची शेवटीं हीच दशा व्हायची. "

अनंताची उडी होती काय, व त्याचा परिणाम झाला काय ! पण त्या गोष्टीला आतां इलाज नव्हता. मी हरिहरपंताच्या बोलण्याकडे काणाडोळा करून रावसाहेबांकडे नलिनी व माधव यांच्या लग्नाची गोष्ट काढली व गोत्राची अडचण दूर करण्याचा मार्गहि दाखवून दिला. रावसाहेबांना ही योजना पटली. ते म्हणाले, " नलिनीची खुषी असेल तर तिला दत्तक घ्यायला माझी तयारी आहे. पण धर्माला ह्या गोष्टी मानवतात ना ? "

मी म्हणालों, " धर्माला मानवल्याच पाहिजेत. आणि नच मानवल्या तर आम्हीं मुलीं लग्न कायदेशीर रीतीनें नोंदवूं म्हणजे झालें. "

आम्हीं सर्व सुधारक असल्यामुळें माझे विचार सर्वांना पटले, व सर्वांचें

मत अनुकूल पडलें. माझ्या मामींना तर पराकाष्ठेचा आनंद झाला. त्या नलिनीला चिडवूं लागल्या, " नलिनीवैनी, आतां ना पगार; ना नोकरी. नवऱ्याची सेवा केली पाहिजे व माझ्या लीलाधराला सांभाळला पाहिजे. "

नलिनी लाजून अधोमुख होऊन गालांतल्या गालांत हंसूं लागली. पुन्हां मामी आठवण करून म्हणाल्या, "अन् माझ्या लीलाधराला औषध सुद्धां फुकटच द्यावें लागेल बरें ! पैसा मिळायचा नाहीं. सांग कबूल म्हणून. नाहींतर आतांच सांगत्यें माधवरावांना कीं घ्या रोख पांच हजार रुपये हुंडा म्हणून. "

मामींची वृत्ति नेहमींच अशी आनंदी व खेळकर असे कीं, त्यांच्या वाणींतील आनंद घेऊन ब्रह्मांडासभोंवार भ्रमण करण्यासाठीं निघालेली वाऱ्याची एखादी झुळुक ज्याच्या ज्याच्या कानांवरून जावी, त्यानें त्यानें आनंदसागरांत डोलूं लागावें.

शेवटीं नलिनीला रावसाहेबांनीं दत्तक घेण्याचें ठरविलें. ह्या गोष्टीचा समक्ष खुलासा व्हावा म्हणून रावसाहेबांच्या नोकराकरवीं मी माधवाला समक्ष बोलावून आणलें, व त्याचें मत विचारलें. त्यालाहि आमची योजना मान्य झाली. त्याच आठवड्यांत दत्तविधान व लग्न हे दोन्ही समारंभ उरकून घ्यावयाचें ठरलें. लग्नानंतर माधवानें आपल्या घरीं राहून आपली शेतवाडी ऊर्जितावस्थेला आणावी आणि नलिनीनें गरीब स्त्रिया व मुलें यांच्यासाठीं मोफत दवाखाना काढावा असें ठरलें.

माधवाकडे पहाण्याची सर्वांची दृष्टि आतां एकदम बदलली. रावसाहेब पित्याच्या स्नेहमय दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागले. मामी त्याची वडील बहीण शोभूं लागल्या. कुंतला तर एव्हांपासूनच ' माधवदादा, नलिनीताईचें नांव घ्या हो ! ' अशी त्याची व तशीच नलिनीची थट्टामस्करी करूं लागली. त्या दिवशीं माधवाला रावसाहेबांनीं मुद्दाम आपल्या घरीं जेवायला रहाण्याचा आग्रह केला; तो अर्थातच माधवाच्यानें मोडवला नाहीं. आपल्या आवडत्या वाग्दत्त वधूचे हात आज त्याच्या पोटांत जावयाचे होते; अशी सोन्याची संधि तो कशाला दवडील ! मात्र ह्या आनंदाच्या वेळीं त्याला अनंताचा विसर पडला नाहीं. तो म्हणाला, " आज अनंत जर धड असता, तर आपल्या आनंदाचा खास वांटेकरी झाला असता ! "

" खरेंच, अनंतासारख्या दुबळ्या मनाच्या बाईलवेड्यांची मला कींव करावीशी वाटते. " नलिनी म्हणाली. वास्तविक अनंताविषयीं असे अनुदार-

पणाचे उद्गार काढण्याचें नलिनीला कांहीं कारणहि नव्हतें व तिचा तसा अधिकारहि नव्हता. तिला एक सुखाचा ठेवा तिच्या थोर नशिबानें सांपडला, म्हणून तिनें आपल्या बरोबरीच्या मित्रांकडे इतक्या तुच्छतेनें पहावयाचें नव्हतें. अनंत काय, नलिनी काय किंवा मी काय, वस्तुतः ह्या एका लग्नाच्या बाबीपुरतीं तरी एकाच तत्त्वानें वागत आलों होतों, व माधव लग्नाला तयार न होता तर तिचीहि अवस्था अनंतासारखीच कींव करण्याजोगी झाली असती. पण तिच्या थोर नशिबानें तिचा डाव साधला म्हणून ती आम्हांला आतां शहाणपणाच्या गोष्टी शिकवूं लागली. इतक्या अभिमानानें बेहोष होण्याचें कारण न्राहीं, असें नलिनीला सांगण्याचें माझ्या मनांत आलें होतें. पण पुन्हां विचार केला कीं, तिच्या सुखावलेल्या जीवाला उगाच दुःखाची झळ कां द्या! मी तिला एवढेंच म्हणालों, " नलिनीताई, हें असें चालायचेंच. संसार हा एक जुगार आहे. ह्या जुगारांत आपणासारखें दान पडलें तर आपण शहाणे; पण जर का दान विरुद्ध पडलें, तर मात्र आपणासारखे मूर्ख आपणच. "

माधवाला माझे शब्द झोंबले असावे. तो म्हणाला, " बाकी निळकंठ, मी माझ्या ध्येयापासून ढळून आयुष्यांत विजयी झालों व अनंत ध्येयाला चिकटून हट्टानें गारद झाला; आतां ह्या दोघांत खरा विजयी कोण हें ठरवणें अवघड आहे खरें. "

ह्या विषय इथेंच संपवावा ह्या उद्देशानें मी म्हणालों, " तुम्ही दोघेहि विजयी. स्वतःचें ध्येय सोडून तुला सुखाचा शोध लावतां आला म्हणून तूं विजयी, व स्वतःच्या ध्येयाला चिकटून वागतां वागतां अनंतानें धीटपणानें स्वतःचा बळी दिला म्हणून तोहि विजयी. म्हणून म्हणतों, हा विषयच आतां राहूं दे. "

तेवढ्यांत नीरजाकाकू मला म्हणाल्या, " ते तुमचे ध्येयाचे वितंडवाद सावकाश मग घालीत बसा. पण निळकंठ, अगोदर माझें ऐका. आज तुम्हीहि आमच्याच घरीं जेवायला रहा. मनोरमेचें मेहुणहि आजच जेवायला यायचें आहे. लग्नाच्या वेळीं तुमचें तोंड गोड करतां आलें नाहीं, तें आतां गोड करूं द्या. "

मी मुद्दाम टाळाटाळ करण्याच्या उद्देशानें उत्तरलों, "आज राहूं द्या. नीरजाकाकू, पुन्हां केव्हां तरी मी जेवायला येईन. "

" कां बरें ? आज कां राहूं द्या ? " नीरजाकाकूंनीं विचारलें.

" आज माझा गुरुवार आहे. " मी बळेंच खोटें बोललों.

"बरें तर, पुन्हां केव्हांतरी या. पण अगत्य या बरें!" नीरजाकाकू म्हणाल्या.

" हो! हो! मी अगत्य येईन " असें मीं खोटेंच अभिवचन दिलें. मध्येंच हरिहरपंत म्हणाले, " असें पहा निळकंठ, मनुष्य कितीहि सद्गुणी असला तरी त्याचे ग्रह फिरले, कीं त्याला नसते दुर्गुण आठवतात. आतां झाल्या गोष्टी होऊन गेल्या. आमचा चोरीला गेलेला माल सांपडला; तुम्हालाहि एक धडा मिळाला. लीलेच्या बाबतींत तुमच्या हातून अपराध घडला, ती लीलाहि निजधामाला गेली. आतां तरी तुम्ही असे वाटेचे आडवाटेला जाऊं नका म्हणजे झालें. पाहिजे तर तुम्हांला शोभेशी एक मुलगी आम्ही पाहून देतों. तुम्ही लग्नकार्य करा, संसार थाटा व सुखानें आयुष्य कंठा."

मनांतून मला ह्या उपदेशाचा अगदीं वीट आला होता. पण तो बाहेर कसा बोलून दाखवावा! मी हरिहरपंतांच्या शब्दाला मान देण्यासाठीं तोंड-पुजेपणानें उत्तरलों, " बरें आहे. आपण म्हणतां तसेंच कांहींतरी करून सुखी होण्याचा मी विचार करीन. "

" तें केव्हां पण ? " नलिनीनें विचारलें. आपण आतां संसारी बनणार, तेव्हां आपल्या पाठिराख्या बंधूचाहि संसार थाटला जावा, व जिकडेतिकडे आनंदीआनंद व्हावा, अशीच तिची इच्छा होती.

मीं हंसत हंसत नलिनीला उत्तरलों, "पहिल्यानें तुमचा संसार तर थाटूं द्या! म्हणजे माझ्या लग्नांत निदान विड्या तोडायला तरी तुमचा जोडा उपयोगीं पडेल!"

प्रौढ व वाग्दत्त वधूवरांची थट्टा केलेली कुणाला आवडणार नाहीं! त्यांतल्या-त्यांत ही एकमेकांनीं परस्परांच्या संमतीनें जुळवलेली संसाराची सांगड! मग माझे थट्टेखोर बोल ऐकून माधव व नलिनी यांच्या गालांवर गुलाबी हास्य चमकूं लागलें तर त्यांत नवल तें काय!

मी बाह्यात्कारी जरी हंसून खेळून वागत होतों, तरी माझ्या अंतर्यामीं दुःखाचा प्रचंड वणवा पेटला होता. त्या वणव्यांत माझी एकट्याचीच जळून राख व्हावी, इतरांच्या आंगाला त्याची झळ लागूं नये, याच हेतूनें मी अत्यंत सावध-गिरीनें आनंदी वृत्तीचा बहाणा केला होता. हा बहाणा यथान्याय पार पाडण्या-साठीं मला घडोघडीं खोटें बोलावें लागत होतें. पण त्याला इलाज नव्हता. ह्या घरची पायरी पुन्हां चढायची नाहीं व ह्या मंडळीला आपलें काळें तोंड पुन्हां दाखवायचें नाहीं, असा मनांतून मीं निर्धार केला होता. दाही दिशांनीं निराश

बनलेल्या जिवाची आतां फक्त एकच आशा राहिली होती. ती ही कीं, जातां-जातां तरी मामी आपला लीलाधर मला दाखवतील. मीं मामींना विचारलें, " मामी, तुमचा लीलाधर मला दाखवतां का ? "

मामींनीं उत्तर देण्यापूर्वीच नीरजाकाकू उतरल्या, " नाहीं हो ! तो आतां झोपीं जात आहे. "

" बरें तर ! " असें म्हणून मी जड अंतःकरणानें सर्वांचा निरोप घेतला.

*　　　*　　　*　　　*

पुढें काय !

वर्तमानकालीन जीविताच्या उंचच उंच चबुऱ्यावर उभा राहून मीं भूतकाळचें कल्पनामय जग व भविष्यकाळचें कल्पनातीत जग याचा माझ्या सभोंवार जो अजस्र पसारा पडला होता, त्याच्याकडे एकवार नजर फेंकली, तों जगाच्या कोनाकोंपऱ्यांतून, सचेतन व अचेतन वस्तुमात्राच्या मुखांतून, दाही दिशांच्या गवाक्षांतून व अगम्य अशा अंतरिक्षांतून, जिकडून तिकडून मला एकच प्रश्न तारस्वरानें विचारला जाऊं लागला, " पुढें काय ! "

' पुढें काय ' ह्या भविष्यकालीन विचारानें माझ्या अंतःकरणांत भयंकर कालवाकालव करून सोडली होती. वर्तमानकाळच्या वेदीवर मी उभा होतों खरा; पण एथून पुढें आपण आयुष्याचा कोणता टप्पा गांठावा, हेंच मला कळेना. पायांखालच्या भूतकाळाकडे पाहिलें तरीहि दृष्टि पोंचेना; डोक्यावरच्या भविष्यकाळाकडे पाहिलें तरीहि नजर ठरेना. ब्रह्मांड हें परमेश्वराचें अवाढव्य विलासमंदिर असून भूतकाळ हा त्या मंदिराचा पाया, वर्तमानकाळ ही इमारत व भविष्यकाळ हें त्या इमारतीचें गवाक्ष असावें, अशी ब्रह्मांडाच्या अस्तित्वाची मला अंधुक व शंकित कल्पना होती. ती मी घटकाभर खरी धरून चाललों, तरी त्या मंदिरांत माझ्यासभोंवार निराशा व उद्वेग यांचा प्रचंड वणवा पेटलेला मला दिसत होता. पण ह्या वणव्यापासून आपला बचाव करण्यासाठीं कोणत्या वाटेनें बाहेर पडावें हें मात्र मला कळेना. माझ्या तुटपुंज्या आयुष्याची उतरंड नियतीनें पायरीपायरीनें जगासमोर रचून ठेवलीच होती. त्या उतरंडीवर चढून मी माझ्या आयुष्याचें सिंहावलोकन करूं लागलों, तेव्हां मला काय दिसलें !—माझ्या आयुष्याचें रंगण जें आजवर दैव व प्रयत्न यांच्या युद्धाचें कुरुक्षेत्र बनलें होतें, तेंच रंगण आतां दैवाशीं

झगडतां झगडतां धारातीर्थी पतन पावलेल्या प्रयत्नांच्या पथकांतील आशा व महत्त्वाकांक्षा यांचें स्मशान शोभूं लागलें. त्या स्मशानांत निराशेचा वडवानल त्या प्रेतांच्या चिता धडधड जाळीत आहे, गतकाळच्या आठवणींचा सोसाट्याचा वारा काळाच्या अंतरिक्षांतून वहात असून त्या वायुलहरींच्या पांगुळगाड्यांवर बसून माझ्या पांगळ्या सुखलालसा परलोकीं जात आहेत, आणि मी ! मी कुठें जात आहें !

ह्या साऱ्या उलथापालथींत माझ्या आयुष्याचें तारूं कोणत्या दिशेनें भडकत जाणार हेंच मला कळेना. इतकेंच काय; पण भविष्यकाळाचा विचार करतांना जशी माझी मति आंधळी झाली होती, तशीच रावसाहेबांच्या घरून निघाल्यावर पायवाटेनें चालतां चालतां माझी गतीहि आंधळी झाली होती. विचारांत मस्तक गढून गेलें होतें, व शरिराचा बोजा कसाबसा उचलून पाय यंत्रासारखे चालत होते. अशा विमनस्क स्थितींत मी ॐकारेश्वरावर केव्हां येऊन पोंचलों, याचेंच मला भान नव्हतें. त्या भयाण व प्रशांत स्थळीं तरी मी शुद्धीवर आलों याचें कारण माझ्या मागोमाग एक प्रेत दहनासाठीं तिथें आणण्यांत आलें, त्या प्रेताबरोबर उत्तरी गळ्यांत अडकवून रडत रडत जड पावलें मोजीत चालणाऱ्या एका तरुणाचे हुंदके मला ऐकूं आले. मीं मागें वळून पहाण्यापूर्वीच माझ्या बाजूनें प्रेतयात्रा पुढें निघून गेली. त्या रडणाऱ्या तरुणाला मीं ओझरता पाहिला, तेव्हां चेहरा ओळखीचासा दिसला. त्याला मी कॉलेजांत असतांना पाहिल्याचें मला आठवलें. त्याचें नांव कमलाकर शारंगपाणी असें होतें. कमलाकर कुणासाठीं रडतो आहे तें पहाण्यासाठीं त्या प्रेतयात्रेमागोमाग जाऊन मीं मृताचा देह न्याहाळून पाहिला, तेव्हां मला कळलें कीं, सोळा वर्षाच्या एका सुंदर तरुणीसाठीं तो रडत होता. मागाहून तेथल्या तेथें कर्णोपकर्णी कळून आलें कीं, ती तरुणी त्या तरुणाची सहचारिणी होती. पहिल्यावहिल्या पाळीला ती बाळंत झाली, तिला मुलगा झाला, तो बाराव्या दिवशींच देवाच्या घरीं गेला, व त्याच्या मागोमाग त्याच्या मातेनें आज देवाच्या घरचा रस्ता सुधारला.

कमलाकरानें पत्नीचें प्रेत खालीं ठेवल्यावर मंत्राग्नि देण्यासाठीं आपल्या प्रिय पत्नीच्या शवाला पहिली चूड लावतांना एकदम ‘ विमले ! विमले !’ असा टाहो फोडला, व एका हातानें आंसवें पुशीत दुसऱ्या हातानें चिता

पेटती केली. जो उठला तो कमलाकराचें शांतवन करूं लागला. त्या प्रसंगीं-देखील ज्याच्या त्याच्या तोंडून विमलेची वाखाणणी होत असलेली ऐकून विमला ही कमलाकराची अतिशय आवडती सुगृहिणी असावी असें कुणालाहि वाटलें असतें. अशा प्रियपत्नीसाठीं कमलाकराला हळहळ वाटल्याशिवाय कशी राहील ! कमलाकराचें हें दुःख पाहून मला माझ्या दुःखाचाहि क्षणभर विसर पडला. इतकेंच नव्हे, तर कमलाकर आपल्या प्रिय पत्नीसाठीं रडत असलेला पाहून माझ्या जीवाचा विरंगुळा झाला. मीं मनांत म्हटलें, मनासारखी सहधर्मिणी मिळावी व तिच्या संगतींत संसारसुखाचीं फुलझाडें फुलूं लागलीं नाहींत तोंच मृत्यूच्या सैतानी पावलांखालीं तीं अशीं एकाएकीं फुलांफळांसह चुरून जावीं, असा दैवदुर्विलास ज्या तरुणाच्या वांट्याला आला, त्या तरुणा-सारखा अभागी जीव सृष्टीच्या पाठीवर दुसरा कोण असणार ! माझी आवडती वाग्दत्त वधू मला लाभली नाहीं, म्हणून मी रडत होतों. पण कमलाकराशीं तुलना करतां माझी स्थिति कितीतरी चांगली होती. ज्या दुर्दैवानें माझ्या पुढ्यांत वाढलेलें मिष्टान्नाचें ताट ओढून त्या ताटांत परक्या तरुणाला जेवूं घातलें, त्याच दुर्दैवानें कमलाकराच्या तोंडीं पडलेला सुग्रास निष्ठुरपणानें ओढून काढला. भरल्या ताटावरून एखाद्याला उठवण्यापेक्षां एखाद्याच्या भरल्या तोंडांतून अन्नाचा घांस हिसकावून घेणें खरोखरच अत्यंत निर्दयपणाचें आहे.

" विमले ! विमले ! तूं मला सोडून गेलीस, आतां माझ्या संसारांत दिवा कोण लावील ! विमले, मला सोडून तूं ह्या स्मशानांत कठोर मनानें काळाच्या दाढेंत एकटीच कायमची वसती केलीस; पण तुला सोडून मी आतां संसा-राच्या स्मशानांत एकट्यानें कशी वस्ती करूं ! कुमारापरी कुमार गेला, विमले-परी विमला गेली, आतां हें माझें काळें तोंड घेऊन मी तरी कोणत्या आशेवर मागें राहूं ! " असा विलाप करून कमलाकर धाय मोकलून एकसारखा रडत होता, व बरोबरची मंडळी त्याला परोपरीनें समजावीत होती. समोर विम-लेची चिता धाड्धाड् पेटत होती. सौंदर्य व यौवन ह्या ईश्वरदत्त मोहकतेनें खुललेल्या विमलेच्या देहांतील हृदयसंपुटांत कमलाकराचें सौख्यसर्वस्व सांठवलेलें होतें. पण हां हां म्हणतां त्या विमलेची व त्याबरोबरच कमलाकराच्या सौख्यसर्वस्वाची होळी झाली.

कमलाकराचें दुःख जरी अपरंपार होतें, तरी तें पाहून माझ्या मनाला एक

प्रकारें समाधान वाटलें. इतका वेळ मला वाटत होतें कीं, अलम दुनियेंत दुःखी प्राणी असा काय तो एकटा मीच. पण माझ्या जोडीला कमलाकर हा दुसरा अभागी साथीदार मला सांपडला. माझ्या दुःखाशीं कमलाकराच्या दुःखाची तुलना करतां मी कमलाकरापेक्षां सुखी आहें, असें माझें मलाच वाटूं लागलें. कमलाकराला आवडती वधू मिळाली. तिच्या सहवासांत त्यानें संसाराचें नंदनवन फुलवून कांहीं दिवस फार सुखांत काढले, त्या हौशी जोडप्याला देवदयेनें पुत्ररत्न लाभल्यामुळें तर त्यांच्या सुखाला सीमा राहिली नव्हती. पण त्या अभागी युवदंपत्याच्या आयुष्याच्या महासागरावर संसारसुखाचा बुडबुडा हां हां म्हणतां उमटला व तो हां हां म्हणतां फुटला! आपल्या अतुलनीय प्रेमाचें गोड फळ म्हणून देवानें गोजिरवाणा बाळ आपल्या उदरीं जन्माला घातला, त्याचें कोडकौतुक करून त्याला आज आंगाखांद्यावर खेळवायचें व उद्यां त्याच सुकुमार बालकाला दीड हात रुंदीच्या खळग्यांत गाडून त्यावर आपल्याच हातानें माती लोटायची! आज आवडत्या सहचारिणीच्या सहवासांत हृदयानंदकारी शृंगारचेष्टा करतां करतां सहचारिणीच्या गालांना दंतव्रण झाला किंवा मोतीसरांसारख्या घर्मबिंदूंच्या स्वरूपांत शृंगारसुखाच्या परमावधीनें पाझरलेलें श्रमसौंदर्य चमकून खुलूं लागलें तर प्रेमळ प्रियकरानें ज्या हातांनीं ते गाल पुसून पुन्हां चुंबावे, त्याच हातांनीं त्या प्रिय पत्नीच्या मृत देहाला पेटती चूड लावावी! नाजूक नवतीच्या सुंदर नारीच्या आंगाला बोंचूं नयेत म्हणून तलम वस्त्रें घेण्यासाठीं सदा तत्पर असणारा प्रेमळ पति आपल्या हातांनीं आपल्या सौभाग्यवतीची चिता रचून त्या चितेवर सौभाग्यवतीला जाळूं लागला, म्हणजे त्याचें अंतःकरण किती पिळवटून निघत असेल बरें! असे अनेक भयंकर विचार, कमलाकराच्या पत्नीची पेटती चिता डोळ्यांसमोर असतां माझ्या डोक्यांत घोळूं लागले व त्या वेळेपुरतें तरी मनाला वाटलें कीं, मनोरमेच्या ललाटीं माझ्या नावानें सौभाग्यटिळक रेखला गेला नाहीं हें एका परीनें फार चांगलें झालें. समजा, मनोरमा माझी सहचारिणी झाली असती, तिनें एखाद्या गोजिरवाण्या बालकाला जन्म दिला असता, व अशा संसारसुखाच्या भरल्या बंधांत तीं मायलेंकरें काळाच्या दाढेंत रगडलीं गेलीं असतीं तर! शिव! शिव!

थोड्याच अवकाशांत विमलेच्या चितेनें चारी बाजूंनीं पेट घेतला.

सभोंवार ज्वाला भडकूं लागल्या. चितेवर विमलेचें शव ठेवल्यावेळीं तिच्या सौंदर्यसंपन्न देहाचा अवशेष तरी दिसत असे; पण तोहि चितेच्या वाढत्या वणव्यांत हळूहळू दिसेनासा होऊं लागला. इतका वेळ शवाच्या रूपानें तरी विमलेचें अंधुक अंधुक दर्शन होत होतें, पण आतां तेंहि होईनासें झालें !

कमलाकराला पुन्हां दुःखाची एक जोराची उसळी आली. त्या उसळी-सरसा तो 'विमले ! विमले !' असा टाहो फोडीत चितेकडे धांवला व बाहु पसरून उत्कंठेनें उभा राहिला. पण विमला एकवार गेली ती परत कोठून येणार ! अखेर दुःखाचा आवेग आवरेना तेव्हां बेभान होऊन एखाद्या उन्मत्ता-प्रमाणें कमलाकरानें विमलेच्या चितेंत धाड्कन् उडी घेतली. पण तेवढ्यांत बरोबरची मंडळी धांवली व त्याला चितेंतून ओढून काढलें. कमलाकराच्या नेसत्या धोतरानें पेट घेतला होता, तें धोतर एका धाडसी ब्राह्मणानें प्रसंगा-वधान राखून मोठ्या चतुराईनें फेडलें, व आपल्या आंगावरचें उपरणें त्याला नेसवून हळूहळू चालवीत घरीं नेलें. आगीनें कमलाकराच्या सर्वांगाला जागो-जाग बऱ्याच जखमा झाल्या होत्या. पण तिकडे लक्ष्य न देतां पूर्णपणें देहभान विसरून कमलाकर रस्त्यानें जातांनादेखील 'विमले ! विमले !' असा टाहो फोडीत चालला होता.

हा एकंदर भयाण देखावा पाहून संसाराविषयींच्या माझ्या भावना एकाएकीं दुखावल्या गेल्या. आपण सुखासाठीं संसार थाटतों; पण संसारांत 'सुख पहातां जवापाडें; दुःख पर्वताएवढें' म्हणतात, तेंच परिणामीं सत्य ठरतें कीं काय, याचा विचार करतां करतां तिन्हीसांजांपर्यंत वेळ कसा निघून गेला हेंच मला कळलें नाहीं. तिन्हीसांजांच्या वेळीं तरी मी भानावर आलों याचें कारण, माझ्या परिचयाच्या आवाजांत कुणीतरी हांक मारलेली मला ऐकूं आली, "निळकंठ !"

मीं मागें वळून पाहिलें तों माधवाचीच ती हांक होती. मीं माधवाला विचारलें, "माधव, तूं रे इकडे कुठें ?"

पण माझ्या प्रश्नाचें सरळ उत्तर न देतां माधवानें मलाच उलट विचारलें, "पण मला अगोदर सांग, तूं इकडे कुठें ?"

माधवाच्या प्रश्नाला मी काय उत्तर देऊं ! इकडे कुठें आलों म्हणून त्याला सांगूं ! माझ्या तोंडावाटे शब्दच निघेना. कारण, खरें बोलावें तर माझ्या

वाणीला वाटच सांपडेना. मी कांहींच बोलत नाहीं असें पाहून माधव मला म्हणाला, " जरा माझ्याबरोबरच चल पाहूं. "

" कुठें ? " मीं विचारलें. माझ्या भयाण एकांताचा माधवानें असा भंग केला म्हणून मला त्याचा थोडासा राग आला.

" चल म्हटल्यावर चलावें. काय, कुठें, केव्हां याची नसती चौकशी करूं नये. " माधव उत्तरला.

मला वाटलें कीं, माधव मला पुन्हां रावसाहेबांच्या घरीं बोलावतो आहे. पण माझ्या मनांतून रावसाहेब, मामा, मामी ह्या आप्तमंडळीला माझें अपेशानें काळवंडलेलें काळें तोंड मुळींच दाखवायचें नव्हतें. मी उत्तरलों, " माधव, ज्या आप्तेष्टांकडून माझी आजवर इतकी विटंबना झाली, त्या आप्तेष्टांच्या घरीं पुन्हां जिवंत जाण्यापेक्षां मरणाच्या मैदानांतून मजल दर मजल चालून मरणघडी साधणें बरें, असें मला वाटतें. यासाठीं मी घरीं येत नाहीं; तूं जा. "

" मनोरमेच्या मनांतून तुला एकवार भेटायचें आहे. " माधव उत्तरला.

" मनोरमा कुठें आहे ? " मीं विचारलें.

" ही पहा इथें आहे. जरा इकडे या. " हे यमुनेचे शब्द माझ्या कानीं आले. यमुना देवालयाच्या दारांत उभी राहून बोलत असलेली मला दिसली. आतां ह्या ऋणानुबंधी मित्रमैत्रिणींची नजर चुकवणें माझ्या आवांक्याबाहेरचें होतें. हा एकटा माधवच असता तर कदाचित् मीं नकाराचा पाढाच वाचून वेळ मारून नेली असती. पण यमुना व मनोरमा यांच्यासमोर मला तितकें निष्ठुर होतां येईना. कारण, संसाराचा सारीपाट खेळतांना आम्हीं तिघेंहि एकाच वेळीं हार जाऊन, दुर्दैवाच्या हातांतील बाहुलीं बनलों होतों. मनावेगळ्या माणसांशीं उभ्या आयुष्याची बाजारहाट करून जन्मठेपेची घोर शिक्षा भोगणाऱ्या त्या माझ्या दोन बहिणी होत्या. त्यांनीं स्वतःच्या सुखदुःखाच्या मनकवड्या गुजगोष्टी बोलायच्या झाल्या तर त्या तरी माझ्यासारख्या मायेच्या बंधूखेरीज दुसऱ्या कुणापाशीं बोलाव्या !

यमुनेची हांक एकतांच मी माधवाबरोबर देवालयांत गेलों. पहातों तों मनोरमा व यमुना तर तिथें होत्याच; पण नलिनीहि होती. ही सर्व मंडळी अनपेक्षित रितीनें भेटायला आलेली पाहून मी आश्चर्यानें थक्कच झालों. मनांत म्हटलें, मी इथें आहें ही बित्तं बातमी यांना दिली तरी कुणीं !

# सोळावी झुळुक

## मनोरमा (४)

" माधव, ह्या साऱ्याजणींना तूं इकडे कशाला आणलेंस ? " आमच्याकडे पह्यात निळकंठांनीं विचारलें. त्यांना आम्हीं नको होतों, किंवा आमचा त्यांना तिरस्कार वाटत असावा, असा ध्वनि कांहीं त्यांच्या प्रश्नांतून निघाला नाहीं; उलट माझ्या मतीप्रमाणें मीं त्यांच्या प्रश्नाचा अर्थ लावला, तेव्हां मला असें वाटलें कीं, आम्ही कोमल मनाच्या अबला असल्या भयाण जागीं, व भयाण प्रसंगीं भेदरून जाऊं कीं काय, याचें त्यांना भय वाटत असावें.

माधवरावांनीं निळकंठांच्या प्रश्नाला उत्तर देण्यापूर्वीच मी उत्तरल्यें, " माधवरावांनीं आम्हांला आणलें नाहीं, मीच माधवरावांना घेऊन आल्यें. "

" आणि तूं तरी कशाला आलीस ? " निळकंठांनीं दाटल्या कंठानें विचारलें. बोलतां बोलतां त्यांचा कंठ इतका दाटून आला कीं, त्यांना पुढें बोलतांच येईना. डोळेहि हां हां म्हणतां पाण्यानें भरून आले. पहिल्यानें त्यांनीं माझ्या नजरेला नजर दिली; पण आतां त्यांची नजर माझ्या नजरे-समोर स्थिरावेना.

" माधव, मी जातों. " असें म्हणून निळकंठ पुन्हां मागच्या पावलीं मागें जाऊं लागले. त्यांना मीं हात जोडून विनवलें, " कृपा करून आपण थोडा वेळ खालीं बसा. मी मुद्दाम आपणाला भेटायला आल्यें आहें. "

* * * *

आज सकाळीं उजाडतांच आंगणांत सडारांगोळी घालण्यासाठीं मी आल्यें, तेव्हां माझा हा मूर्तिमंत हृदयानंद मार्गानें जातांना पाहिला. पण ' निळकंठ, इकडे या ' अशी हांक मी त्यांना कोणत्या तोंडानें मारूं ! त्यांच्याशीं बोलायचें धाडस माझ्याच्यानें तेव्हां करवलें नाहीं, याला अनेक कारणें होतीं. एक तर मी आतां परदारा झाल्यें होत्यें. कुंवारपणांत कायावाचामनानें पावित्र्याची पाळणूक करणें एवढीच जबाबदारी माझ्या शिरावर होती; पण लग्न झाल्या-दिवसापासून त्या पावित्र्याबरोबरच पातिव्रत्याची पाळणूक करण्याची नवी जबाबदारी माझ्या वांट्याला आली होती. ही नवी जबाबदारी जुन्या

जबाबदारीहून अत्यंत बिकट होती; कारण, कुंवारपणांत काया वाचा-मनानें स्वतंत्र राहून मला माझ्या पाविश्याचें रक्षण करणें सुलभ जाई. पण ब्रह्म-लिखिताच्या दैवी जोरावर लग्नाच्या शृंखला माझ्या हातींपायीं अडकवण्यांत येऊन मला संसाराच्या कोंडवाड्यांत कोंडण्यांत आल्यामुळें माझें त्रिविध स्वातंत्र्य लयाला जाऊन मी माझ्या सौभाग्यदेवतेची बंदिवान बनल्यें होत्यें. संसार हा बंदिवास आहे असें जरी मला सामान्यतः वाटत नव्हतें, तरी माझ्या एका व्यक्तीपुरता तरी तो बंदिवासच होता. मी संसारयात्रेला निघाल्यापासून अशी कोणती गोष्ट माझ्या मनाप्रमाणें घडली होती कीं, तिच्या जोरावर मीं संसारांत आनंद मानावा! संसाराची मला हौस होती; पण ती निळकंठांच्या सहवासांत संसार करायची हौस होती. त्यांच्या नांवानें कपाळीं कुंकूं लावलें असतें व गळ्यांत मंगळसूत्र बांधलें असतें, तर तीं सौभाग्याचीं भूषणें धारण करण्यांत मला अत्यंत आनंद व अभिमान वाटला असता. पण पति म्हटल्याबरोबर निळकंठांची कल्पनामूर्ति अंतश्चक्षूं-समोर उभी रहावी व चर्मचक्षूंसमोर परपुरुषाची एक निराळीच मूर्ति मीं एखाद्या घेणेकऱ्यासारखी उभ्या जन्मांत उभी असलेली पहावी; ज्यांचें नांवहि मला नको होतें, त्यांच्या नांवानें कपाळीं कुंकूं लावावें आणि जे माझे पति व्हावे अशी कल्पना उभ्या जन्मांत कधींच माझ्या मनाला शिवलीदेखील नाहीं, त्यांची कायेनें व वाचेनें पत्नी होण्याचें माझ्या कपाळीं यावें; असल्या जुलूम-जबरदस्तीनें मला संसारांत बळेंच लोटण्यांत आलें होतें. असले जुलमाचे रामराम मनाला कसे मानवतील! पण ते मनाला न मानवून तरी आतां थोडेंच चालण्यासारखें होतें!

स्वतःच्या मनाविरुद्ध कोणा पुरुषाला पति मानून त्याच्याशीं संसार करण्यांत यापुढचा सारा जन्म मला काढायचा होता. ज्यांना मीं मनानें माझें जीवन-सर्वस्व पूर्वीच अर्पण केलें होतें, त्यांना जनांत परपुरुष मानायचें माझ्या कपाळीं येऊन मनांतून परपुरुष वाटणाऱ्या नावडत्या जीवाला पतिपूजा बांधणें मला प्राप्त झालें होतें. मी त्यांना आवडल्यें म्हणून त्यांनीं मला आपल्या संसार-मंदिराचा दरवाजा देवाधर्माच्या साक्षीनें उघडून दिला. सर्वांनीं मिळून मला त्या दरवाजाच्या आंत बळेंच लोटली. ह्या उपायांनीं माझा देह त्यांचा ताबे-दार झाला. पण माझ्या मनावर माझ्या मर्जीविरुद्ध कुणाचा कसा ताबा चालणार!

आत्म्याची इच्छा म्हणजे देवाची इच्छा होय. सक्तीनें देह बंदिवान् करतां येतो; पण आत्मा त्या सक्तीला थोडाच जुमानतो ! आत्म्याला वश करायचा एकच एक अवघड मार्ग म्हणजे आराधना. देहाच्या देवालयांत आत्मा देवासारखा वसत असतो. जोंपर्यंत देव प्रसन्न झाला नाहीं, तोंपर्यंत देवालय नवसाला पावणार कसें व जोंपर्यंत आत्मा प्रसन्न झाला नाहीं, तोंवर देहाच्या धनीपणांत सुख होणार कसें ! मला माळ घालून आपली सहचारिणी करण्यांतहि माझ्या पतींनीं हीच चूक केली होती. मला त्यांनीं आपली दासी बनवून आपल्या पदीं नम्र केलें, यांत त्यांनीं स्वतःला नकळत देवाला सोडून देव्हाऱ्याला भजण्यासारखें मूढपणाचें कृत्य केलें. चांगली नवरी दिसली म्हणून त्यांनीं तिचें पाणिग्रहण केलें. मैना मंजुळ बोलते, तिच्या मंजुळ बोलांनीं आपली जन्माची करमणूक व्हावी म्हणून हौसेनें त्यांनीं तिचे पंख मोडून तिला पिंजऱ्यांत कोंडली. पण बिचारी मैना स्वतःच्या इच्छेविरुद्ध बंदिवान झाली म्हणूनच बोलेनाशी झाली ! परंतु ही मनांतली मनकवडी दुनिया जर मीं जनांत दाखवली असती, तर माझ्या मनोराज्यांत मलाच बंडखोर ठरवून भयंकर शासन करायला कुणीं कमी केलें नसतें.

याच कारणांमुळें मी निळकंठांना रस्त्यांत उभे असलेले पाहूनहि त्यांच्याशीं बोलल्यें नाहीं. योगायोगामुळें स्वतःच्या इच्छेविरुद्ध पातिव्रत्याचें असिधाराव्रत पाळणें माझ्या कपाळीं आलें असल्यामुळें त्या व्रतपालनांत निळकंठांच्या ओझरत्या सहवासानेंहि भयंकर बखेडे उत्पन्न होतील असें मला भय वाटत असल्यानें मी निळकंठांशीं बोलण्याचें, त्यांच्याकडे पहाण्याचें व शक्य तर त्यांची आठवण करण्याचें देखील धाडस करायला तयार नव्हत्यें. इतकेंच काय; पण लग्नाच्या बंधनानें पातिव्रत्याची जी नवी जबाबदारी माझ्या शिरावर येऊन पडली होती, ती यथावत् पार पाडून पतिव्रताधर्म साजरा करण्यासाठीं माझ्या हृदयसिंहासनावरून निळकंठांना स्थानभ्रष्ट करून त्यांच्या जागीं माझ्या पतिदेवतेची स्थापना करणें मला प्राप्त झालें होतें. माझ्या मनोराज्यांतून एकदम हद्दपार होण्याची अशी कठोर शिक्षा मी निळकंठांना कां फर्मावीत होत्यें, हें न सांगण्यांतच आम्हां सर्वांचा थोरपणा आहे. ह्या शिक्षेला पात्र ठरलेला आरोपी जर का समोर आला, तर तो तेव्हांच एखाद्या जादूगाराप्रमाणें मला गुंगवील व माझ्या मनोराज्यासह मला जिंकून आपल्या चरणांची दासी करून

सोडील, ही भविष्यकाळीं माझ्या वांट्याला येणारी विटंबना मला अगोदरच कळून चुकली होती. ही विटंबना टाळण्यासाठीं मीं निळकंठांना प्रत्यक्ष भेटल्यावरहि त्यांच्याशीं बोलण्याची बळेंच टाळाटाळी केली.

मी बोलल्यें नाहीं, तेव्हां निळकंठ खालच्या मानेनें पुढें चालते झालेले पाहून माझें मनच मला खाऊं लागलें कीं, मनोरमा आपल्याशीं बेइमान झाली असा माझ्या अबोल्याचा विपरित अर्थ तर निळकंठ करणार नाहींत ना ! ही मनांतली शंका फेडून घेण्यासाठीं मी कणारांगोळी आटोपून तशीच यमुनेकडे गेल्यें, तों निळकंठ नुकतेच आपल्याला भेटून गेल्याचें यमुनेनें मला सांगितलें. यापुढें माधवराव व नलिनी यांना भेटायला तरी निळकंठ खास जाणार अशी माझी खात्री होती. पण निळकंठांचा मी असा घरोघर शोध करीत हिंडणें वृथा लोकापवादाला कारण झालें असतें या भयानें मी तशीच माघारी आल्यें.

दोन प्रहरीं आमचें मेहुण मामांच्या घरीं जेवायला बोलावण्यांत आलें होतें. तिथें जेवतां जेवतां गोष्टी निघाल्या तेव्हां तिथें झालेला सर्व प्रकार मला समजून आला. आमचीं जेवणें आटोपतात न आटोपतात, तोंच कमलाकरांवर ओढवलेल्या दारुण प्रसंगाची बातमी आम्हांला कळली. कमलाकर हे आमच्या मित्रमंडळींतील एक होतकरू तरुण तर होतेच; पण शिवाय माझ्या पतींची व त्यांची जीवश्च कण्ठश्च मैत्री होती. कमलाकरांची पत्नी विमला तर मला माझ्या वडील बहिणीसारखी प्रिय वाटे. माझ्या लग्नापूर्वी सारे आठ दिवस विमला बाळंत झाली, तिला मुलगा झाला, आम्ही सर्वांनीं त्याला पाहून त्याचें कौतुक केलें, व विमलेची थट्टा करून पेढेहि खाल्ले. पण पुढें बाराव्या दिवशीं तो मुलगा मृत्युमुखीं पडला, व त्याच्या मागोमाग आज विमलेचा हा असा काळ ओढवला. दैवी आपत्तींचा एकाएकीं असा कळस झाल्यामुळें दुःखभारानें चुरून गेलेल्या कमलाकरांचें शांतवन करण्यासाठीं मीं माधवरावांना बरोबर घेऊन कमलाकरांच्या घरीं गेल्यें, तेव्हां बोलतां बोलतां कमलाकर सहज ओघानें बोलून गेले, " मनूताई, तूं व विमला ह्या दोघी मैत्रिणींनीं आम्हां दोघां मित्रांचे दावे साधलेत. "

मीं विचारलें, " ते कसे हो ? "

कमलाकर उत्तरले, "विमलेनें संसाराच्या ऐन रंगांत मरून माझा दावा साधला व तूं संसाराच्या ऐन रंगांत निळकंठाचा आशाभंग करून त्याला राखेंत बसवलेंस."

मी यावर कांहींच बोलल्यें नाहीं. कारण जी खरोखर वस्तुस्थिति होती, तीच कमलाकर बोलून दाखवीत होते. तिच्यांत कडूपणा असला तरी खरेपणाहि होता.

माधवरावांनीं मध्येंच कमलाकरांना विचारलें, " कमलाकर, आज निळकंठ तुला भेटला होता का ? "

कमलाकर उत्तरले, " होय. ॐकारेश्वरावर तो खिन्न मुद्रेनें विचार करीत बसलेला मीं त्याला पाहिला. "

" तो तुझ्याशीं कांहीं बोलला का ? " माधवरावांनीं विचालें.

" नाहीं. माझ्या कर्मभोगांत मी गुरफटलें होतों; तो माझ्याशीं बोलणार कोठून ! पण त्याच्या एकंदर लक्षणांवरून मीं ओळखलें कीं, माझ्याच जोडीचा हा दुसरा अभागी बाईलवेडा जीव आहे. "

निळकंठांचा तपास एकदांचा असा लागला. त्यांची एकवार भेट घ्यावी म्हणून मीं माधवरावांना बरोबर घेतलें, यमुना व नलिनी यांनाहि बोलावलें व सर्वजणें ॐकारेश्वरावर गेलों. एकदां वाटलें कीं, आपल्या घरींच त्यांना बोलवावें. पण त्यांत त्यांना मरणापेक्षांहि थोर अपमान वाटला असता. अपमानानें आधींच गांजलेल्या त्या जीवाच्या दुःखावर आपण डागण्या कां द्या !

* * * *

मी बसायला सांगितल्यावर निळकंठांच्यानें माझा शब्द मोडवला नाहीं. ते खालीं बसले. पण जणूं काय आपण एखाद्या अनोळखी अशा परक्या स्त्रीसमोर बसतों आहों, अशा आपपर भावानें आंग चोरून ते दूर बसले. त्यांनीं माझ्याकडे एकवार पाहिलें; पण लगेच खालीं मान घातली. नेहमीं मला पहातांच त्यांचें मुखमंडल प्रसन्न होऊन सदाफुलीसारखें फुले; पण आज तें कोमेजून गेलें. नेहमीं आम्ही एकमेकांना भेटलों कीं खुल्या दिलाची दुनिया आमच्यासभोंवार निर्माण होई, व त्या दुनियेंत आम्ही ऋणानुबंधी जीव आनंदीआनंद करीत असूं. ते आनंदाचे दिवस जाऊन आमच्या वाङ्निश्चयाच्या वाताहातीबरोबर दुःखाचे दिवस उजाडले, तरीहि आम्हीं खुल्या दिलानें दुःख भोगलें. एकमेकांचीं अंतःकरणें एकमेकांना साक्षी ठेवून आनंद भोगला काय किंवा दुःख भोगलें काय, दोहोंतहि आनंदच असतो. पण निळकंठांच्या दिलींची ती खुल्या दिलाची दुनिया आज पार करपून गेलेली दिसली, व नेहमींचा आपलेपणा विसरून ते आज परके पाहुणे बनले.

मीं निळकंठांना विचारलें,"निळकंठ,आज आपण असे परक्यासारखे कां वागतां? इतका परकेपणा आपल्या आंगीं असलेला मीं आजवर कधींच पाहिला नाहीं."

निळकंठ खालच्या मानेनेंच उत्तरले, " याचें कारण आजवर स्वतंत्र असणारी मनोरमा आज परदारा झाली आहे. जुन्या ओळखी आठवाव्या तर त्या अंतःकरणाला आग लावून रक्ताची आटाआट करतात."

निळकंठ बोलले तें अक्षरशः खरें होतें. प्रयत्न अपेशी ठरल्यामुळें मांडीशीं मरून पडलेल्या मनोवासनांची आठवण करणें म्हणजे भुताटकीच्या बाजारांत वावरणें होय, असाच निळकंठांप्रमाणें माझाहि अनुभव होता. मीं निळकंठांना विचारलें, "म्हणूनच आपण सकाळीं मला भेटल्याशिवाय परस्पर चालते झालां वाटतें!"

" माझ्याशीं सुद्धां ते फार वेळ बोलले नाहींत. चार शब्द बोलून एकाएकीं तांतडीनें निघून गेले." यमुना मध्येंच म्हणाली.

" आमच्याशीं सुद्धां तो मनमोकळेपणानें बोलेना. नीरजाकाकूंनीं व रावसाहेबांनीं त्याला जेवायला राह्यचा आग्रह केला, तोहि त्यानें मानला नाहीं. माधवराव इतके जिवाचे जिवलग; पण त्यांच्या शब्दालाहि त्यानें निष्ठुरपणानें मान दिला नाहीं." यमुनेमागोमाग नालिनी करुणस्वरानें म्हणाली.

निळकंठ करपलेल्या अंतःकरणांतून निघणाऱ्या शांत स्वरानें उद्गारले, " नालिनी, मी निष्ठुर होऊं नको तर काय करूं? दगडाशीं टक्कर देण्याचा प्रसंग आला, कीं डोकें दगडाचें करावें लागतें, व प्रतिकूल परिस्थिति प्राप्त झाली, कीं तिचे आघात सोसण्यासाठीं मन कठीण बनवावें लागतें. आपल्या साऱ्या आशा, इच्छा व महत्त्वाकांक्षा आपल्याच मांडीवर मरून पडल्या, म्हणजे विवेकवाणीनें त्यांना विस्मृतीच्या वणव्यांत जाळतांना अंतःकरणाचें वितळून वितळून कसें पाणी होतें, याचा अनुभव कुणाला सांगून समजायचा नाहीं." लगेच निळकंठ माझ्याकडे वळून म्हणाले, " मनोरमे, प्रतिकूल परिस्थितीवर विजय मिळवून वर येऊं पाहणाऱ्या माझ्यासारख्या कष्टाळू व उद्योन्मुख तरुणाची संसारसुखाविषयींची आशा म्हणजे देवानें एखाद्या भरतवांझेला नवांनवसांनीं दिलेलें अपत्य होय. त्या माझ्या अपत्याच्या नरडीवर काळानें असा अकालीं पाय दिलेला पाहून माझ्या मनाला काय वाटत असेल याची तुला कांहींशी कल्पना करतां येईल. ह्या दुःखानें गांजलेला अभागी जीव मी; न जाणो, तुमच्या निकट सहवासाला मी थोडा वेळ राहिलों तरी माझ्या

दुःखी जीविताची छाया तुमच्या सुखी जीवितावर उमटून कदाचित् तुमच्या सुखाचीहि माती व्हायची ! ”

“ एवढ्याचसाठीं सकाळीं आपण माझ्याशीं बोलल्याशिवाय पुढें गेलां वाटतें ! ” मीं पुन्हां विचारलें.

“ होय. ” निळकंठ उत्तरले.

“ पण इतका विकल्प आपल्या मनांत आला तरी कसा ? ” मीं विचारलें. निळकंठांच्या अंतःकरणांत घोळत असलेल्या विचारांविषयीं माझा जो अंदाज होता, तो मला या निमित्तानें पडताळून पहावयाचा होता.

“ विकल्प आला ह्याचें कारण, ” निळकंठ म्हणाले, “ मनोरमे, पूर्वींचीं सारीं नातीं विसरून जाऊन सोंवळ्या नजरेनें मला तुझ्याकडे अजून पहातां येत नाहीं. तशांत तुझामाझा पूर्वींचा संबंध तुझ्या पतीला ऐकून माहीत असला व त्यानें तुला माझ्याशीं बोलतांना पाहिलें, तर त्याचें मन काय म्हणेल याचा काय नेम सांगावा ! न जाणो, आपल्या चार मनमोकळ्या शब्दांसाठीं तुझा पति व तुझ्या सासूबाई यांनीं सासुरवासाची खडतर सृष्टि तुझ्यासभोंवार रचून तुला जाच केला तर ! ”

निळकंठ म्हणाले तें अक्षरशः खरें होतें. त्यांच्या माझ्या स्नेहसंबंधानेंच सासुरवासाला जाचाचा मोड फुटेल असें भय बाळगण्याला मला पुष्कळच जागा होती. सकाळीं निळकंठ सहज रस्त्यानें चालले असतांना मी सहज रांगोळीची वाटी हातीं घेऊन आंगणांत गेल्यें, तें माझ्या नणंदेनें—गोदूवन्सांनीं पाहून तेंव्हांच सासुबाईंना जाऊन सांगितलें, त्याबरोबर सासुबाईंना संशयाच्या पिशाच्च्याची बाधा होऊन त्यांनीं मला आंत हांक मारली. यापूर्वींहि मी एक दोन वेळां परिचयाच्या माणसांना निळकंठांचें कुशलवृत्त विचारलेलें ऐकून ‘ निळकंठांचा व तुझा इतका दाट परिचय ग केंव्हांचा, ’ असा खोंचदार प्रश्न मला विचारून त्यांनीं माझ्या अंतःकरणाला जखम केली होती. माझ्या पतींच्या मनांतसुद्धां माझ्या वर्तनाविषयींच्या संशयाचें जहर सळसळत होतें, व तें मला आज बाधलें नाहीं तरी पुढेंमागें त्या जहरापायीं माझा जीव जायबंदी होणार कीं काय, हा भीतिदायक विचार माझ्या मनांत कायमचें घर करून बसला होता. असल्या संशयांना डेळेफांटे फुटून पराचे पारवे व राईचे पर्वत कसे होतात, याचीं अनेक उदाहरणें मी नित्यशः डोळ्यांदेखत

पहात होत्यें. ही आपत्ति टाळणें मला जेवढें शक्य होतें, तेवढें मी करीत होत्यें. निळकंठांचे व माझे लग्नापूर्वीचे संबंध कितीहि जिव्हाळ्याचे असोत, त्या संबंधांना आतां आपल्या संसारांत मुळींच वावरूं द्यावयाचें नाहीं, असा मीं लग्नघटकेपासून मनाचा धडा केला होता. लग्न लागल्या दिवसापासून पतिव्रता-धर्माची कर्तव्यपरंपरा माझ्या वांट्याला आली होती, व तें कर्तव्य बजावण्यांत थोडीदेखील कसूर करण्याची माझी इच्छा नव्हती. मनोरमा व निळकंठ हीं एकमेकांचीं दिलप्यारीं होतीं; होय! गोष्ट खरी; पण कौमार्यांतील एकदिलाच्या त्या साऱ्या आठवणी मी केव्हांच देवापायीं वाहून मोकळी झाल्यें होत्यें. लग्नमंडपांत ब्रह्मवृंदांच्या तोंडून 'शुभमंगल सावधान' हे शब्द मीं ऐकले, तेव्हांच मनोनिग्रह करून स्वतःच्या मनाशीं खूणगांठ मारली कीं, निळकंठांची आवडती मनोरमा ह्या क्षणाला ठार मेली, आणि तिच्या चितेंतून नवी मनो-रमा निर्माण होऊन वराला माळ घालण्यासाठीं वेदीवर येऊन उभी राहिली. ह्या नव्या मनोरमेला आतां पूर्वीच्या नात्यांतील निळकंठांची ओळख कशी असावी! आतां पूर्वीच्या प्रेमाच्या ओळखी आठवणीनें अशा नेमक्या विसरतां येतात कीं काय, हा एक प्रश्न आहे. पण त्यांत काय आहे! कर्तव्याची तीव्र जाणीव मनुष्याला काय करायला शिकवीत नाहीं! द्रौपदीदेवी पांच पतींची सहधर्मिणी होऊन व निरनिराळ्या पांच वेळीं एकेका पतीचें शय्यासौंदर्य वाढ-वूनहि आपला पतिव्रताधर्म अढळ राखूं शकली, ती कर्तव्याच्या तीव्र जाणि-वेमुळेंच! गुर्वाज्ञेनुसार एकदां निश्चित झालेली एका पतीची सेवा पार पाडतांच द्रौपदीदेवी अग्निदिव्य करून पवित्र कुमारिका बने व नव्या पतीच्या सेवेंत नव्यानें रुजू होई. पतिपत्नींच्या प्रत्यक्ष आचरणानें देहाला लागलेला डाग सुद्धां जर द्रौपदीदेवीला कर्तव्यपालनाच्या खडतर तपश्चर्येनें धुवून काढतां येई, तर मनानें मानलेल्या पतीशीं मनानें जोडलेल्या कल्पनामय नात्यानें माझ्या चारित्र्याला चिकटलेलें पाप मला मनोनिग्रहाच्या दिव्यानें कां धुवून काढतां येऊं नये! हा मनोनिग्रह अर्थात् ह्या एका जन्मापुरताच होता. आईबापांनीं पति पाहून दिला, तो मनाला येवो किंवा न येवो, त्याच्याशीं मी विश्वासानें व पतिव्रता-धर्मानें वागेन अशी मी विवाहप्रसंगीं अग्निब्राह्मणांसमक्ष शपथ घेतली होती. ह्या विवाहांतील शपथा अनेक वधूवरें विवाहानंतर मोडण्याचें पातक करून मनाचें प्रिय करतात, पण हें अधर्माचरण हातून घडल्यामुळें

तीं नरकाचे वारस होतात. आईबापांची मुर्वत राखण्यासाठीं अग्निब्राह्मणांसमक्ष घेतलेली ही शपथ मोडण्याचें पातक कदाचित् मला करावेंसें वाटलें असतें; नाहीं म्हणून तरी कुणीं सांगावें! तसें मीं केलें असतें तर मग जगहि मला दोषी म्हणालें असतें. पण ज्या जगानें माझ्या आवडीनिवडींची पर्वा न करतां कोणा तरी पुरुषाच्या नांवानें माझ्या मानेला मंगळसूत्राचा फांस अडकवला, त्या जगासमोर जबरदस्तीनें घेतलेल्या आणाशपथा मीं तरी कां मोडूं नयेत! पतिसेवेच्या अनेक शपथा मी पतींसमोर घेतल्या व त्यांची सहधर्मिणी झाल्यें, तेव्हांच त्यांनीं मला आपल्या धर्मार्थकाममोक्षाची भागीदारीण केलें हें खरें; पण हा सारा जुल्माचा रामराम झाला. माझें मत घेतल्याशिवाय माझ्या पतींनीं मला माळ घातली. त्यांना बायको म्हणजे गोठ्यांतली एखादी गाय-म्हैस वाटली कीं काय, नकळे. त्यांनीं माझ्या आवडीनिवडींचा विचार न करतां आपलें नवरे-पण माझ्यावर लादलें. आतां, त्यांनीं ढीग केलें तरी मीं तें कां ऐकावें, हा प्रश्न शिल्लक रहातो. पण मी अभागिनी एका हिंदु बापाची हिंदु कन्या होत्यें, व माझ्या मानेला दोरी लावून माझे वडील ज्या गुराख्याच्या दारीं मला नेऊन बांधतील, त्याच्या गोठ्यांत बंदिवान् होऊन रहाणें हेंच माझ्या नशीबीं होतें. बाबांनीं माझें लग्न ठरवतांना माझें मत घेतलें असतें तर मी माझ्या ह्या पतींच्या नांवानें बाटून बळेंच सौभाग्यवती होण्याचा साफ इनकार केला असता. पण माझें मत कुणींच घेतलें नाहीं, कीं माझ्या इच्छेचा विचारहि कुणीं केला नाहीं. मला तेव्हां अतिशय वाईट वाटलें. आम्हां हिंदु कुमारिकांची स्थिति गुलामां-सारखी केंविलवाणी आहे असेंहि मला तेव्हां वाटलें. गुलामांना स्वतंत्र इच्छा नसते तशीच आम्हांलाहि स्वतंत्र इच्छा नाहीं. नशिबीं जो धनी येईल, त्याची सेवा करण्याची जन्मठेपेची शिक्षा जशी गुलामाच्या वांटणीला येते, तशीच नशिबावर हवाला ठेवून जो पति वांट्याला येईल त्याच्या संसारांत त्याची बाईल म्हणून राबण्याची जन्मठेपेची शिक्षा आमच्या वांट्याला येते. अशा जुलूम-जबरदस्तीनें ज्यांचें बाईलपण माझ्या वांट्याला आलें होतें, त्यांच्या संसाराचा मांडव करून त्यांच्या सुखसर्वस्वाची होळी मला सहज करतां आली असती. गृहिणी ही पतीच्या गडगंज संसाराला सुशोभित करणारी लक्ष्मी असते. ती लक्ष्मी प्रसन्न होईनाशी झाल्यावर पतीचा संसार तरी साजरा होणार कसा व पतीला सुख तरी लाभणार कसें!

हे सारे राक्षसी विचार हुबेहूब आचरणांत आणून मीं माझ्या पतींना दो-धार्यी ढळढळां रडवलें असतें. त्यांच्या नांवानें कुंकूं लावून मीं माझ्या सुखसर्व-स्वावर केव्हांच निखारे ठेवले होते; त्याच निखाऱ्यांनीं त्यांच्या सुखसर्वस्वाची होळी करणें मला जड गेलें नसतें. किंबहुना सुडाच्या भावनेनें प्रेरित होऊन मीं तसेंहि केलें असतें. त्या वेळीं मग जग काय म्हणेल, आईबाप काय म्हणतील, ज्यांनीं अग्निब्राह्मणांसमक्ष माझें पाणिग्रहण केलें ते माझे पति काय म्हणतील, या भयानें मी माझ्या साहसापासून जरादेखील ढळल्यें नसत्यें. पण नव्या सासरीं मी योग्य रीतीनें वागेन, आईबापांनीं माझ्यासाठीं निवडलेल्या सौभाग्यदेवतेची मी पतिव्रताधर्माला जागून सेवा करीन, व माझ्या सर्व आप्त-स्वकीयांना सुख होईल अशा स्वार्थत्यागी वृत्तीनें मी ह्या जन्मापुरती संसाराची तपश्चर्या करीन, असें वचन मी निळकंठांना देऊन चुकल्यें होत्यें. त्या वचनाला बाध येईल असलें अश्लाघ्य वर्तन माझ्या हातून होणें शोभलें नसतें. कारण, पुनर्जन्माचें रहस्य मला निळकंठांच्या सहवासांतच कळूं लागलें होतें. तें असें कीं, ह्या जन्मीं आपल्या इच्छेविरुद्ध देहबंध आपल्या वांट्याला आले, तरी देह नाशवंत असल्यानें असल्या बंधनांपासून आत्मा सदा अलिप्त असतो, व तीव्र इच्छाशक्तीच्या जोरावर कुणाहि जीवाला आपल्या एका जन्मीं अतृप्त राहिलेल्या मनीषा पुढच्या जन्मीं पूर्ण करून घेतां येतात. निळकंठांचें अर्धांगीपद मला मिळावें अशी माझी मनीषा होती, व मी आपली सहचारिणी व्हावें अशी निळकंठांची मनीषा होती. ही मनीषा आम्ही पुढच्या जन्मीं पुरवून घेणार होतोंच. ही सिद्धि पुढच्या जन्मीं आपणाला अनायासें प्राप्त व्हावी म्हणून विधिघटनेप्रमाणें प्राप्त झालेल्या पतीचा संसार करायला मी निळ-कंठांशीं वचनबद्ध झाल्यें होत्यें; ह्या एका—फक्त एकाच आशेच्या आधारावर उभा जन्म साजरा करायचें ठरल्यावर प्राप्त झालेल्या परिस्थितीविरुद्ध कुरकुर करण्याचें काय कारण! इतका मनोनिग्रह मी करूं शकल्यें; पण निळकंठांच्यानें तेवढेंहि होईना, म्हणूनच ते माझ्यासमोर उभे असतांना त्यांच्या मनोवृत्ति थरारून येत असाव्या असें मला वाटलें. मी त्यांना म्हणाल्यें, " निळकंठ, बायकोसारखी बायको मीसुद्धां परिस्थितीच्या कोंड्याऱ्यांतहि डगमगत नाहीं, आणि आपण असे डगमगतां!"

" ह्या परिस्थितीचा परिणाम तुझ्या मनावर कांहींच होत नाहीं ? "

निळकंठांनी आश्चर्यचकित स्वरानें विचारलें, " खरें सांग, मनोरमे, ह्या परि-स्थितीनें तुझें मन भेदरून जात नाहीं ? "

" नाहीं. " मी उत्तरल्यें, " निळकंठ, आपल्या उपदेशाचा अमृतकुंभ पिऊनच माझें मनोधैर्य वाढीला लागलें आहे. आपली उपदेशवाणी मी माझ्या अंतःकरणावर वज्राच्या अक्षरांनीं कोरून ठेवली आहे. आपणच मला सांगितलें कीं, आईबापांनीं पाहून दिलेल्या पतीचा संसार मीं सुखाचा करायचा; –करायचा. आपणच मला सांगितलें कीं, आपलामाझा प्रेमाचा संबंध मीं ह्या जन्मापुरता तरी विसरायचा;–विसरायचा. पुढच्या जन्मीं मनासारखा संसार व मनासारखी सौभाग्याची जोड वांट्याला यावी, ही पुण्याई जोडण्यासाठीं हा एक जन्म तपश्चर्येंत घालवायचा असें एकवार ठरल्यावर दुःखाच्या जाणिवेनें भेदरून जाण्याचें तरी काय कारण ? "

निळकंठ पुन्हां बराच वेळ स्तब्ध होते. ते कां बोलेनात हेंच मला कळेना. पण ते जरी बोलले नाहींत, तरी त्यांच्या चेहऱ्यावर, विशेषतः त्यांच्या भालप्रदेशावर चिंतेच्या विचारांचें जाळें विणलें जात होतें, तें मला स्पष्ट दिसत होतें. निळकंठांच्या अंतःकरणांतील विचारांचें किंवा विकारांचें प्रतिबिंब त्यांच्या चेहऱ्यावर उमटलेलें ओळखण्यांत माझ्याप्रमाणेंच यमुनाहि तरबेज झाली होती. ती कांहीं न बोलतांच सर्व गोष्टी समजून चुकली, व विधिघटने-पुढें आपणां साऱ्या जीवांची धडपड फुकट आहे, अशा भावनेनें मजकडे पाहूं लागली.

मी पुन्हां निळकंठांना म्हणाल्यें, " निळकंठ, तुम्ही इतके कष्टी कां होतां, तेंच मला कळत नाहीं."

" तें कळत नाहीं, हें एका अर्थी बरें आहे. " असें म्हणून निळकंठांनी एक दीर्घ उसासा सोडला. अशा विमनस्क स्थितींत थोडा वेळ थांबून ते म्हणाले, " असो; आतां ह्या सर्व गोष्टी आपण विसराव्या हेंच बरें. "

निळकंठ आणखी कांहीं बोलतात कीं काय, हें पाहण्यासाठीं आम्ही सर्व स्तब्ध बसलों होतों. पण ते आपले कांहींच न बोलतां मुकाट्यानें उठून चालूं लागले. मीं विचारलें, " कुठें चाललां ? "

निळकंठ जातां जातां मागें वळून मावळत्या सूर्याकडे बोट दाखवून उद्गारले, " तो पहा सूर्य मावळायला चालला. "

" कामबीम, कांहीं नाहीं. माझ्या हातून तुमचें कोणतेंच काम होण्यासारखें नाहीं. तुम्ही आल्या वाटेनें कृपा करून निघून जा कसे ! " मी उत्तरल्यें.

माझ्या शब्दांवर माधवराव कांहींसें बोलणार होते. पण त्यापूर्वींच मीं त्यांना हात जोडून सांगितलें, "माधवराव, तुम्हीआम्ही एके ठिकाणीं बसून बोलल्लों चालल्लों तर लोकांच्या मनांत निरनिराळे विकल्प येतात, यासाठीं तुम्ही आतां जा, आणि पुन्हां मला भेटायला येण्याची तसदी घेऊं नका. मी तुमची जीवा-भावाची मैत्रीण आहें खरी; पण त्या साऱ्या गोष्टी आतां विसरा. तुमची मैत्रीण मनोरमा लग्न होऊन सासरीं गेली तेंव्हांच मेली असें समजा व वाटेला लागा. "

" मनोरमे, तुझा नूर आज एकाएकीं असा कसा पालटला ? " माधव-रावांनीं आश्चर्यचकित होऊन मला विचारलें.

मी उत्तरल्यें, " माधवराव, मी आतां परदारा झाल्यें आहें. माझ्या पतींचें प्रिय करणें हाच माझा पतिव्रतेचा धर्म आहे. यांत काय तें समजा व कृपा करून इथून निघून जा. "

मीं इतकें सांगितल्यावर माधवराव खिन्न मनानें मागें परतले. त्यांच्या मना-वर माझ्या कठोर वाणीनें खोल जखमा झाल्या असाव्या, असें मला वाटलें. पण त्याला इलाज काय ! आम्ही ऋणानुबंधी मित्रमैत्रिणी असलों तरी माझें जीवित माझ्या पतींनीं पतीच्या नात्यानें विकत घेतल्या दिवसापासून माझा स्वभाव ही त्यांच्या हातांतील एक तरवार शोभूं लागली होती. ती तरवार त्यांनीं ज्याच्या-वर वारावी, त्याला तिचा वार लागणार हें उघडच होतें. त्यांनीं ती पहिल्यानें माझ्या मित्रमंडळीवरच उगारली, हें त्यांचें आणि माझें नशीब ! माझ्या तुसड्या बोलांनीं माधवराव खट्टू होऊन जाऊं लागले तेव्हां मीं त्यांना पुन्हां एकवार हांक मारून बजावलें, " माधवराव, माझ्या शब्दांनीं तुमच्या अंतःकरणाला जखमा केल्या असतील तर त्याबद्दल मला क्षमा करा बरें ! मी तुमची एक दुबळी बहीण आहें. पतिदेवतेचा दुराग्रह संभाळून पतिसेवेचें व्रत सांग करण्यासाठीं जिव्हाळ्याच्या मित्रमंडळीच्या जिवाला झोंबेल असें कठोर वर्तन मला करावें लागतें, त्याला माझा नाइलाज आहे. "

" पण मनोरमे, असा कसा तुझ्या पतीचा लहरी स्वभाव तरी ? " माधव-रावांनीं मला विचारलें.

माधवरावांचें हें धाडस मला आवडलें नाहीं. माझे पति कसे असले तरी ते

मला लखलाभ ! माझ्या तोंडावर त्यांची निंदा केलेली मीं कशी बरें ऐकून घ्यावी ! माधवराव माझे मित्र खरे; पण माझ्या पतींना नांवें ठेवणारे ते कसले माझे मित्र ! मीं माधवरावांना सांगितलें, " माधवराव, जरा तोंड संभाळून बोला. माझ्या तोंडावर माझ्या पतींची निंदा तुम्ही केलीत तर ती मी ऐकून घ्यायची नाहीं. तुम्ही आज आमच्या घरीं एवढ्याचसाठीं आलां वाटतें ! तुम्ही कृपा करून बऱ्या बोलानें निघून जा कसे ! "

" मी एवढेंच तुला सांगायला आलों होतों कीं, तुझ्या पायीं बाईलवेडा बनून निळकंठ देशोधडीला लागला;—तुझ्या पायीं त्याच्या सर्व महत्त्वाकांक्षांची माती झाली. तुझ्या पायीं ही आपली मायभूमि एका पराक्रमी तरुणाच्या कर्तबगारीला मुकली. आम्हां सर्वांना सोडून निळकंठ अज्ञातवासी बनला, या पापाची मनोरमे, तूं धनीण आहेस—"

मीं माधवरावांचा हा आक्षेप देवापायीं वाहून देवाची मनोमन प्रार्थना केली, " हे भगवान् ! माझ्या पायीं निळकंठांना जडलेलें हें बाईलवेड लौकर सुटो व मायभूमीच्या सेवेसाठीं त्यांच्या आंगीं नवचैतन्याचा संचार होवो. "

निळकंठांच्या कल्याणासाठीं जन्मभर दिलाचा दिलरुबा असा परोपरीनें छेडून देवाला आळविण्याशिवाय त्यांचें मंगल करण्याचें दुसरें कोणतें साधन माझ्या हातीं होतें ! आणि ह्या एकंदर प्रकाराबद्दल मन झुरवून तरी काय फायदा ! हें असें चालायचेंच. नेहमीं सत्यानें चालणाऱ्या माणसाच्या संकटें हात धुवून पाठीला लागायचीं, ही जगाची रीतच आहे.

माझी शोकाकुल अवस्था पाहून पुन्हां माधवराव मला म्हणाले, " मनोरमे, तुझी परिस्थिति मी जाणतों—"

" मग कां बरें माझा असा छळ करतां ? उभ्या जन्मांत तुम्हांला किंवा कुणालाच मी टाकून बोलल्यें नाहीं, असले कडू शब्द माझ्या तोंडानें कां बरें वदवतां ? मी तुमची मैत्रीण म्हणून तुम्ही मला भेटायला आलां असाल;— मला माहीत आहे. पण माधवराव ती मनोरमा मेली. तुमची ती मैत्रीण रसातळाला गेली आणि ह्या घरीं उभ्या जन्माच्या वचनचिठीनें एका पुरुषाची पडदानशीन गुलामगिरी भोगणारी अभागी कमला तेवढी बाकी उरली. जा तुम्ही. " मी उत्तरल्यें.

" असें जर आहे, तर मी जातों. " माधवराव म्हणाले, " मग आपणां सर्वांच्या ऋणानुबंधाच्या गांठी इथेंच तुटल्या म्हणायच्या ! "

" हो इथेंच तुटल्या. आपल्या ऋणानुबंधाच्या गांठी खरेंच इथें तुटल्या–" मी तोंडचें वाक्य पुरें केलें नाहीं, तोंच सासूबाईनीं मला घरांत हांक मारली, " कमले ! "

" दयालोभ ठेवा अधिकउणें बोलल्यें त्याची क्षमा करा,—मी घरांत जात्यें. सासूबाई मला बोलवीत आहेत. " असें म्हणून मी लगबगीनें घरांत गेल्यें. माधवरावहि खट्टू मनानें आपल्या वाटेनें निघून गेले. अखेर माधवरावांचें माझ्याशीं काय काम होतें तें कांहीं मला नीटसें कळलें नाहीं. मी मुद्दामच तें कानांवर घेतलें नाहीं. कारण, त्यांच्याशीं मी संबंधच ठेवूं नये अशी माझ्या पतींची इच्छा होती, व त्यांच्याशीं कसल्याहि कामापुरता संबंध आणल्यानें पतीचें अप्रिय केल्याच्या पापाचें धनीपण मजकडे आलें असतें. एकट्या माधवरावांचीच गोष्ट कशाला; साऱ्या जगाशींच मीं अशा परकेपणानें वागण्याचा मनाचा धडा केला होता. जर मी निळकंठांची सहचारिणी झाल्यें असत्यें, तर विश्वबंधुत्वाच्या महान् तत्त्वाप्रमाणें यथामति वागून त्यांच्या बरोबरीनें हा देह मला जनसेवेंत चंदनाप्रमाणें झिजवावा लागला असता; तेव्हां मग माधवरावांसारख्या कार्यकर्त्या मित्रांशीं मैत्री राखणें शोभलें असतें. पण आतां त्याचें काय ! आमच्या आयुष्यांत आम्हीं लोकसेवेचे मनोरथ रचले, पण ते मूर्त स्वरूपाला येण्याच्या पूर्वीच त्यांचा असा चक्काचूर झाला ! चार मित्रमैत्रिणींनीं एकमतानें मायदेशाचें मंगल करण्यासाठीं झटण्याचा पण करून कल्पनेच्या पायावर भावी कर्तव्याच्या ज्या उंच उंच हवेल्या उठवल्या, त्यांची पूर्तता होऊन प्रत्यक्ष कार्याच्या मुहूर्तानें त्यांची वास्तुशांति होण्यापूर्वीच त्यांची जळून राखरांगोळी झाली. निळकंठांची ही दशा; अनंतांची ती दशा ! माझ्या कपाळीं हा असा अज्ञातवास आला ! मला वाटतें, विराटाच्या घरीं सैरंध्रीला भोगावा लागलेला अज्ञातवास देखील इतका दारुण नव्हता. कारण, त्याला झाली तरी सीमा होती, व शिवाय तेव्हां सैरंध्रीच्या सभोंवार भीमार्जुनांसारखे पांच पति तिचे पाठीराखे होते !—पण जाऊंद्या !

मी घरांत गेल्यावर सासूबाई म्हणाल्या, " कमले आज संकष्टी आहे; देवांच्या पूजेसाठीं शेजारच्या बागेंतून फुलें तोडून आण जा पाहूं. "

सासूबाईच्या आज्ञेप्रमाणें मी शेजारच्या बागेंत फुलें तोडायला गेल्यें, तेव्हां यमुनाहि फुलें तोडायला आलेली मला भेटली. आम्ही दोघी सासरच्या पक्क्या

बंदिवान झाल्यापासून आम्हांला एकांत असा आज पहिल्यान्दांच मिळाला. मीं माझ्या सुखदुःखाच्या गोष्टी यमुनेला सांगितल्या व यमुनेनें आपल्या मला सांगितल्या. त्यावरून मला कळून आलें कीं, माझ्या सासूबाईनीं व पतींनीं जसा ॐकारेश्वरावरच्या भेटीचा विपर्यास केला, तसाच यमुनेच्या पतीनेंहि विपर्यास केला होता. मीं यमुनेला म्हटलें, " पण यमू, तुझ्या सासूबाईपाशीं ही चहाडी ग कुणीं केली ? "

" तुझ्या सासूबाईनीं, " यमुना उत्तरली.

" मग तुझे यजमान तुझ्यावर फार रागावले असतील ! " मीं विचारलें.

" नुसतेंच रागावायचें झालें नाहीं; त्या रागाच्या भरांत मला निक्षून सांगायचें झालें कीं, पुन्हां जर तुझे असले चवचाल चोंचले माझ्या नजरेला आले तर पुन्हां तुझें तोंड देखील पाहायचा नाहीं; तुला माहेरीं कुजत ठेवून दुसरें लग्न करीन,–असें बाई मला भय घालायचें झालें. " यमुना उत्तरली.

माझे पति संशयी स्वभावाचे आहेत म्हणून मी स्वतःला मनांत दुःखी समजत होत्यें. पण यमुनेची कहाणी ऐकून मला वाटूं लागलें कीं, मी तिच्या-हून शतपटीनें सुखी आहें ! मी म्हणाल्यें, " हें संशयाचें पिशाच्च जर आमच्या संसारांत असेंच नाचत राहिलें तर दिवसेंदिवस फार कठीण परिस्थिति आपल्या वांट्याला येईल ! "

यावर यमुना म्हणाली, " हें असें चालायचेंच ग ! ह्या प्राप्त झालेल्या परिस्थितीला आपण तोंड दिलेंच पाहिजे. तो विषयच आपण आतां विसरावा हें बरें. " लगेच माझ्या हातांतल्या आईच्या कळ्या घेऊन यमुना म्हणाली, " आण त्या कळ्या इकडे. मी तुला गजरा गुंफून देत्यें. "

मला गजरा गुंफतां येत नव्हता, यामुळें मीं कळ्या तोडून यमुनेच्या स्वाधीन केल्या व ती गजरा गुंफूं लागली. गुंफतां गुंफतां मध्येंच ती थोडा वेळ हात खोळंबून बसली. मीं विचारलें, " यमू, इतका विचार ग कसला करते आहेस ? "

" विचार करत्यें आहें–" यमुना म्हणाली, " अशाच आपण दोघीजणी थोड्या दिवसांपूर्वी मुंबईला उद्धवमामांच्या बागेंत गजरे गुंफीत बसलों होतों–"

मला ती आठवणच सहन होईना. नानांच्या बागेचें नांव काढल्याबरोबर निळकंठ माझ्या नजरेसमोर उभे राहून आजवरच्या सुखदुःखांच्या आठवणी

...लज्जा मला रडवायच्या बेतांत आहेतसें मला वाटलें. त्यांच्यासाठीं मी माळ गुंफूं लागल्यें, मला गुंफतां येईना म्हणून यमुनेनें ती गुंफून दिली, ते अखेर तिथें आले, व माझ्या वाग्दत्त पतीच्या स्वरूपांत असे तेव्हां मला ते अखेरचेच दिसले. तें कल्पनाचित्र मला पहावेना. मीं यमुनेच्या हातांतला गजरा उधळून दिला व तिला विनवलें, " पुरे बाई, पुरे ती आठवण. मला तो गजराहि नको आणि ती आठवणहि नको. "

माझ्या अंतःकरणांतील संवेदनांची यमुनेला पूर्ण जाणीव होती. तिनें निमूटपणें तो विषय सोडला, व उधळलेल्या कळ्या आंवरीत ती मला म्हणाली, " मनू, आपल्या साऱ्या आशा, इच्छा व महत्त्वाकांक्षा भवितव्यतेनें अशाच उधळून टाकल्या नाहीं ? "

" हो ! पण यांत देवाचा काय हेतु असेल बरें ? " मीं विचारलें.

" खरें सांगूं ? " यमुना म्हणाली, " यांत देवाचा हेतु कांहींसुद्धां नाहीं; आपल्या परीनें आपण अजाण आहों, तसाच देवाच्या परीनें देव अजाण असेल. देवाच्या मनांतून सृष्टीची सर्वांगसुंदर रचना करायची असेल; त्यासाठीं तो रोजरोज असे नवे नवे देखावे रचतो. आणि ते जितके सर्वांगसुंदर व्हावे तितके झाले नाहींत म्हणजे ते मोडून तो नवी रचना करूं लागतो. आपल्या आशा, इच्छा व महत्त्वाकांक्षा फळाला येत नाहींत, याचें हेंच कारण, देव देतो व देव नेतो. देव आशा उत्पन्न करतो व देवच निराशाहि उत्पन्न करतो. आपल्या आयुष्यांतील सुखदुःखांचे प्रसंग हीं देव स्वतःच्या करमणुकीखातर खेळत असलेल्या सृष्टीच्या खेळांतील उलटीं सुलटीं दानें आहेत. यासाठीं आपण सारें शुभाशुभ देवापायीं वाहून मोकळें व्हावें हें खरें. "

मी म्हणाल्यें, " यमू, निळकंठ आणि अनंत यांच्या ललाटींचें विधिलिखित लिहितांनाहि विधीची अशीच भूल झाली असावी. विधीच्या हातून स्वल्पविरामाच्या ठायीं चुकून पूर्णविराम पडला, म्हणूनच मला वाटतें, निळकंठांच्या आयुष्यांत आपत्तींचा अकालीं कळस झाला. "

" खरें. अगदीं खरें. " यमुना म्हणाली, " पण त्याबरोबर हेंहि तितकेंच खरें कीं, निळकंठांच्या ललाटींच्या लिखिताचें विधि पुन्हां पहिल्यापासून वाचन करील, तेव्हां त्याची चूक त्याला उमगेल व ती तो सुधारील. मग निळकंठांच्या दुःखांचा शेवट होऊन ते सुखी होतील. "

"देव करो आणि तसेंच होवो!" असें म्हणून मीं चार फुलें उचलून मनोभावानें देवाला वाहिलीं व हात जोडले.

इतक्यांत सासूबाईनीं हांक मारली, "कमले, केव्हांची तूं फुलें आणायला गेली आहेस?"

"आल्यें, मी आल्यें." असें म्हणून हातीं सांपडलीं तेवढीं फुलें परडींत घेऊन मी घरीं गेल्यें. यमुनाहि म्हणाली, 'मी जात्यें.' मी म्हटलें, 'जा.' आम्ही फार वेळ बोलत उभ्या कशा राहूं! आम्हीं आतां सासुरवाशिणी झालों होतों, व यापुढें हें असेंच जन्मभर चालायचें होतें! ज्या जगांतलीं आम्हीं माणसें, त्या जगाची रीतच अशी आहे, त्याला आम्हीं तरी काय करणार! घरीं जातां जातां मी पुन्हां मनोभावानें देवाची एवढीच विनवणी केली कीं, देवा, निळकंठांची मला यापुढें उभ्या जन्मांत भेट झाली नाहीं तरी चालेल; ते पृथ्वीच्या पाठीवर कुठेंहि सुखी असोत म्हणजे झालें.



Printed and Published by V. P. Pendharkar at the Tutorial Press, 211a. Girgaon Back Road, Bombay No. 4.